आंतरभारतीय पुस्तकमाला

# हिंदी एकांकिका

संपादक

**चंद्रगुप्त विद्यालंकार**

अनुवाद

**राजाराम हुमणे**




**नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया**

# भूमिका

हा आहे एकांकिका संग्रह. खरे म्हणजे एकांकिका ही देखील नाटकाचीच एक शैली. म्हणूनच सुरुवातीला मला नाटकासंबंधी थोडेसे विवेचन केले पाहिजे.

प्रतिमेच्या सहज आणि उन्मुक्त अशा आविष्कारातूनच श्रेष्ठ साहित्याची निर्मिती होत असते. कविता, कादंबरी, नाटक किंवा कथा इत्यादी सर्व प्रकारचे साहित्य हे सर्जनशील आणि दृढ अशा आंतरिक प्रेरणांतून निर्माण होत असते. तरी देखील या सर्व प्रकारांचे तंत्र मात्र वेगवेगळे आहे लेखक आपल्या आवडीनुसार, कुवती-प्रमाणे त्या त्या तंत्राचा वापर करीत असतो. एक जुनी संस्कृत म्हण अशी आहे– "काव्येषु नाटकं रम्यम्" (काव्यात अर्थात सृजनात्मक साहित्यामध्ये नाटक हे सर्वात जास्त रमणीय होय.)

भारतीय साहित्यामध्ये नाटकाची परंपरा फार भरघोस अशी आहे. कालिदास, भवभूती, दिग्नाग, भास, विशाखदत्त इत्यादींची नाटके ही शतकांपासून जगातील सर्वश्रेष्ठ अशा प्राचीन नाटकांमध्ये गणली जातात आणि ती तशीच भविष्यकाळातही गणली जातील. त्या काळातही लघुनाटके लिहिली जात असत, परंतु त्यांना वेगळे असे नाव देण्याची प्रथा नव्हती, लघु असूनही त्या एकांकिका नव्हत्या.

"नाटक" शब्द 'नट" धातूपासून बनला आहे याच "नट" धातूपासून "नृत्य" शब्ददेखील बनला. मला वाटते, कलेच्या या दोन पूर्णपणे वेगळ्या अशा माध्यमांच्या नावांची व्युत्पत्ती एकाच धातूपासून असणे याला तसाच काही अर्थ आहे. नृत्य हे केले जाते, लिहिले जात नाही. नाटक लिहिले जाते, खेळले जाते. दोघांचा सरळ संबंध "स्टेज"शी आहे, त्याला आपण 'रंगभूमी' देखील म्हणू शकतो. अशा प्रकारे नाटक हे जसे साहित्याचे एक अंग आहे तसेच ते दर्शनीयकलेचेही एक अंग आहे. भारतातील कथकली, उडीसी, मणिपुरी नृत्यांचा तसेच पाश्चात्य देशातील बॅलेनृत्य पँटोमाइम इत्यादींचा आधारही नाटक हा आहे. त्यांची लिपी देखील लिहिली जाते. अशा प्रकारे नृत्य आणि नाटक हे कलेचे दोन वेगवेगळे असे माध्यम असून देखील एक दुसऱ्याच्या पुष्कळच जवळ आहेत.

येथेच नाटक हे अन्य सर्जनशील अशा साहित्यापासून वेगळे होते, ही गोष्ट या ठिकाणी प्रामुख्याने नमूद करावी लागेल. "नट" धातूपासून बनलेला नाटक शब्द हा या वेगळेपणाचा स्पष्टपणे संकेत देतो. दृश्य आणि श्राव्य (आजच्या शब्दात

सांगायचे म्हणजे "पाठ्य") नाटकाची ही दोन रूपे प्राचीन काळापासून स्वीकारली गेली आहेत.

भारतात नाटकांची उल्लेखनीय अशी परंपरा असूनही पंधराव्या शतकापासून तो एकोणिसाव्या शतकापर्यंत साहित्य आणि कलेचे श्रेष्ठ माध्यम असलेले हे नाट्य-साहित्य भारतातील अधिकांश भाषांत आणि प्रदेशांत का उपेक्षिले गेले त्याची कारणे स्पष्ट आहेत. त्या काळात राजनैतिक दबावांमुळे आणि समाजांतील उच्च-नीचतेच्या भावनांमुळे भारताचे जनजीवन आणि चिंतन संकुचित झाले होते. उत्तर भारतात तर प्रामुख्याने नाटक हे "भाण" आणि "नक्काल" यांच्या पुरतेच मर्यादित राहिले आणि संगीत व नृत्य तर वेश्यालयांत केले गले. बऱ्याच कालावधीनंतर भारतात जेव्हा नवजागृतीची लाट पसरली त्यावेळी साहित्यामध्ये देखील नवचैतन्य संचारले श्रेष्ठ दर्जाचे असे नवसाहित्य भारतीय भाषांमध्य लिहिले जाऊ लागले.

परंतु नाटक ही काही केवळ लिहिण्याची बाब नाही. त्यासाठी सामूहिक कार्य (टीमवर्क) आवश्यक आहे. त्यामुळेच ज्या वेगाने कविता, कथा कादबऱ्या इत्यादी अन्य साहित्याचा विकास होऊ शकला. तितक्या वेगाने भारतीय नाटकांचा विकास होऊ शकला नाही. नाटक हे रंगभूमीसाठी आहे आणि स्वातंत्र्यपूर्व काळात भारतात रगभूमीचा व्हावा तेवढा विकास झालेला नव्हता. एक प्रकारचे दुश्चक्रच बनले होते-रगभूमी नाही तर नाटक कसे लिहिले जावे आणि नवीन नाटक नसेल तर रंगभूमीचा विकास कसा व्हावा ? स्वतत्र भारतात मात्र आता ही परिस्थिती राहिली नाही. आता राष्ट्रीय पातळीवर रंगभूमीच्या विकासाचा प्रयत्न होऊ लागला आहे. याचा सुपरिणाम देखील आतापासूनच दिसू लागला आहे. भारतातील श्रेष्ठ भाषांप्रमाणे हिंदीच्या देखील श्रेष्ठ लेखकांचे लक्ष नाटकाकडे गेले आहे.

नाट्य विद्येचेच एक अग म्हणजे एकांकी नाटक होय. नाटकात जशी "त्रयी एकता" (स्थान, काल आणि क्रिया यांची एकता) अवाश्यक असते तशीच एकांकिकेमध्येदेखील ' त्रयी एकता" असणे आवश्यक आहे. आता रंगभूमीवर चित्रपटाच्या मदतीने दूरच्या किंवा जुन्या घटनादेखील पार्श्वभूमीच्या स्वरूपात दाखविल्या जातात. त्याच शैलीचा वापर एकांकिकेच्या बाबतीतही करता येतो. रंगभूमीवर कितीतरी नवनवीन प्रयोग झाले आहेत, त्यांतून जुन्या तंत्रामध्ये बदल होत गेला किंवा त्याला नवीन रूप दिले गेले आहे. हा सारा बदल एकांकिकांमध्ये देखील करता येतो आणि तसा तो केलाही जात आहे.

परदेशांत एकांकिकांचा उपयोग फक्त मोठी नाटके दाखवीत असताना मधला वेळ भरून काढण्यासाठी म्हणून केला जात असे, मोठ्या नाटकांत जेव्हा अंक संपल्यानतर पडदा पडत असे तेव्हा दुसऱ्या अंकासाठी स्टेजमध्ये बदल करण्यास कधी-कधी अर्धा

बंधी तास देखील लागत असे. तिकिटे काढून आलेल्या दर्शकांच्या दृष्टीने तर दहा-दहा मिनिटांचे मध्यंतर सारखे असणे ही कंटाळवाणी बाब ठरते. एक मध्यंतर हा खाण्या-पिण्यासाठी किंवा स्वत:ला जरा सावरण्यासाठी किंवा आप्तेष्टांना भेटण्याच्या दृष्टीने ठीक आहे. परंतु सहा अंकी नाटकात सारख्या येणाऱ्या मध्यंतरांमुळे दर्शक अगदी कंटाळून जातो. 'यातील दीर्घ मध्यंतरामध्ये प्रेक्षकांचे मनोरंजन करण्यासाठी म्हणून एकांकिका नाटके लिहिली आणि रंगभूमीवर आणली जाऊ लागली. ही काही मिनिटांची नाटके पडद्याच्या बाहेरच दाखविली जात असत व त्यांना मोठ्या रंगपटाचीही आवश्यकता भासत नसे. प्रामुख्याने प्रचलित चुटके आणि हास्यविनोद यांच्याच आधारावर त्यांची निर्मिती होत असे. योगायोग म्हणा, ऑक्टोबर 1903 मध्ये लंडनच्या सुप्रसिद्ध अशा 'वेस्ट एण्ड थिएटर' मध्ये लुई एन्. पार्करचे "दि मंकीज पॉ" (माकडाचा पंजा) नावाची जी एकांकिका दाखविली गेली ती प्रेक्षकांना इतकी आवडली की त्यानंतर त्यांनी मुख्य नाटकाकडे देखील दुर्लक्ष केले. लुई एन्. पार्करने ती एकांकिका डब्ल्यू. डब्ल्यू. जेकबच्या एका कथेच्या आधारावर लिहिली होती. अशा प्रकारे प्रमुख लेखक, जाणता प्रेक्षक वर्ग आणि टीकाकार या सर्वांचं लक्ष एकांकिकेच्या या नवीन शैलीकडे एकाएकी वेधले गेले त्यानंतर फार वेगाने चांगल्या चांगल्या आणि प्रभावी अशा एकांकिका लिहिल्या जाऊ लागल्या. हळूहळू आज स्थिती इथपर्यंत आलेली आहे की की मोठ्यातल्या मोठ्या स्टेजवर देखील आता एक पूर्ण नाटकाऐवजी दोन किंवा तीन एकांकिका दाखविल्या जाऊ लागल्या आहेत आणि दर्शक मोठ्या आवडीने पाहतांना दिसताहेत.

"दि मंकीज पॉ"ची चर्चा मी एका विशेष हेतूने केली आहे. ही एकांकिका एका कथेवर आधारित अशी आहे. मला वाटते अशा पुष्कळ चांगल्या कथा उपलब्ध आहेत आणि त्यांना चांगल्या एकांकिकांचे रूप देता येणे सहज शक्य आहे. शिवाय मला असेही सांगावयाचे आहे की कथा आणि कादंबरी या दोहोंची गणना जरी कथा साहित्यात (फिक्शनमध्ये) केली जात असली तरी हे दोन्ही प्रकार एकमेकांपासून अगदी भिन्न असे साहित्य प्रकार आहेत. परंतु नाटक आणि एकांकिका मात्र एकाच विधेची दोन रूपे आहेत दोन्हीचे तंत्र (टेक्निक) एकाच श्रेणीचे आहे.

नाटक आणि एकांकिका यामध्ये काही अंतर नक्कीच आहे सुरुवातीला नाटके ही सहा किंवा सात अंकांची असत. संस्कृत साहित्यात देखील हीच परंपरा होती. आता मात्र प्रामुख्याने तीन अंकाहून अधिक अंकी नाटक लिहिले जात नाही. एकांकिकेत एकच अंक असतो. एकांकिका ही दृश्यांतरापासून अलिप्त असावी असे मला वाटते. दृश्य न बदलता, कालांतर दाखविण्यासाठी फार तरी दोन-तीन वेळा काही क्षण रंगभूमीवर पूर्ण किंवा अर्ध अंध:कार करावा किंवा तशीच आवश्यकता वाटल्यास

काही क्षणांसाठी पडदा देखील पाडला जावा. एकांकिकेमध्ये पात्रसंख्या देखील फार कमी असली पाहिजे. अर्थात हा काही नियम नव्हे. कारण जमावाचं दृश्य हा देखील एकांकिकेचा विषय बनू शकतो. परंतु प्रेक्षकांना जेव्हा पात्रांचे बोलणे ऐकण्याची आणि त्यांना पाहण्या–समजण्याची योग्य संधी मिळते तेव्हाच प्रेक्षकांची पूर्ण सहानुभूती चरित्राला लाभू शकते. नाटकाचे संपूर्ण कथानक एकात एक गुंफलेले असू शकते तर एकांकिकेचे कथानक मात्र एकेरीच असावे लागते.

आपल्या देशात हौशी रंगभूमीच्या विकासाला नुकतीच कुठे सुरुवात झाली आहे. जुन्या दीर्घकाळ चालणाऱ्या नाटकांचा काळ आता संपला आहे. आजपासून वीस वर्षांपूर्वी मराठी नाटके इतकी मोठी असायची की ती रात्रभर चालायची. एका नाटकात तर साठहून अधिक गाणी असल्याचे मला आठवते. लंडन किंवा मुंबईमध्ये आजपासून एक–दोन पिढ्यापूर्वी ज्या कारणासाठी एकांकिकेची आवश्यकता वाटत असे ते आज राहिले नाही. आज केवळ या एकांकिकांपासून वरील तंत्राच्या वापराने लेखकाला निश्चित असे काही तरी सांगावयाचे असते. आजचा दर्शक त्या पाहू इच्छितो म्हणूनच त्या लिहित्या किंवा सादर केल्या जातात.

हिंदीमध्ये मुख्यत: कॉलेजांतून त्यांच्या नाट्यमंडळातर्फे सादर करण्यासाठी म्हणून या शतकाच्या तिसऱ्या दशकात एकांकिकांच्या लेखनाच्या कार्याला सुरुवात झाली. त्यानंतर आकाशवाणीवरून प्रसारित करण्यासाठी म्हणून एकांकी नाटकांची मागणी होऊ लागली. रेडिओसाठी एकांकिका लिहिल्या गेल्या आणि कितीतरी कथांना ध्वनी एकांकिकांच्या स्वरूपात सादर केले गेले. रेडिओवाल्यांनी यांना रेडिओ रूपक या नावाने संबोधिले. यशपाल आणि धर्मप्रकाश आनंद इत्यादींनी काही कथा संपूर्ण संवादरूपात अशा काही पद्धतीने लिहिल्या की त्या रेडिओवरून एकांकिकेच्या स्वरूपात प्रसारित केल्या जाऊ शकत होत्या आणि रंगभूमीवरही आणल्या जाऊ शकत होत्या, तरीही मुळात त्या कथाच होत्या.

रेडिओपासून प्रेरणा घेऊन ज्या एकांकिका हिंदीत आल्या त्या "श्राव्य" कोटीच्या आहेत. त्यांपासून रंगभूमीला खास असा लाभ होत नाही. माझ्या दृष्टीने श्रेष्ठ एकांकिकेची ओळख देखील रंगभूमीवरूनच करून घ्यावी लागेल. अर्थात साहित्याच्या सर्व प्रकारांमध्ये जितकी म्हणून विविधता असेल तितकी ती चांगलीच ! सर्व प्रकारांत नवनवीन प्रयोग करणे देखील चांगलेच. परंतु प्रयोग हा प्रयोगच असतो. गेल्या शंभर वर्षांत नाट्यकलेची जी लोकरूपे प्रामुख्याने भारतातील खेड्यांतून विकसित झाली होती त्यांचा देखील भावी काळातील एकांकिकेवर परिणाम होणे शक्य आहे.

हिंदी प्रदेशांतून आता रंगभूमीचा विकास होऊ लागला आहे. या रंगभूमीवर

एकोणिसाव्या शतकातील किंवा पारशी शैलीतील रंगभूमीचा किंचितही प्रभाव नाही. या रंगभूमीची मुख्य प्रेरणा आहे जगातील श्रेष्ठ नाट्यसाहित्य, जे खऱ्या अर्थाने सार्वभौम असे आहे. माझा अभिप्राय नाटकाच्या आत्म्याशी आहे. त्याच्या प्रेरणेशी आहे. जसजशी विश्वसंस्कृती एक बनत चालली आहे, तसतसा त्याचा प्रभाव देखील विश्वाच्या सर्व भाषांवर पडू लागला आहे. निर्मितीचा स्रोत हा मूलतः मानवीय भावनांतूनच प्रवाहित होत असतो. परंतु आजच्या वैज्ञानिक युगात या विश्वातील 137 देश रहाणी, व्यवहार आणि चिंतन या दृष्टीने एकदुसऱ्याच्या जास्तीत जास्त जवळ येत चालले आहेत, आणि त्यामुळे त्याच्या प्रभावाने साहजिकच विश्वाच्या जवळ जवळ साडे तीनशे भाषांच्या साहित्यामध्ये देखील चिंतन आणि शैली यांत सारखेपणा ठळकपणे दिसू लागला आहे.

पाश्चात्य देशांत एकांकिकेचा जन्मकाळ हा सन १९०३ पासून मानला जात असला तर त्याच्या कितीतरी अगोदर हिंदीमध्ये एकांकिका लेखनाचा प्रयत्न केला गेला होता. भारतेंदूची "अंधेर नगर" ही विनोदी एकांकिका म्हणता येईल. राधाचरण गोस्वामी, बाळकृष्ण भट, प्रतापनारायण मिश्र आणि जयशंकर प्रसाद यांनी देखील एकांकिका लिहिल्या परंतु भारतेंदु आणि प्रसाद यांच्या खेरीज वर उल्लेखिलेल्या अन्य लेखकांच्या एकांकिका ह्या एक प्रकारचा संवादच म्हणता येईल.

हिंदीमध्ये एकांकिका ह्या "कर्टन रेजर"च्या उद्देशाने मुळीच लिहिल्या गेल्या नाहीत. त्यांना हिंदीमध्ये नाटकाच्या एक नवीन, सहज आणि व्यावहारिक शैलीच्या स्वरूपात मान्य केले गेले. त्यांचे रूप भारतीय असले तरी त्यांतील बहुतेक एकांकिकांचा आत्मा मात्र सार्वभौम असा आहे.

या संग्रहातील बहुतेक लेखक हे जागतिक कीर्तीचे असे आहेत. यांतील फक्त उदयशंकर भट्ट यांचा जन्म तेवढा गेल्या शतकात (1898) झाला होता. इतर नऊ लेखक विसाव्या शतकातील आहेत. भट्ट हे अत्यंत निष्ठावान कलाकार होते. आपल्या आयुष्याच्या अंतापर्यंत त्यांच्यात ग्राहकता, नव्या गोष्टी आणि शैली आत्मसात करून घेण्याची इच्छा कायम होती त्यांच्या रचनांच्या क्रमिक अध्ययनाने एक गोष्ट आपल्या लक्षात येते ती ही की सर्व साधने उपलब्ध नसताना, समृद्ध अशा विदेशी भाषांपासून अपरिचित राहून देखील एक लेखक आपल्या निष्ठा आणि मेहनतीमुळे किती प्रगती करू शकतो कविता, नाटक, संगीतिका. एकांकिका, कादंबरी या सर्व प्रकारांमध्ये त्यांचा क्रमबद्ध विकास आदरानेच पाहिला जाईल.

हिंदी एकांकिकेच्या विकासामध्ये राजकुमार वर्मांचे स्थान विशेष महत्वाचे आहे. त्यांनी आपली पहिली एकांकिका 1930 मध्ये लिहिली होती तीदेखील मुख्यत्वेकरून अलाहाबाद युनिव्हर्सिटीमध्ये रंगमंचावर आणण्याच्या उद्देशाने. रामकुमार वर्मांच्या

शब्दांत सांगावयाचे झाल्यास "जीवनाच्या एखाद्या जिवंत परिस्थितीला घनीभूत करून पात्र आणि घटना यांच्या माध्यमातून कुतूहलपूर्वक सादर करणे हाच एकांकिकेचा उद्देश म्हणता येईल." वर्माजी स्वतः कवी आहेत आणि त्यांच्यातील उपजत कवी हा त्यांच्या एकांकिकांतूनही अगदी स्पष्टपणे दिसून येतो. गीतकार कवीची शक्ती आणि सीमा यांचे दर्शन त्यांच्या एकांकिकांमधून होते !

हिंदीमध्ये सर्व प्रथम एकांकी नाटकांची मुहूर्तमेढ सेठ गोविंददासांनी रोवली. ही हिंदी साहित्याला त्यांचीच देणगी आहे. ज्या धर्तीच्या एकांकिका त्यांनी लिहिल्या तशा प्रकारच्या एकांकिका त्यापूर्वी हिंदीच्या दुसऱ्या कुणाही नाटककाराने लिहिल्या नव्हत्या. त्यांच्या नंतरच या दिशेने इतर नाटककारांनी देखील प्रगतीची काही पावले उचलली. स्ट्रॅन्डबर्ग आणि ओनीलच्या शैलीमध्ये त्यांनी "प्रलय और सृष्टि", "शाप और वर", "सच्चा जीवन" इत्यादी यशस्वी एकपात्री नाटके (मोनो ड्रामा) लिहिली आहेत. त्यांनी पात्रांच्या चारित्रिक वैशिष्ट्यांचे सुंदर विश्लेषण केले आहे. याशिवाय सेठजींनी आपल्या लेखनामध्ये "उपक्रम" आणि "उपसंहार"च्या नव्या नाट्यशैलीचा देखील प्रयोग केला आहे.

"अश्क" हे धरतीचे लेखक मानले जातात. लेखक बनण्यासाठी त्यांनी असामान्य मेहनत केली आहे. कादंबरी, कथा, नाटक, एकांकिका, संस्मरण-सर्वच प्रकारच्या ललित साहित्याची निर्मिती त्यांनी केली आहे. स्वतःची एक-एक रचना त्यांनी अनेक वेळा आणि अनेक स्वरूपांमध्ये लिहिलेली आहे. त्यांच्या रचनांमध्ये सखोलपणा आणि चिंतन जरी कमी असले तरी स्पष्टपणा कमालीचा आहे. "तौलिए" (टॉवेल) रंगभूमीवर यशस्वीरीत्या खेळता येण्यासारखे आहे. उर्दू प्रथेतील गुणदोष त्यांच्या रचनेत आढळतात.

भुवनेश्वर प्रामुख्याने एकांकिका लेखक होते. पाश्चिमात्य नाट्यकला आणि शैलीचे यथायोग्य अध्ययन त्यांनी केले होते. भुवनेश्वरांचा मृत्यू वयाच्या अवघ्या 45 व्या वर्षी झाला. जीवनाचे शेवटचे क्षण तर त्यांनी अगदी भ्रमिष्टावस्थेत घालवले. त्यांनी जरी फारसे लेखन केले नसले तरी एकांकिकेच्या दालनामध्ये मार्गदर्शक ठरेल एवढी कामगिरी नक्कीच बजावली. अशा प्रकारे हिंदी एकांकिकेमध्ये स्वतःचे असे खास स्थान त्यांनी निर्माण केले.

विष्णु प्रभाकर हे एक कथाकार या नात्याने हिंदी साहित्य सृष्टीमध्ये आले. नंतर त्यांनी कादंबऱ्याही लिहिल्या. आकाशवाणीवर काम करीत असताना त्यांनी रेडिओसाठी श्रुतिका लिहायला सुरवात केली आणि या माध्यमावर त्यांची चांगलीच पकड बसली. त्यांनी नाटक आणि एकांकिका देखील लिहिल्या. साहित्य हे उद्देशपूर्ण असले पाहिजे असे ते मानतात. आणि आपल्या रचनांच्या वाचनाने प्रत्येक पाठकाला श्रेय

मार्गाची प्रेरणा मिळावी असा त्यांचा प्रयत्न असतो.

जगदीशचंद्र माथुर यांनी नाटक आणि नाट्यकला यांच्या अध्ययनांत विशेष लक्ष घातले. या बाबतीत त्यांचे अध्ययन आणि चिंतन बहुमूल्य असेच आहे. नाटक लिहिण्याची शक्तीदेखील त्यांच्यात आहे. परंतु वेळेअभावी त्यांना आपल्या कुवतीप्रमाणे साहित्य सृजन करता आले नाही. जगदीशचंद्र माथुर यांची नाटके आणि एकांकिका ह्या रंगभूमीसाठी आहेत. व्यावहारिक व्यक्ती असूनही ते भावुक आहेत. "भोर का तारा" ही निःसंशय एक उल्लेखनीय रचना आहे. परंतु ही वाचल्यावर किंवा स्टेजवर पाहिल्यावर वाचकांना किंवा दर्शकांना कदाचित एक प्रश्न पडण्याची शक्यता आहे की शेखरने आपले महाकाव्य आगीत का जाळून टाकले? आपल्या कित्येक वर्षांच्या कृतींना अशा प्रकारे जाळल्याखेरीज बंगला देशाच्या मदतीसाठी युद्धोद्यत झालेल्या 'आंद्रे मार्लो'प्रमाणे तो आपल्या मातृभूमीचे रक्षण करण्यासाठी युद्धावर जाऊ शकत नव्हता काय?

मला वाटतं, हिंदीमध्ये लक्ष्मीनारायण लाल यांचे नाट्यसंबंधी ज्ञान, चिंतन आणि मनन कमालीचे समृद्ध आहे. नाटक हा तर त्यांचा सर्वाधिक आवडता विषय. रंगभूमीच्या संबंधात जितके संशोधन आणि प्रयोग त्यांनी केले आहेत, ते सर्व त्यांच्या भावी रचनांना अधिकच उज्ज्वल केल्याखेरीज राहणार नाहीत. हिंदीमध्ये त्यांच्या सारखी नाटकं आणि रंगभूमी दोहोंबाबत सखोल आस्था असलेला दुसरा लेखक विरळाच!

धर्मवीर भारतीमध्ये अलौकिक लेखनशक्ती आहे. ते उत्तम कवी, उत्तम लेखक आणि उत्तम नाटककार आहेत. काहीतरी नवीन देण्याचे सामर्थ्य त्यांच्यात आहे. "सृष्टि का आखिरी आदमी" ही त्यांची एक गीत–एकांकिका आहे.

आणि सर्वात शेवटी मी माझी एक ध्वनि–एकांकिका या संग्रहामध्ये घातली आहे.

नवी दिल्ली — चंद्रगुप्त विद्यालंकार

# अनुक्रमणिका

पात्रे

बिसाखाराम
सुंदरलाल
राजो
राजोची आई
मुनीम

(वेळ : **सायंकाळची–पाच वाजण्याचा सुमार**)

(**सीमा प्रांतातील एका शहरातील एक घर. घरातील एक मोठी खोली** – तिला दोन दरवाजे आहेत. एक जिन्याजवळ व दुसरा घराच्या आतल्या भागात जाणारा. गल्लीच्या बाजूला दोन खिडक्या. आतल्या खोलीत एक मोठी खाट – तिच्यावर एक मळकी चादर अंथरलेली. पूर्वेला कोपऱ्यात एक चौरंग. तिच्यासमोर कोनाड्यात ठाकुरजींचा देव्हारा. त्यात काही पितळी मूर्त्या. मूर्त्यांवर झेंडूच्या फुलांच्या माळा चढविलेल्या आहेत. कोनाड्याच्या आतील हुकाला रुद्राक्षाची एक माळ आहे. दोन हस्तलिखित पोथ्या आहेत. खोलीत काही तसबिरीही दिसत आहेत. एकीत रामाच्या राज्याभिषेकाचे चित्र असून त्यात राम, लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न दिसतात, तसेच मारुती माळ जपत असल्याचेही दिसते. दुसरी तसबीर काली मातेची आहे. खोलीत एक मोडा व वेत तुटलेली जुनी खुर्ची. कोपऱ्यात एक छोटेसे टेबल. त्यावर एक तांब्या व तांब्यावर एक भांडे. भिंतीला दोन खुंट्या एकीवर पगडी व दुसरीवर एक उपरणे आणि मळका कोट. खाटेवर बिसाखाराम अस्वस्थपणे लवंडले आहे. डोळ्यात बेचैनी, चेहरा उतरलेला, रंग गोरा, केस विस्कटलेले. मोठ्या चिंतेत असल्यासारखे वाटते. हातात एक चिठ्ठी आहे. ती तो वारंवार उचलतो, वाचतो आणि परत उशाशी ठेवून देतो. पुन्हा एकदा चिठ्ठी उचलतो, वाचतो आणि ठेवून देतो. खाटेवर उठून बसतो, छताकडे एकदा बघतो आणि उठून धप्‌दिशी पुन्हा खाटेवर अंग टाकतो.)

**बिसाखाराम** : हाय रे देवा, हेही दिवस बघावे लागतील हे काय ठाऊक होतं ? प्रभू रामचंद्रा ! वाचव रे बाबा ! मोठा बाका प्रसंग येऊन गुदरलाय. काही, काही उपाय सुचत नाही. (**डोळे मिटून ठाकुरजींना हात जोडू लागतो. पण लगेच डोळे उघडतो. आणि हातात पत्र घेऊन वाचू लागतो.**) काय करावं ? राजो ए राजो.

(**चौदा वर्षांची एक मुलगी आतल्या दरवाज्यातून धावत येते.**)

**राजो** : काय काका ? काय म्हणालात ?

**बिसाखाराम** : मुनीमजी नाही आले अजून ? इकडे जीव जायची पाळी आलीय. मोठ्या संकटात अडकलोय मी.

**राजो** : भाई केव्हा येणार ? (**जवळ जाऊन**) भाईंना द्या ना बोलावून. काही रुपयांचा तर प्रश्न आहे. हाय (**डोळ्यात अश्रू येतात**) देवा, काय वाईट आहेत हे लोक. काका, पाठवून द्या ना पैसे ! कसली वाट पहाताय ?

**बिसाखाराम : (बसतो)** कसली वाट पहातोय बाळ ? कसलीही नाही. **मी माझ्या** नशिबाला बोल लावतोय आणि पैसे तरी कुठाहेत ? अजून धान्य खरेदी **करायचंय.** कालच मुहमद बक्स आला होता. रुपया एक आणा व्याजानं दोन हजार रुपये मागत होता. त्याला तर पैसे द्यावेच लागणार. शिवाय दहा हजारांचे सरकारी बाँड खरेदी करायचेत. अशी संधी परत कधी येणार आहे ? इतकं व्याज काय कधी हातचं घालवता येईल होय, पोरी ? बापरे, दहा हजार रुपये द्यावे लागणार **(एकदम खाटेवर अंग टाकतो.)**

**राजो :** काका, काका काय झालं तुम्हाला ? वहिनी, वहिनी ! काका **बघ कसं** करताहेत.

**(राजोची आई " अरे माझ्या देवा " करत बाहेर येते.)**

**राजोची आई :** एकदा मी सांगितलं ना ? एवढा कशाला जिवाला त्रास करून घ्यायचा ? देऊन टाका दहा हजार रुपये ! पैसे काय, परत मिळतील. पण मुलगा काही परत...अरे देवा, हे काय बोलतेय मी ? **(हात जोडून कोनाड्यातील देव्हाऱ्याकडे बघते.)** देवा, दया कर.

**बिसाखाराम :** मुनीमजी नाही आले ? **(डोळे मिटून घेतो.)**

**राजो :** येतीलच इतक्यात ! तुम्हाला आता कसं वाटतं, काका ?

**राजोची आई :** मी सांगतेय ना काळजी कसली करायची ? देवा, माझा मुलगा मला परत दे. माझं हवं ते घे. पण मला माझा मुलगा दे ! **(रडू लागते.)**

**राजो : (आईच्या गळ्यात गळा घालून)** रडतेस काय वहिनी ? काकांना सांगून भाईला बोलावून घे.

**राजोची आई :** पोरी, कसं बोलवू त्याला ? तुझ्या काकांना पडलाय ना पैशाचा सोस ! देवाने एकच मुलगा दिला ... अन् ...

**बिसाखाराम : (डोळे उघडत)** राजो, पोरी मुनीमजी आले नाहीत ?

**राजो :** अजून तरी आले नाहीत.

**बिसाखाराम :** कुणास ठाऊक त्यांनी साखरेचा सौदा पुरा केला की नाही ? यावेळी साखरेची खरेदी जरुरी आहे. नाहीतर ती महाग होऊन जायची. काय संकट आहे ? इब्राहिमकडे त्यांनी पैशाचा तगादा लावला की नाही हेही माहीत नाही. चार वर्षं होत आली अजून व्याजाचासुद्धा पत्ता नाही. त्याच्यावर खटलाच करावा लागेल. तरच तो निमकहराम पैसे परत देईल. **(पत्र हातात घेऊन)** पण ... याचं काय करू ?

**(इतक्यात 'राजो' 'राजो' हाका मारीत मुनीम खाड खाड करीत जिना चढत येतो.)**

**बिसाखाराम :** अरे वा ! मुनीमजी आले ! (**एकदम उठून बसतो.**) या ! **मुनीमजी** या ! आज यायला फारच उशीर केलात मुनीमजी !

(**राजो आणि तिची आई दुसऱ्या दरवाजाने घरात जातात.**)

**मुनीम :** जै रामजी की शेठजी ! उशीर झाला. दिवसभरचा हिशेब पुरा करायचा होता. तेरा आणे दराने साखरेची दोनशे पोती खरेदी करून टाकली आहेत. मुहम्मद बक्सचा माणूस आला होता. मी सांगून टाकलं की शेठजी आल्यावरच काय ते ठरेल. इब्राहिम फरारी झाला म्हणून ऐकलंय. रोकड जमवता जमवता इतका उशीर झाला. त्या पठाणांकडून काही पत्र आलं का ?

**बिसाखाराम :** साखरेचा भाव बारा आणे चार पै होता ना ? मग तेरा आणे दराने का खरेदी केली ? इब्राहिम पळाला ? ही तर फारच वाईट बातमी आहे, मुनीमजी ! चार हजार रोख आहेत. कसे सोडता येतील ? चौधरीला नाही सांगायला लावलंत ? तो जामीन आहे ना ? सरकारी बाँडचं काही पत्र आलं ? रुपये तयार ठेवा. बाँड विकत घ्यावेच लागतील.

**मुनीम :** पठाणाच्याकडून काही चिठ्ठी आली का मालक ?

**बिसाखाराम :** आता आपल्याकडे रोख रक्कम किती बाकी आहे ? चौधरीकडे आत्ताच्या आता माणूस पाठवा आणि तगादा लावा. (**खाटेवर पडून**) सगळ्या बाजूंनी संकटच संकट. पैसे घेतात पण द्यायचं नाव कुणी काढत नाही. (**डोळे मिटून खाटेवर आडवा होतो.**) परमेश्वरा ! प्रभु रामचंद्रा ! काळ काय कठीण आला आहे. (**उठून**) मी जाऊ ? आता प्रकृतीचं पाहू की पैशाचं ? (**बसतो.**)

**मुनीम :** नाही मालक, तुम्ही आजारी पडता कामा नये. पठाणांनी काहीच कळवलं नाही का ? सुंदरलालचा काही तरी विचार करायलाच पाहिजे. कुणास ठाऊक त्याचा काय छळ करीत असतील ते ! (**मालकांकडे पहातो.**)

**बिसाखाराम :** घ्या ! वाचा ! काय दुष्ट आहे कारटा ! जरासुद्धा प्रतिकार केला नाही. नव्या नवरीनं मेण्यात बसून जावं तसा खुशाल त्यांच्याबरोबर निघून गेला.. माझ्या उरावर सुरी फिरवायला ! कुठून आणू दहा हजार ? दहा हजार ? (**पत्र मुनीमजीच्या हाती देतो**) घ्या वाचा ! सारं वाटोळं केलं यानं, मुळात बाहेर जायचंच कशाला ? (**परत अंग टाकतो.**)

**मुनीम :** मालक, यात सुंदरलालचा काहीच अपराध नाही. वसुलीसाठी आपणच तर त्याला पाठविलं होतंत.

(**पत्र हातात घेऊन वाचू लागतो.**)

**बिसाखाराम :** पार सत्यानाश झाला, मुनीमजी, पार सत्यानाश ! हं ! जरा मोठ्याने वाचा !

**मुनीम : (आश्चर्यचकित होऊन)** हे तर सुंदरलालचं हस्ताक्षर ! तो लिहितोय... "बाबा, तुम्हाला माझा जीव वाचवायचा असेल तर आज रात्री बरोबर आठ वाजता काबुली फाटकाच्या बाहेर कुणाच्या तरी हातून दहा हजार रुपये पोचविण्याची व्यवस्था करा. पोलीस किंवा मदतनीस बरोबर घेऊन आलात तर मुलगा मेला असंच समजा, असं खान म्हणतो. या लोकांनी माझा येथे फार छळ केलाय. नरकयातनासुद्धा यापेक्षा भयंकर नसतील. मला खात्री आहे...तुम्ही माझे प्राण वाचवाल."

आपला सुपुत्र,
**सुंदरलाल**

खाली स्वतः खानाने पुश्तु भाषेत लिहिलंय...

"अम तुमको इत्तला देता है, तुम आज बुधवार शाम के आठ बजे दस हजार रुपया काबुली फाटक के बाहर पहुँचा दो, नहीं तो तुम्हारा लडका को मार डालेगा !

–अमीरअली खाँ,

**(मुनीम पत्र ठेवून व बिसाखारामकडे बघू लागतो.)**

**मुनीम :** मालक दहा हजारांचाच प्रश्न आहे ना ? आज बुधवार आहे. सांगत असाल तर मुहमंद बक्सला काही न देता दहा हजारांची मी सोय करतो. तसे पैसे आहेतच आपल्याकडे.

**बिसाखाराम :** आणा–रुपया व्याजाने मिळविलेले पैसे आहेत हे मुनीमजी ! (दटावून) आपल्या खिशातले पैसे काढा म्हणजे समजेल ! निढळाच्या घामाचा पैसा आहे हा ! दहा हजार असे फुकटफाकट जाणार ? देवा, मला साफ बुडवलस.

**(राजो आणि तिची आई एकदम प्रवेश करतात)**

**राजोची आई :** फुकटफाकट जाणार ? ऐकलंत मुनीमजी ! यांचं तर डोकंच कामातून गेलंय. बस ! रुपये, रुपये, दुसरा विचार नाही. मुनीमजी, माझा मुलगा मला आणून द्या ! माझा सुंदर ! माझ्या लाडक्या, काय रे हे झालं !

**(डोळ्यावरून पदर घेत जमिनीवर बसते. राजो धावत जाऊन वडिलांच्या गळ्यात पडते व काकुळतीला येऊन त्यांच्याकडे बघू लागते.)**

**बिसाखाराम :** छान, मुनीमजी ! सुंदर येऊ नये असे मी कधी म्हणेन का ? मला स्वतःलाही वाटतं की पोरगा काही करून परत आला पाहिजे. मी काय सुंदरचा बाप नाही ? तुम्हीच सांगा पोराशिवाय सारं घर कसं सुनं सुनं वाटू लागलंय. पण दहा हजार ?

**मुनीम : (डोकं हलवीत)** ते तर खरंच. तेवढं करावंच लागेल.

**राजोची आई :** आज चार दिवस यांचा हा अवतार पहातेय. सांगतेय की पैशाच्या मागे लागून, मुलगा हातचा घालवू नका. पैसा म्हणजे हातचा मळ ! दहा हजारांचं

काय एवढं घेऊन बसायचं ? परंतु यांना काय झालंय हेच समजत नाही. यांच्या डोक्यातली साखर आणि व्याज जाईल तेव्हा ना ? मुनीमजी, मी तुमच्या पाया पडते. माझा सुंदर मला परत आणून द्या.

**मुनीम :** बाईसाहेब, घाबरू नका. सुंदर घरी आलाच असं समजा.

**राजोची आई :** सुंदर घरी आला असं समजू तरी कशी मी ? (**पतीकडे बोट दाखवीत**) यांचं वागणं पाहिलं म्हणजे वाटतं की, मी माझा मुलगा गमावून बसणार ! म्हणतात जे व्हायचं होतं ते झालं ! आणि मुलगा.. हाय रे देवा ! यांना हे बोलवतं तरी कसं ?

**राजो :** मुनीमजी, दादाला लवकर बोलावून घ्या. कित्येक रात्री झाल्या. आईचा डोळ्याला डोळा लागला नाही. सारी रात्र रडत असते बिचारी. डोळे पहाना कसे सुजून गेलेत. माझ्या भावाला लवकरात लवकर घेऊन या मुनीमजी (**रडू लागते**.)

**राजोची आई :** मी म्हणते, पाहिजे तर माझे दागिने विका आणि माझ्या मुलाला वाचवा.

**मुनीम :** घाबरता कशाला बाईसाहेब ? मालकांनाही तुमच्यापेक्षा काही कमी काळजी नाही.

**बिसाखाराम :** हो, बरोबर आहे. मी तरी रात्री कुठे झोपलोय. रात्रंदिवस त्याचीच चिंता मला लागली आहे. डोळ्यापुढे सारखा सुंदर उभा राहतो. त्याच्या बाळपणाच्या गोष्टी सारख्या आठवतात. अजून इब्राहिम पैसे देण्यासाठी आला नाही. मुनीमजी, तुम्ही त्याच्या व्याजाचा हिशेब केलायत ना ? किती रक्कम त्याच्याकडे लागू होते ? साखर कुठे ठेवलीत, गोदामातच ना ? हे पहा. चाव्या तुमच्याकडेच ठेवा. नाही तर माझ्याकडे ठेवून जा.

**मुनीम :** मालक, सुंदरलालबद्दल काय करायचं ? रुपयांची व्यवस्था करू ? वेळ फारच थोडा उरलाय. ( **मालकाकडे पहातो**) आताच निजोरीत मी पंधरा हजार रुपये ठेवून आलोय.

**बिसाखाराम :** दहा हजार ! एक पै कमी नाही ! मुनीमजी, दुसरं काही करता येणार नाही का ? मी म्हणतो पोलिसांना बातमी दिली तर ?

**मुनीम :** पोलीस तरी काय करणार मालक ? तेही घाबरतात आणि त्यांना काय माहीत नाही ? पण ते काही हालचाल करतील तर ना ! मालक, आपण दुसरं काही करायच्या भानगडीत न पडलेलं बरं ! 'नाही तर, मुलगा गमावून बसलाच म्हणून समजा. परमेश्वर करो आणि असं न होवो !

**राजोची आई :** तुम्ही कसल्या फिकीरीत पडलायत मुनीमजी ? माझे दागिने घेऊन जा बघू ! (**दागिने काढून समोर ठेवते**.) घ्या आणि माझा मुलगा आणून

द्या. चला, मीही तुमच्याबरोबर येते.

**बिसाखाराम** : तुम्ही सर्वजण का माझा जीव खाताय ? आणि हे दागिने तरी कुठून आले ? घरातलेच आहेत ना ?

**मुनीम** : मालक, उशीर होतोय. काही तरी हुकूम करा.

**राजोची आई** : मी सांगतेय ना...हे घेऊन जा. पठाणांना देऊन टाका.

**बिसाखाराम** : मुनीमजी, मी करू तरी काय ? अलीबक्सने आणलेले दागिने सोडवून नेले का ?

**मुनीम** : मालक, उशीर होतोय ! काबुली फाटकापर्यंत जायचंय ! लवकर हुकूम करा. (**बिसाखाराम दहा हजारांच्या विचाराने झोट आल्यासारखा पडतो.**)

**मुनीम** : मालक, काय हुकूम आहे आपला ? मी घाई करतोय. कारण दुकानातून मला कुणाला तरी बरोबर घेतलं पाहिजे.

**राजोची आई** : अहो, सांगा ? बोला ! नको बोलू दे ! मुनीमजी, घेऊन जा रुपये ! माझाही घरावर, दुकानावर काही हक्क आहे की नाही ? जा. उशीर करू नका !

**मुनीम** : जसा हुकूम (**जातो.**)

**राजो** : (**आईस**) आता, दादा येईल ना आई ?

**राजोची आई** : होय बाळ, मुनीमजी त्याला आणायलाच गेले आहेत. देवाचं नाव घे आणि प्रार्थना कर, सुंदर सुखरूप घरी परतू दे.

**बिसाखाराम** : (**एकदम शुद्धीवर आल्यासारखा**) मुनीमजी गेले ?

**राजो** : होय गेले बाबा.

**बिसाखाराम** : सगळ्या घराची धुळधाण केली ! कार्टा करंटा निघाला. मी पैसा कसा कसा कमावला. दहा हजार ! रामा रे ! (**परत अंग टाकतो**) राजोची आई, मरतोय मी आता !

**राजोची आई** : एवढी काय मोठी रक्कम आहे ? मुलगा घरी परतला तर मिळतील आणखी रुपये ! देवाने तर सर्व काही...परमेश्वरा, आमच्यावर दया कर. पण तुम्ही कसली एवढी काळजी करताय ?

**बिसाखाराम** : काळजी नको करू ? रक्त ओकून पैसा मिळविलाय, रक्त ओकून ! आज चाळीस वर्षं रात्रंदिवस काम करून रुपये कमावलेत (**परत अंग टाकतो.**)

**राजोची आई** : कमावलात नुसता फायदा ! ना जप, ना तप, ना तीर्थ, ना धर्म ! कधी हरिद्वारलासुद्धा जायचं झालं नाही. मला तर तुमच्या पैशाचा तसूभरही उपयोग झाला नाही. गावात चार घरं. पण पडलोयत या गल्लीत सडतकुजत. आज कमीत कमी तीन चार लाखाचे धनी असाल. पण कधी फुटकी कवडी दान म्हणून दिली नाही.

मी म्हणते करायचाय काय असला पैसा ?

**बिसाखाराम** : (**उठून**) तर मग आज आग लाव घराला. मुनीमजीने आजच्या विक्रीचा हिशेबही दिला नाही. बेईमान झालेत सारे. हरे रामा ! (**अंग टाकतात**) या नालायकामुळे दहा हजार रुपये. राजो, मुनीमजी कुठे गेलेत ?

**राजोची आई** : मी म्हणते पैसा मिळवायचा तरी कशासाठी ? आणि त्यात सुंदरचा काय अपराध ?

**बिसाखाराम** : मुनीमजी कुठे गेले ? वसुली करायला गेले असतील. परमेश्वरा, दया कर ! (**सुंदरलाल व मुनीम प्रवेश करतात. राजोची आई सुंदरलालला पाहून ओक्साबोक्शी रडू लागते. राजो भावाला बिकटते. सुंदरलाल धावत येऊन प्रथम वडिलांच्या आणि नंतर आईच्या पाया पडतो.**)

**बिसाखाराम** : (**मुलास पाहून**) आलास ? खूप आनंद झाला.

**राजोची आई** : मुलाला पाहून जीव कसा भांड्यात पडला. (**त्याला जवळ घेते.**) माझ्या जीवा !

**राजो** : दादा ! (**त्याच्या गळ्यात पडते.**)

**राजोची आई** : किती वाळलायस रे इतक्या दिवसात ?

**सुंदरलाल** : होय ग आई ! या राक्षसांच्या तावडीत कधी कुणी सापडायला नको. त्यांनी मला इतकं बेदम मारलं की सारं अंग सुजून निघालं...हाडन् हाड खिळखिळं झालं. पहा ना.

**बिसाखाराम** : फार छान झालं ? कसा आलास ? त्यांनी तुला तसंच सोडलं की काय ? मुनीमजी वसुलीत आज काय मिळालं ?

**सुंदरलाल** : (**मुनीमजीकडे पहात**) दहा हजार रुपये दिले होते ना ?

**मुनीम** : (**घाबरून**) हो, बाईसाहेबांनी तसा हुकूम दिला होता.

**बिसाखाराम** : काय ? पुरे दहा हजार !

(**धाडकन गादीवर कोसळतात. सुंदरलाल मुनीम राजो बिसाखारामकडे पहातात.**)

**राजोची आई** : (**सुंदरलालला थोपटत**) यांना झोप लागलीय. चल, बेटा ये.

(**पडदा पडतो.**)

## पात्रे

**सम्राट चंद्रगुप्त** : कुसुमपूरचे मौर्य सम्राट

**चाणक्य** : सम्राट चंद्रगुप्ताचे महामंत्री

**वसुगुप्त** : कुसुमपूरचे समाहर्ता (सहमंत्री)

**यशोवर्मन** : कुसुमपूरचे अंतपाल (अंतःपाल)

**पुष्पदंत** : कुसुमपूरचे कार्यान्तिक (कार्यवाह)

**अलका** : राजनर्तकी

**सैनिक** व **द्वारपाल**

(काळ : इ. स. पू. 322)

(बाहेर चारी दिशांना प्रचंड कोलाहल चालू आहे. मधून-मधून तुतारीचा नाद. शंख, आणि घंटांचाही आवाज ऐकू येतो. हळूहळू हा आवाज कमी होत जातो.)

(राजकक्षात समाहर्ता वसुगुप्त आणि अंतपाल यशोवर्मन बोलत बसले आहेत.)

**वसुगुप्त :** आज कुसुमपूरच्या जनतेचा आवाज कसा दमदार वाटतो आहे ! ढालीच्या मध्यभागाप्रमाणे तलवारीचे वार रोखण्यासाठी तो पुढे सरसावला आहे. कुसुमपूरचा उत्साह खरोखरच एखाद्या ढालीप्रमाणे विद्रोहाच्या कुठल्याही तलवारीला रोखू शकेल. आता तरी अंतपाल यशोवर्मन यांचा संदेह दूर झाला असेल.

**यशोवर्मन :** वसुगुप्त ! संदेह म्हणजे काही क्षणात फुटणारा पाण्याचा बुडबुडा नव्हे. संदेह असतो धूमकेतूच्या रेखेसारखा. आकाशाच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत पसरलेली आणि धूमकेतू कशाचं प्रतीक आहे माहीत आहे ? भीती, आशंका, अमंगळ यांचं !

**वसुगुप्त :** पण येथे ना कसली भीती, ना कसली आशंका, ना कसलं अमंगळ ! नंद वंशाचा विनाश झाल्याबरोबर पळसाच्या पानाप्रमाणे ही त्रयी अलग झाली.

**यशोवर्मन :** ती अलग झाली असतील. पण अजून आहेत ना ?

**वसुगुप्त :** ती आता नाहीतच. जेव्हा शक, पारस, यवन आणि वाल्हिक राजांच्या बरोबर चंद्रगुप्त महाराजांनी कुसुमपुरामध्ये प्रवेश केला. साऱ्या प्रजेने त्यांचं स्वागत केलं. या स्वागताच्या प्रचंड निनादात तुम्हाला उत्साहाचा सागर उसळत असलेला दिसला नाही ?

**यशोवर्मन :** परंतु या कोलाहलात व्यंग आणि उपहासाचा ध्वनी असलेलेही काही आवाज असतील ! नंद्राप्रती असलेली राजभक्ती अजून निष्प्राण झालेली नाही. हिरव्यागार गवतामध्ये काटेकुटेही असतीलच की !

**वसुगुप्त :** असेल तर ते उपटून काढता येतील.

**यशोवर्मन :** पण नंद महाराजांचे मंत्री राक्षस यांची नीती छद्मवेशात वावरते हे आपणास ठाऊक नाही का ? नंद नसले तरी नंदाचे मंत्री तर आहेत आणि ते गुप्तपणे कुसुमपूरच्या बाहेर निघून गेले आहेत.

**वसुगुप्त :** पण आम्हालाही ओळखता येतं की–(**लोकांचा आवाज वाढतो आहे.**), पाहिलंस, लोकांचा आवाज वाढतो आहे. तेवढी खिडकी बंद करा पाहू.

**यशोवर्मन :** हो, बोलणं ऐकायलाही येत नाही. (**खिडकी बंद करतो.**)

**वसुगुप्त :** हं तर, सम्राट चंद्रगुप्तानी कुसुमपूरमध्ये प्रवेश केल्यावर पहिलं कार्य जे करायचं आहे–ते म्हणजे इथली राज्यव्यवस्था नीट करणं.

**यशोवर्मन :** आचार्य चाणक्याच्या डोक्यात राजनीतीचे कितीतरी व्यूह रोज रचले जातात आणि मोडलेही जातात. राजकीय व्यवस्था पाहणारा त्यांच्याखेरीज दुसरा कोण आहे ?

**वसुगुप्त :** म्हणजे सम्राट चंद्रगुप्ताचं डोकं फक्त शौर्यापुरतंच चालतं की काय ?

**यशोवर्मन :** होय, आचार्य चाणक्यांची नीती आणि चंद्रगुप्तांचं शौर्य यांच्यामुळेच नंद वंश संपला. नंद वंशाची विलासी संध्याकाळ सम्राट चंद्रगुप्तांच्या यशोचंद्रिकेपुढे फार वेळ टिकू शकली नाही.

(**पडद्याआड 'सम्राट चंद्रगुप्त की जय' असा घोष होतो.**)

**वसुगुप्त :** (उत्सुकतेने) सम्राट आले ? म्हणजे जनतेचा हा कोलाहल त्यांच्या स्वागतासाठीच होता की काय ? खिडकी उघडून पहा बरं, यशोवर्मन.

**यशोवर्मन :** बघतो, (**खिडकी उघडतो, लोकांचा गोंगाट परत मोठ्याने ऐकू येतो.**) हो, लोक उत्सुकतेने फुलांचे हार फेकताहेत. महाराजांनी आतील प्रकोष्ठ सिंहद्वाराने प्रवेश केला आहे. यावेळी त्यांचा पेहराव फारच छान आहे. भव्य भाल-प्रदेश, सरळ नासिका आणि मोठाले लालसर डोळे. ते नागरिकांना काही सांगत असावेत. दिशादिशांतून दुरून आलेल्या आवाजाचे प्रतिध्वनी एकत्र येऊन उमटावेत त्याप्रमाणे त्यांच्या आवाजातून वीरत्व प्रकट होत आहे. नजरेच्या पलीकडे आपल्या आकांक्षा जशा वक्र होऊन दुहेरी दिसू लागतात तद्वतच त्यांच्या भुवयांवर स्वाभाविक ताण पडलेला आहे. कुरळ्या मोकळ्या सोडलेल्या केसांवर मुकुट आहे. त्याचा तुरा डोकं हलताच एखाद्या लज्जावती नारीच्या नजरेप्रमाणे झुकतो आहे. बाहूत शक्तीचा संचार झालेला आहे, पाहिल्यावर ते राज्याचे आधारस्तंभच असल्याची खात्री पटते. वेश सैनिकांसारखा, छातीवर मोत्यांच्या माळा, कमरेला मखमली म्यानात तलवार खुपसलेली. मोठी उत्साहदायक वेशभूषा आहे त्यांची !

**वसुगुप्त :** (**प्रसन्न नजरेने**) खरंच सम्राट हे वीररसाचं प्रतीकच आहेत मुळी !. तो पहा, द्वारपाल येतोय.

(**द्वारपालाचा प्रवेश**)

**द्वारपाल :** महाराजांचा विजय असो ! सम्राटांचं आगमन होत आहे ! हुश्शार !

**वसुगुप्त :** आम्हीदेखील त्यांच्या स्वागतासाठी तयार आहोत. तुम्ही निघा, बाहेर

प्रवेशद्वारी पुष्पवृष्टी होऊ द्या.

**द्वारपाल** : जशी आज्ञा ! **(निघतो)**

**यशोवर्मन** : सम्राटांनी तक्षशिलेत ग्रीक सैनिकांच्या संचलनाचे जे कौशल्य पाहिलं आहे त्या अनुभवाच्या जोरावर तर ते समस्त भारतावर आपलं साम्राज्य प्रस्थापित करू शकतात ! त्यांनी विदेशी राजनीती स्वीकारून एक प्रकारे भावी कार्यक्रमाची मुहूर्तमेढच रोवली आहे, आणि विशेष म्हणजे ही गोष्ट फारच थोड्यांना माहीत आहे.

**वसुगुप्त** : राजनीती बरोबर नाही ! हे सांगायचं आहे ना तुम्हाला ? **(आतल्या आत हसणं. सम्राटांच्या जयघोषानंतर, सम्राट चंद्रगुप्तांचा कार्यवाह पुष्पदंताबरोबर प्रवेश)**

**वसुगुप्त** आणि **यशोवर्मन** : **(एकाच स्वरात**. सम्राटांचा विजय असो !

**चंद्रगुप्त** : समाहर्ता वसुगुप्त ! कुसुमपुरीचं वैभव मी पाहिलं, पाहिल्यावर असं वाटतं–युद्धाच्या भैरवीनं काषायवस्त्र परिधान करून तिनं संन्यास घेतला असावा. तलवारीचा झणकार हवेत विलीन व्हावा तद्वत् नगरीची शोभा मलिन झाली आहे. नागरिकांचा हा कोलाहल कोल्हेकुईप्रमाणे वाटतो. त्याला आपल्याला मनुष्यत्व प्रदान करायचं आहे. जा, नागरिकांना जाऊन सांगा की त्यांनी आता आपआपल्या घरी परतावं.

**वसुगुप्त** : जशी महाराजांची आज्ञा ! **(निघतो)**

**(हळू–हळू कोलाहल कमी–कमी होत जातो.)**

**चंद्रगुप्त** : आणि अंतपाल यशोवर्मन ! जे तेज मी ग्रीक सैनिकांच्या सेवकांत पाहिलं होतं ते या कुसुमपूरच्या प्रतिष्ठित नागरिकांत देखील दिसत नाही. येथील माणसात निर्भीड सत्य सांगण्याची धमक नाही. कुसुमपूरला घेरणाऱ्या या शोण नदी-प्रमाणे, एक कपट, एक विटंबना यांनी त्यांना घेरून टाकलं आहे. हे दूर झालं पाहिजे यशोवर्मन !

**यशोवर्मन** : माझी खात्री आहे, सम्राट ! आचार्य चाणक्यांच्या या नीतीनं कुसुमपूर हे खऱ्या अर्थानं फुलासारखं सुंदर आणि आपल्या कीर्तीसारखं धवल होईल.

**(वसगुप्ताचा प्रवेश)**

**चंद्रगुप्त** : शक्य आहे. आर्य चाणक्यांच्या नीतीने कुसुमपूरच्या राजकारणात अशा एका चक्रव्यूहाची रचना केली आहे की अराजकता माजविणाऱ्यांना शेवटी त्यात मृत्यूच्या भिंतीकडेच जावं लागेल. आणि त्या मृत्यूच्या भिंतीच्या पायाखाली काय आहे, माहीत आहे ? संपूर्ण नंद घराणं चिरनिद्रा घेत आहे.

**वसुगुप्त** : आणि त्या नंद घराण्याच्या डोळ्यात विलासाची धुंदी शेवटच्या क्षणा-

पर्यंत तशीच राहिली आहे.

**चंद्रगुप्त :** मला या गोष्टीचा खेद वाटतो, परंतु राजनीती खड्गाच्या धारेच्या दिशेने जात असते जो कुणी विलासाचा बोजा आपल्या खांद्यावर घेऊन जातो तो स्वतःच या खड्गाला निमंत्रण देतो व आपल्या शरीराचे दोन तुकडे करायला लावतो, मी आचार्य चाणक्यांच्या चक्रव्यूहातील मृत्यूच्या भिंतीला जीवनाचा दीपस्तंभ बनवू इच्छितो !

**वसुगुप्त :** सम्राटांच्या बाहुबलात आणि आचार्य चाणक्यांच्या राजनीतीत ती क्षमता नक्कीच आहे.

**चंद्रगुप्त :** आचार्य चाणक्यांच्या मदतीने जे जे काही घडलं त्याबद्दल येथील नागरिकांच्या मनात क्षोभ उत्पन्न होणा उपयोगाचा नाही. तक्षशिलेच्या अनुभवाच्या जोरावर मी कुसुमपुरातील सर्व अडथळे दूर करू इच्छितो. प्रजेचं सुखसमाधान हाच शासनाचा मानदंड असला पाहिजे.

**यशोवर्मन :** सम्राट म्हणतात ते खरं आहे.

**चंद्रगुप्त :** यासाठीच एक महोत्सव साजरा करावा अशी माझी इच्छा आहे. तो म्हणजे, 'कौमुदी महोत्सव !' शरदातली पौर्णिमा आहे आज. समाहर्ता वसुगुप्ताच्या सूचनेनुसार मी दुपारी ह्या निर्णयाची घोषणा करून टाकली आहे. निसर्गाच्या या धवल चांदण्यात जनतेच्या हृदयातील सारे पापी विचार, साऱ्या वासना धुवून निघतील. कौमुदी महोत्सव म्हणजे कुसुमपुरातील एक मोठे राजकीय पर्वच ठरेल.

**वसुगुप्त :** महाराज ! कुसुमपुराचे सिंहद्वार आजपर्यंत स्वागत करत आले ते कोल्ह्यांचं परंतु आज मात्र आपल्या आगमनानं सिंहद्वाराच्या नावाचं खऱ्या अर्थानं सार्थक केलं.

**चंद्रगुप्त :** नागरिकांना प्रसन्न ठेवण्याच्या गोष्टी वसुगुप्त, तुम्हीच करू शकाल. म्हणूनच तर तुम्ही कुसुमपूरचे नागरिक असूनही मी कर वसूल करणाऱ्या समाहर्त्याच्या जागी तुमची नेमणूक केली. गोड गोड बोलून तुम्ही सहजरीत्या कर वसूल करू शकाल.

**वसुगुप्त :** ही महाराजांची कृपा.

**चंद्रगुप्त :** प्रजेचा संतोष हीच माझ्या सुखाची गुरुकिल्ली आहे. (**कार्यान्तिक पुष्पदंताला उद्देशून**) कार्यान्तिक पुष्पदंत ! कुसुमपूरच्या नागरिकांत 'कौमुदी महोत्सवा'-बद्दल आतुरता आहे ?

**पुष्पदंत :** सम्राट ! ज्या क्षणाला कौमुदी महोत्सवाची वार्ता नागरिकांच्या कानापर्यंत जाऊन पोहोचली त्या क्षणापासून प्रत्येक नागरिकाने त्या शूद्र महापद्मनंदाच्या क्रौर्याचा उपसंहार आपल्या औदार्याच्या भरतवाक्याने केला आहे. महाराजांनी आर्य

चाणक्यांच्या पद्धतीनं शस्त्र आणि धरणी—दोहोंचाही उद्धार केला आहे. आपलं कुसुमपुरातील आगमन म्हणजे शस्त्रविजयाची ग्वाहीच. परंतु तो शस्त्रविजय शास्त्राचं समाधान आणि पृथ्वीचं कल्याण या दोन्हींनी उजळून निघाला आहे.

**यशोवर्मन :** प्रजेतील काहीजण नंदाचे समर्थकही असू शकतील. नंद वंशाच्या विनाशानं त्यांचं क्षुब्ध होणंही स्वाभाविक आहे. म्हणूनच कौमुदी महोत्सवासंबंधी महाराजांनी केलेली घोषणा ही असंतोषाला सुख व ऐश्वर्यानं भरून टाकून त्यात राजभक्तीच्या लाटा उठवू शकेल. कौमुदी महोत्सवात कुसुमपुरातील रहिवासी आपल्या नगरीची शोभा पाहून आपल्यातील वैर—विरोध विसरून जातील. नगरीचे ऐश्वर्य पाहून त्यांच्या विचारांच्या दिशेला एक वेगळी गती मिळू शकेल ! परंतु आम्हाला मात्र हा उत्सव डोळ्यात तेल घालून पाहिला पाहिजे.

**वसुगुप्त :** डोळ्यात तेल घालून पहाण्याची तशी काही गरज नाही. नगरीचं ऐश्वर्य हे मातेचं ऐश्वर्य असतं. आपल्या मातेचं ऐश्वर्य पाहून कुणा पुत्राला आनंद होणार नाही ? एखाद्या अपरिचित माणसाने कल्याण चिंतिलं तरी ते सुखदायक वाटतं, मग प्रत्यक्ष आपल्यासारख्या उदार अशा सम्राटांकडून जनतेच्या कल्याणाची कामना व्यक्त केली गेल्यास ती कल्याण कामना नागरिकांच्या हृदयात महाराजांच्याबद्दल भक्ती आणि श्रद्धेची मंदाकिनी प्रवाहित केल्याखेरीज रहाणार नाही.

**चंद्रगुप्त :** असेच होवो ! (**कार्यान्तिक पुष्पदंताला उद्देशून**) कार्यान्तिक पुष्पदंत, बोला, कौमुदी महोत्सवाची काय व्यवस्था केली आहे ?

**पुष्पदंत :** महाराज, कौमुदी महोत्सवाच्या वेळी कुसुमपुराला सजविण्यासाठी नायकानं आपली सारी शक्ती पणाला लावली आहे. शोण आणि गंगेच्या संगमावर सम्राटांच्या शुभनावाच्या आकारामध्ये शंभर नौका सजवून त्यांवर चाळीस हात उंचीवर आकाश — दिव्यांची व्यवस्था करण्यात आलेली आहे. त्यामुळे शरदाच्या सुहास्य चांदण्यात सम्राटाचं नाव देखील दिव्यांच्या प्रकाशवलयात नागरिकांच्या हृदयात ठाण मांडेल..

**चंद्रगुप्त :** हे तर मानसशास्त्रीय चातुर्य म्हणावं लागेल ! आणखी...?

**पुष्पदंत :** नगराच्या लाकडी भिंतीच्या चौसष्ठ दरवाजांवर मंगल कलश झुलत असतील. दुरून पहाणाऱ्याला वाटावं कुसुमपूर प्रकाशाचं एक सरोवर असून त्याच्या चारी बाजूंवर दीपकिरणांच्या चौसष्ठ लहरीच प्रवाहित होत आहेत.

**चंद्रगुप्त :** ही सौंदर्यरचना खरोखर प्रशंसनीय अशीच आहे.

**पुष्पदंत :** नगर—कोटाच्या पाचशे सत्तर सज्ज्यांत (७ चबुतरे) नगरीतील तेवढ्याच किशोरी, रत्नजडित अलंकारांनी सजून, त्यांच्यावर सोडलेल्या प्रकाशझोतात नृत्य करताना दिसतील. त्यांचे नृत्य सुरू झाल्यावर त्यांनी परिधान केलेली रत्ने प्रकाश-

किरणांनी जेव्हा चमकू लागतील तेव्हा किरणकमलांच्या प्रकाशबिंदूचे भ्रमरच जणू क्रीडा करताहेत असं वाटेल.

**चंद्रगुप्त :** हे तर फारच छान !

**पुष्पदंत :** आणि महाराज, नगरतटाच्या चारी बाजूंच्या खंदकांतून जो शोण नदीचा प्रवाह सोडलेला आहे त्यात दिवे सोडलेले असतील. त्यामुळे दर्शकांना शहराच्या चारही बाजूंना दिव्यांची आकाशगंगाच वहात असल्याचा भास होईल.

**वसुगुप्त :** सम्राट ! नायकाला खरोखरच याबद्दल पुरस्कार मिळाला पाहिजे.

**चंद्रगुप्त :** अवश्य ! आणि कार्यान्तिक, आताच जाहीर करून टाका या महोत्सवासाठी जितके 'पण' खर्च करावे लागतील ते सर्व राज्यकोषातून खर्च न करता माझ्या 'चंद्रकोषातून'च खर्च होतील. या उत्सवामुळे प्रजेचं मनोरंजन होणार हे जरी खरं असलं तरी त्याच्या खर्चाचा भार मात्र मी वाहणार आहे.

**वसुगुप्त :** तो तर सम्राटांच्या मनाचा मोठेपणा आहे. महापातकी राजा महापद्म तर प्रजेकडून हजारो 'पण' जबरदस्तीने वसूल करून स्वत:च्या विलासासाठी खर्च करीत असे आणि त्याच वेळी प्रजेला मात्र मृत्युदंडाचा पुरस्कार मिळे. स्वत:ला एक राष्ट्र म्हणवून घेऊनही ते प्रजेच्या हृदयात स्वत:विषयी जराही आदराचं स्थान मिळवू शकले नाहीत. हीच स्थिती त्यांच्या पुत्राचीही. धनानंदाच्या कारकीर्दीतही हेच झालं.

**चंद्रगुप्त :** वसुगुप्त, या असल्या खर्चानी आपल्या ह्या समारंभाचा विचका उडणार नाही एवढं मात्र पहा.

**वसुगुप्त :** महाराज, चूक झाली ! क्षमा असावी !

**चंद्रगुप्त :** आणि कार्यान्तिक पुष्पदंत ! प्रजाभवनं कशी सजवली जातील ?

**पुष्पदंत :** सम्राट ! प्रजाभवनांच्या ठिकाणी रंगी–बेरंगी प्रकाश तोरणांची व्यवस्था करण्यात आली आहे. असं वाटेल की रात्रीच्या वेळी देखील महाराजांच्या राजधानीत सप्तरंगी इंद्रधनुष्य विविध नृत्य मुद्रांमध्ये सज्ज आहेत.

**वसुगुप्त :** आणि अशावेळी महाराजांच्या समोर नंद वंशाच्या राज नर्तकीच्या नृत्याची व्यवस्थादेखील व्हायला नको का ?

**यशोवर्मन :** ही वेळ शहराचं सौंदर्य पहाण्याची आहे, नर्तकीचं सौंदर्य पहाण्याची नाही.

**वसुगुप्त :** शहराचं सौंदर्य पाहून झाल्यावर महाराजांना विश्रांती नको का ? अशा वेळी झोपेला निमंत्रण देण्यासाठी राजनर्तकीच्या नृत्याची गरज आहेच.

**चंद्रगुप्त :** कार्यान्तिक पुष्पदंत ! निघा आणि नायकांना म्हणावं, कौमुदी महोत्सवाची सारी व्यवस्था लवकर पूर्ण झाली पाहिजे. माझ्या चंद्रकोषातून त्याला

पाच हजार 'पण' पुरस्कार म्हणून दिल्याचे जाहीर करा. कौमुदी महोत्सव सुरू होत असल्याची सूचना मला तूर्य नादानं मिळाली पाहिजे.

**पुष्पदंत :** जशी सम्राटांची आज्ञा. **(जातो)**

**चंद्रगुप्त :** नायकाला याबद्दल पुरस्कार मिळालाच पाहिजे. कुसुमपुरात अशी सौंदर्यरचना मला वाटतं पहिल्यानेच होत असावी! खरं ना, वसुगुप्त?

**वसुगुप्त :** निःसंशय, महाराज! कुसुमपुराला राहून मला इतकी वर्षं झाली परंतु नंद महाराजांनी कमालीचं विलासी जीवन जगूनही कधी आपल्या नगराला शृंगारलं नाही. आज कुसुमपूर खऱ्या अर्थानं सौंदर्याचं कुसुम बनलं याचं श्रेय आपल्याच राजवटीला आहे.

**चंद्रगुप्त :** वसुगुप्त! तुम्ही केलेल्या प्रशंसेत अतिशयोक्ती फार असते. इतकी प्रसंशा ऐकल्यावर मला कधी कधी संशय यायला लागतो.

**वसुगुप्त :** कोणत्या बाबतीत, महाराज?

**चंद्रगुप्त :** जे तुम्ही सांगत आहात त्यात सत्य किती असेल याचा.

**वसुगुप्त :** महाराजांनी परीक्षा घेऊन पहावं. सत्याला सत्य म्हणणं यात मला अतिशयोक्ती वाटत नाही. महाराज! आणि सम्राट देखील स्वत: स्पष्टवक्ते आहेत! तेव्हा सम्राटांना हे ज्ञात नाही असे थोडेच आहे.

**चंद्रगुप्त :** ह्या चंद्रगुप्ताला रणनीतीखेरीज इतर काही समजून घेण्याची इच्छा नाही, वसुगुप्त! समाहर्त्याच्या नवीन पदावर तुमची नियुक्ती करण्याबाबतही महामंत्री चाणक्यांचा निर्णय याबाबत मला विचारायला त्यांना सवडच झाली नाही.

**यशोवर्मन :** आर्य चाणक्यांनी विचारणं फारच आवश्यक होतं, महाराज!

**वसुगुप्त :** यशोवर्मन, माझा अपमान करण्याची तुम्हाला काही गरज नाही. अशानं तुम्ही मला युद्धाला प्रवृत्त करताहात!

**यशोवर्मन :** सम्राटांचा सेवक आणि आचार्य महामंत्री चाणक्यांचा शिष्य या नात्यानं मी आपल्याशी द्वंद्वयुद्ध करायला तयार आहे, वसुगुप्त! सम्राट! मला द्वंद्वयुद्धासाठी परवानगी असावी.

**चंद्रगुप्त :** यशोवर्मन, हा राजपरिसर आहे, रणांगण नाही, समजलं? कौमुदी महोत्सवाला रक्तस्नानाची आवश्यकता नाही! तुम्हीही इतक्या लवकर चिडणं योग्य नाही.

**वसुगुप्त :** क्षमा असावी, महाराज! परंतु सत्याला अभय असावं!

**चंद्रगुप्त :** अवश्य, अवश्य. आणि आज कौमुदी महोत्सवात तर सौंदर्याचं रक्षण होईल! बरं, राजनर्तकीसंबंधी तुमचं काय म्हणणं होतं?

**वसुगुप्त :** महाराज, या सेवकाचं म्हणणं एवढंच की महाराजांच्या विश्रांतीच्या

वेळी निद्रेला निमंत्रण देण्यासाठी राजनर्तकीच्या नृत्याची गरज असावी.

**चंद्रगुप्त :** बरोबर आहे, असली पाहिजे.

**वसुगुप्त :** मग महाराज, मी तिच्या वेशभूषेची स्वतंत्र व्यवस्था केलेली आहे. ती राजभवनाच्या उत्तरेकडील दालनात वेशभूषा करून तयार असेल.

**चंद्रगुप्त** माझ्या इच्छेपूर्वीच कार्याची सज्जता करणाऱ्या तुमच्यावर वसुगुप्त, मी प्रसन्न आहे. तुम्ही कौमुदी महोत्सवात सतत माझ्याबरोबर रहाल.

**वसुगुप्त :** हे मी माझं भाग्य समजतो, महराज !

**चंद्रगुप्त :** यावेळी अठरा विषयांचं शिक्षण जिथं दिलं जातं त्यात तक्षशिलेची मला आठवण येते. हजारो विद्यार्थी तेथे होते. माझा एक मित्रही तेथे होता. तुम्हीदेखील त्याचं नाव ऐकलं असेल. प्रसिद्ध संस्कृतज्ञ कात्यायन !

**वसुगुप्त :** ते तर व्याकरणकार पाणिनींचे स्वाध्यायसिद्ध शिष्य म्हणून प्रसिद्ध आहेत, महाराज.

**चंद्रगुप्त :** बरोबर, मी त्यावेळी आयुर्वेद, धनुर्वेद आणि शल्य शिकत होतो आणि कात्यायन वेद आणि व्याकरण शिकत होता. पाणिनीचं व्याकरण–सूत्र भाषा व साहित्याच्या आधीच चालू असायचं. तसंच तुमचं कार्य देखील माझी इच्छा व्यक्त होण्यापूर्वीच होत असतं.

**वसुगुप्त :** आपण माझा गौरव करताहात, प्रभू !

**चंद्रगुप्त :** तेथेच आचार्य चाणक्यांशी दोस्ती झाली. नीतिनिपुण आर्य चाणक्यांच्या बुद्धी आणि अंतर्दृष्टीला तोंड देणारी समस्त आर्यावर्तामध्ये दुसरी एकही व्यक्ती मिळणं शक्य नाही. आज ते माझे आचार्य आणि महामंत्री आहेत हे माझं केवढं मोठं भाग्य !

**यशोवर्मन :** सम्राट ! आचार्य चाणक्यांची नीती अमर होण्याइतकी श्रेष्ठ आहे. राजनीती बरोबरच आयुर्वेद आदींमध्ये देखील आचार्य चाणक्य निपुण आहेत. चीनचे एक राजकुमार आपल्या नेत्रचिकित्सेसाठी तक्षशिलेत आले होते. आचार्य चाणक्यांनी एका आठवड्याच्या अवधीत त्यांची चिकित्सा पूर्ण करून यांना स्पष्ट दृष्टी दिली.

**चंद्रगुप्त :** हे मला माहीत आहे. त्यांच्या राजनीतीवर मुग्ध होऊन तक्षशिलेचा शासक राजा आंभिक त्यांना तक्षशिलेतच रहाण्याचा आग्रह धरत होता. परंतु त्यांनी तिथं रहाणं पसंत केलं नाही. त्यांनी मला त्यांच्या मदतीनं एका स्वतंत्र राज्याची स्थापना करण्याचं आश्वासन दिलं होतं.

**यशोवर्मन :** आणि महाराज, त्याचं ते आश्वासन शेवटी किती खरं ठरलं !

**वसुगुप्त :** का खरं ठरणार नाही ? मानवी हृदयाला जाणून घेण्याची त्यांची अंतर्दृष्टी इतकी तीक्ष्ण आहे की ते एका क्षणात त्याचा संपूर्ण कार्यक्रम स्पष्टपणे सांगू

शकतात. काम करण्याची कला फक्त त्यांना अगवत आहे. अपूर्व शक्ती, अपूर्व साहस आणि अपूर्व बुद्धी यांचा मोठा अलौकिक संगम त्यांच्या ठायी दिसून येतो.

**यशोवर्मन** : आचार्य म्हणजे एक नररत्नच आहे, सम्राट ! आपल्या सहकार्यानं ते राज्याला निष्कंटक बनवून टाकतील.

**चंद्रगुप्त** : मला देखील तसंच वाटतं, परंतु कौमुदी महोत्सवाबाबत मात्र मी आचार्यांशी चर्चा करू शकलो नाही. युद्धाच्या गुंतागुंतीपुढं वेळंच मिळाला नाही. परंतु याची खबर त्यांना मिळाली असेल खास !

**वसुगुप्त** : ते आपल्या सूचनेला पाठिंबा देतीलच. कौमुदी महोत्सवाची उपयुक्तता आणि प्रासंगिक महत्त्व तर त्यांनी आपल्या अंतर्दृष्टीनं नक्कीच जाणून घेतलं असावं. बरं तर आता वेळ फार झाला. महाराज, मग राजनर्तकीच्या नृत्याबाबत काय ठरलं ?

**चंद्रगुप्त** : काय नाव आहे तिचं ?

**वसुगुप्त** : 'अलका', महाराज, ती निर्दोष सुंदरी आणि अद्वितीय नृत्यकला सम्राज्ञी आहे.

**चंद्रगुप्त** : मला पहिल्यानं तिला पहावं लागेल.

**वसुगुप्त** : अवश्य पहावं, महाराज. ती राजवाड्याच्या उत्तरेकडील दालनात वेशभूषा करून तयार आहे. आपली परवानगी असल्यास तिला महाराजांच्या सेवेला निरीक्षणासाठी हजर करतो.

**चंद्रगुप्त** : असंच करा.

**वसुगुप्त** : जशी आज्ञा, महाराज ! मी तिची लगेच सम्राटांच्या सेवेला रवानगी करतो.

(**वसुगुप्ताचं प्रसन्न गमन**)

**चंद्रगुप्त** : अंतपाल यशोवर्मन ! आज राजनर्तकी अलकेचं नृत्य पाहून कुसुमपुरातील उत्कृष्ट नृत्यकलेचा परिचय होईल.

**यशोवर्मन** : महाराजांपाशी माझं एक नम्र निवेदन आहे.

**चंद्रगुप्त** : मग वेळ कशाचा ?

**यशोवर्मन** : विलासी नंद घराण्याच्या राजनीतीमध्ये या राजनर्तकी अलकाचा समावेश होता.

**चंद्रगुप्त** : ही राजनर्तकी अलका !

**यशोवर्मन** : होय महाराज ! ती नंदवंशाच्या विनाशाचं कारण बनली हा दुर्दैवानं तिच्या जीवनातील सर्वांत मोठा शाप ठरला आहे, म्हणूनच तिला निर्दोष म्हणता येणार नाही.

**चंद्रगुप्त** : निर्दोष ! सर्वच दृष्टीनं तिला दोषी म्हणावं लागेल. गौतम ऋषीनं

अहिल्येला शाप का दिला ? तिनं काय आपलं सौंदर्य सुरक्षित राखलं नव्हतं ? तरीपण ती इंद्राला का ओळखू शकली नाही ? शचीचं सौभाग्य अप्सरांना वाटून टाकणाऱ्या इंद्राच्या लालसेचा परिचित हवा का ? तशीच अलका काय नंद महाराजांना ओळखू शकली नाही ? तिच्या अंगरागाच्या रक्तरेषा वीज बनून नंद महाराजांच्या डोळ्यात चमकू शकल्या नाहीत ? यशोवर्मन, तुम्हाला ठाऊक आहे आकाशातील उल्का प्रकाशानं भरलेली असते परंतु जेव्हा ती दिसू लागते तेव्हा जगात काहीतरी अमंगल घडणार अशी शंका निर्माण होते.

**यशोवर्मन :** सम्राटानाच जर असं वाटतं तर तिच्या नृत्याला आपण अनुमती का देता आहात ?

**चंद्रगुप्त :** केवळ कौमुदीमहोत्सवांला शोभा यावी म्हणून. आणि सम्राट चंद्रगुप्ताने महाराज नंदाच्या आश्रितांशी सहानुभूतीचं धोरण ठेवलं याचा कुसुम-पुरच्या जनतेच्या मनाला आनंद व्हावा म्हणून. तुम्हाला माहीत आहे का, यशोवर्मन ! महाराज नंदासाठी जे विष ठरलं त्याचं मला अमृतात रूपांतर करायचं आहे.

**यशोवर्मन :** सम्राट तक्षशिलेचे स्नातक आहेत. राजनीतीमध्ये राजनर्तकीचे स्थान कोणते हे सम्राट जाणतातच.

**चंद्रगुप्त :** कृपाणाच्या धारेला झाकणाऱ्या या म्यानाचे जे स्थान तेच राजनीतिरूपी कठोर कृपाणाचा उच्छेद झाकण्यासाठी राजनर्तकीरूपी आवरणाची आवश्यकता आहे. पण ते आवरण कृपाणाच्या धारेला बोथट करीत नाही. राजनीतीमधील पौरुषत्व प्रजेला स्पष्ट दिसलंच पाहिजे.

**यशोवर्मन :** खरं आहे, सम्राट !

**चंद्रगुप्त :** पण महाराज नंदाची राजनीती एका राजनर्तकीसमोर कुंठित झाली. तलवारींची म्यान बनून राहिली. पण मी राजनर्तकीला म्यान करू इच्छितो. (थांबून) कौमुदी महोत्सवाची तुतारीद्वारे केलेली सूचना मी ऐकली नाही. काय बरं कारण ?

(वसुगुप्ताचा प्रवेश)

**वसुगुप्त :** सम्राट, राजनर्तकी सेवेला हजर आहे.

**चंद्रगुप्त :** तिला हजर करा. संगीत आणि नृत्यानं तिला हे दालन उजळून टाकू द्या.

**वसुगुप्त :** अशी सम्राटांची आज्ञा ! (प्रस्थान)

**चंद्रगुप्त :** अंतपाल यशोवर्मन ! नृत्य आणि संगीत ज्यात उत्साहाची कल्पना मांगल्याच्या रंगांनी चितारली जाते अशा कौमुदी महोत्सवाची सुरवातच मुळी ! नृत्य ही तर सुखाचं रहस्य जागत ठेवणारी अशी ही माझी एक मनोहर भावनाच !

**(वसुगुप्ताबरोबर राजनर्तकी अलका प्रवेश करते.)**

**अलका** : महाराजांच्या सेवेला या अलकेचा प्रणाम स्वीकारावा !

**(अत्यंत कोमल भावाने प्रणाम करते)**

**चंद्रगुप्त** : **(हात उंचावून)** कुसुमपुराची शोभा आणि श्री ची अधिवासिनी हो. **(यशोवर्मनला)** तुम्ही जाऊ शकता.

**यशोवर्मन** : जशी आज्ञा, सरकार ! या नृत्य–महोत्सवात आचार्य चाणक्यांनीही भाग घ्यावा अशी माझी आपल्या चरणी नम्र प्रार्थना आहे.

**चंद्रगुप्त** : **(हसून)** आचार्य चाणक्य ? राजनीतीचा काव्याशी संबंध जोडू म्हणता. माझा मुळीच विरोध नाही. वाटल्यास त्याना इकडे पाठवू शकता. ते देखील राजकारणातील कुटिल कारस्थानांनी कंटाळून गेले असतील. त्यांनाही विश्रांतीची गरज असेलच ! राजनीतीच्या मस्तकाला आज नृत्यातील काव्याच्या हृदयाची साथ मिळू देत.

**वसुगुप्त** : जशी आज्ञा, महाराज **(प्रस्थान)**

**चंद्रगुप्त** : राजनीती आणि काव्य **(नर्तकीला उद्देशून)** राजनर्तकी ! तू राजकारणाच्या ठेक्यावर नाचू शकशील ?

**अलका** : महाराज, आजपर्यंत राजनीतीच तर माझ्या नृत्याचा ठेका होती. परंतु मी त्याकडे कधी लक्ष दिलं नाही. महाराज, राजनर्तकीचा राजनीतीशी काय संबंध ? ती तर राज्याची अनुगामिनी आहे.

**चंद्रगुप्त** : **(हसून)** ह्याच कपटी शब्दांनी अनुगामिनी स्वामिनी बनत असते, राजनर्तकी ! महाराज नंद तुझ्यावर मोहित होते की तू नंद महाराजांवर मोहित होतीस ?

**अलका** : क्षमा असावी, महाराज ! खरी नारी मोहित होऊ इच्छित नाही. ती आत्मसमर्पण करू इच्छिते. जी नारी मोहित होते ती स्वत:च्या रूपाचा व्यापार करते, हृदय देत नाही.

**चंद्रगुप्त** : तुझा कोणत्या व्यापारावर विश्वास आहे. रूपाच्या व्यापारावर की हृदयाचा व्यापारावर ?

**अलका** : हृदयाचा व्यापार होत नसतो, अधिपती !

**चंद्रगुप्त** : बरं, हृदयाचं समर्पण ?

**अलका** : त्यात समर्पणाची भाषा असू शकत नाही, महाराज. ज्यात समर्पणाची भाषा असते, ते समर्पण व्यापार बनतं आणि हृदयाचा व्यापार कधी होत नसतो.

**चंद्रगुप्त** : परंतु नंद महाराज तर हृदयाचा व्यापार करीत असत आणि त्या व्यापारात आपलं सारं साम्राज्य ते गमावून बसले ! काय, हे खरं नाही ?

**अलका :** खरं आहे, सम्राट ! परंतु पुरुष हा व्यापारी आहे. तो आपल्या व्यापारात सारं काही लुटू शकतो.

**चंद्रगुप्त :** राजनर्तकी, पुरुषांच्या बाबतीत तुझा दृष्टिकोण अति हीन वाटतो.

**अलका :** अगदी तशीच पुरुषांची नारीबाबत हीन दृष्टी असते. ते नारीला विलासाची सम्राज्ञी बनवून टाकतात.

**चंद्रगुप्त :** परंतु अशी बळजबरीने नारी विलास सम्राज्ञी थोडीच बनते ? ती आपल्या विजयासाठीच विलासाची सम्राज्ञी बनते आणि दोष मात्र पुरुषांना देते.

**अलका :** सम्राट–राजनीतीचे पंडित आहेत. आणि ही दासी राजकारणाच्या पायाखाली तुडविली गेलेली धूळ आहे, महाराज ! यावर मी काय बोलणार ?

**चंद्रगुप्त :** परंतु राजनर्तकी, धूळ देखील डोळ्यात जाऊ शकते.

**अलका :** बरोबर आहे, महाराज. परंतु तिला पायांनी ठोकरल्यानंतरच ! परंतु या सेविकेचा तो अधिकार नाही.

**चंद्रगुप्त :** अधिकार नव्हे, राजनर्तकी ! ही तर तिची गती आहे. गतीत अधिकाराचं अवडंबर नसते, तीत असते ती विद्युतशक्ती आणि तुझ्यात ती विद्युतशक्ती आहे–जी कडाडली आणि हृदयाच्या आकाशाचा भेद करून जिनं नंदासारख्या विशाल शाल वृक्षाला मातीत मिळवलं !

**अलका :** तर मग मला स्वत:ला विद्युल्लतेप्रमाणे पृथ्वीच्या उदरात विलीन झालं पाहिजे, महाराज !

**चंद्रगुप्त :** जमिनीत विलीन व्हायला राजनर्तकी कोणी महासती सीता थोडीच आहे ! राजनर्तकीला तर राज्याचा शृंगार करावा लागतो.

**अलका :** हाच माझ्या जीवनाचा कलंक आहे, महाराज ! जी फुलं प्रेताला शृंगारतात अशा फुलांचं सौंदर्य काय कामाचं ? आज आपल्या चरणी समर्पित होऊन मी माझ्या जीवनातून मुक्त होईन.

**चंद्रगुप्त :** अशी निराश होऊ नकोस, राजनर्तकी ! तुला माहीत आहे–आज कौमुदी महोत्सव आहे. कुसुमपुरातील जनता आज माझ्याबरोबर आनंदविभोर व्हायला उत्सुक आहे. आज आपल्या मधुर गाण्यानं वातावरण भारून टाकण्याचं तुझं काम आहे.

**अलका :** जशी महाराजांची आज्ञा ! परंतु आजपासून मी राजनर्तकीच्या पदाचा त्याग करून आपल्या चरणसेवेत स्वत:चा उद्धार करून घेईन.

**चंद्रगुप्त :** राजनर्तकी तू हे महाराज नंदाशी बोलत नसून सैनिक चंद्रगुप्ताशी बोलत आहेस हे लक्षात ठेव. माझ्या पायांची धूळ मला वीरांच्या परंपरेसाठी राखून ठेवायची आहे. राजनर्तकींच्या परंपरेसाठी नाही. परंतु मी तुझ्यावर प्रसन्न आहे. तू कुसुम-

पुरातील नागरिकांना नृत्याचं शिक्षण देत जा आणि त्याचा शुभारंभ आजच्या या कौमुदी महोत्सवात तुझ्या नृत्यानं होऊ दे. तुझं नृत्य सुरू होऊ दे. कुसुमपुराचं आसमंत तुझ्या नुपुरांच्या झंकारानं नादमय होऊन कौमुदी महोत्सवाचं निमंत्रण दशदिशांना पोहोचू दे.

**वसुगुप्त :** अलका ! तुला कुसुमपूरच्या आदर्श नृत्याचा परिचय सम्राटांना करून द्यायचा आहे. यावेळी तुझ्या नृत्यानं सम्राट नृत्यविभोर होऊन आपल्या जीवनांतील सारं दुःख विसरून जातील असं नृत्य तुला करायचं आहे.

**चंद्रगुप्त :** मला तर कोणताच विषाद नाही, वसुगुप्त !

**वसुगुप्त :** सम्राटांना विषाद असेलच कसा ! ते तर सैनिक आहेत. सैनिकाला आणि विषाद ? कसं शक्य आहे ? मला एवढंच सांगायचं होतं की कुसुमपुरातील नागरिकांच्या हिताचा विचार करणारं आपलं मन थकलं आहे. त्याला...

**चंद्रगुप्त :** ठीक आहे. राजनर्तकी, नृत्य चालू द्या !

**अलका :** जशी आपली आज्ञा महाराज ! ( **प्रणाम करून नृत्याला सुरुवात करते. काही क्षण नृत्य केल्यावर मधुर स्वरात गाते.**)

आज मधुमय कुसुमाचे द्वार–
द्वारी आहे भ्रमराचे गुंजन !
सजले होते मधुवनचे रस्ते,
पवन वाहतो हलके हलके,
फुला जवळी उमलली कळी,
आणि नभातुनि संध्येने उतरुन,
लाविले नेत्रांत अंजन !
आज मधुमय कुसुमाचे द्वार–
द्वारी आहे भ्रमराचे गुंजन !

**(काहीं क्षण नृत्य चालू राहतं. शेवटी सम्राटांच्या तोंडून प्रशंसोद्‌गार निघतात)**

**चंद्रगुप्त :** फार छान, राजनर्तकी अलका ! तू जेवढी सुंदर आहेस, तेवढंच तुझं नृत्यदेखील सुंदर आहे. हा घे पुरस्कार !

**(चंद्रगुप्त आपल्या गळ्यातून मोत्यांची माळ काढतो, इतक्यात आचार्य चाणक्य प्रवेश करतात.)**

**चाणक्य :** सम्राट, पुरस्कार देणं थांबवा !

**चंद्रगुप्त : (आश्चर्यानं थांबून)** महामंत्री चाणक्य ?

**चाणक्य :** सम्राट ! आग विझली तरी राख गरम असते. ती तुम्ही हातानं उचलू शकणार नाहीत. कुसुमपूरची आग एखाद्या थोड्या वेळात शीतल झाली असेल, त्यात

फुलांचे ताटवे फुलवता येतील—असं तुम्हाला वाटलं तरी कसं ?

**चंद्रगुप्त** : महामंत्री, चंद्रगुप्ताचा जीवनाचं वैभव फुलांच्या ताटव्यात नव्हे तर समरांगणावर आहे असं वाटतं. जीवनाचं गीत नुपुरांच्या झंकारात नव्हे तर तलवारीच्या खणखणाटात गायलं जातं. क्षणिक मनोरंजनामुळे तुम्हाला असं वाटलं की या चंद्रगुप्ताचं समरांगण फुलांचा बगिचा बनला आहे. ही क्षणिक विश्रांती म्हणजे भावी युद्धाचा पाया आहे हे तुमच्या लक्षात यायला हवं होतं.

**चाणक्य** : आणि सम्राट चंद्रगुप्त ! या क्षणिक विश्रांतीमध्येच जीवनाचा अंत झाला तर ? तुमच्या भावी वैभवाचं समरांगणच तुमचं स्मशान बनलं तर ?... त्या विश्रांतिक्षणाला तुम्ही काय म्हणाल ?

**चंद्रगुप्त** : आर्य विश्रांतिक्षणाची सीमा काय असते आणि केवढी असते हे ओळखण्याचं तारतम्य चंद्रगुप्ताकडे...

**चाणक्य** : (**मध्येच**) नाही. हे ओळखूनच मी आपल्याबरोबर सैनिक घेऊन आलो आहे. (**हाक मारत**) सैनिकांनो ! राजनर्तकी आणि समाहर्ता यांना आपल्या ताब्यात घ्या. (**सैनिक आतून पुढे येतात**)

**वसुगुप्त** : सम्राट, राजमर्यादेची अवज्ञा होत आहे, रक्षण करा.

**चंद्रगुप्त** : महामंत्री, वसुगुप्त आमचे नवीन समाहर्ता आहेत.

**चाणक्य** : परंतु यावेळी ते बंदी आहेत. सैनिकांनो, दोघांना ताब्यात घ्या. आणि जर विरोध झाला तर बल प्रयोग करायला हरकत नाही.

**वसुगुप्त** : (**करुण स्वरात**) मी निर्दोषी आहे. मी निर्दोषी आहे, सम्राट ! महामंत्री ! मी निर्दोषी आहे.

**अलका** : (**अतिशय करुण स्वरात**) मला कोणीही स्पर्श करू नका. मी एक स्त्री आहे. स्त्रीचा मान राखला जाऊ दे, सम्राट ! स्त्रीचा मान राखला गेला पाहिजे. मी स्वतःच तुमच्या अधीन होते. हाय ! स्त्री बंदिवासात, नेहमीच बंदिवासात, जीवनभर बंदिवासात !

(**विव्हळते**)

**चंद्रगुप्त** : (**पुढे होऊन**) आर्य चाणक्य...

**चाणक्य** : यावेळी काहीही बोलू नका, सम्राट चंद्रगुप्त ! चाणक्य आपली कर्तव्ये चांगलीच ओळखतो. सैनिकांनो ! दोघांनाही ताब्यात घेऊन दुसऱ्या दालनात जा.

**सैनिक** : जशी आज्ञा !

(**दोघांना बंदी करून सैनिक जातात**)

**चंद्रगुप्त** : ही राजमर्यादेची सर्वात मोठी अवहेलना आहे, महामंत्री ! ज्या राजमर्यादेची पूजा आम्ही रक्ताने केली त्या राजमर्यादेला हे क्षुद्र सैनिक आपल्या पायांच्या

धुळीनं कलंकित करताहेत, ही कसली राजनीती ! आज कौमुदीमहोत्सवाच्या समारंभसमयी...

**चाणक्य** : कौमुदीमहोत्सव ?

**चंद्रगुप्त** : हो, कौमुदी महोत्सव. माझी घोषणा आपण ऐकली नाही का ?

**चाणक्य** : ती ऐकण्यालायक नव्हती.

**चंद्रगुप्त** : आपण राजमर्यादेचा एवढा अपमान का करता आहात, महामंत्री ? कौमुदी महोत्सवाची घोषणा ही कुसुमपुरातील माझी पहिलीच राजघोषणा आहे.

**चाणक्य** : ही राजघोषणा जन्माला येण्यापूर्वीच संपली आहे.

**चंद्रगुप्त** : (**आश्चर्याने**) संपली ? धाडस कुणी केलं ?

**चाणक्य** : मीच, आर्य चाणक्यानं !

**चंद्रगुप्त** : तरीच मला घोषणेचा तूर्यनाद ऐकू आला नाही. म्हणजे आपण कौमुदी महोत्सवाची घोषणा होऊच दिली नाही तर !

**चाणक्य** : होय, मीच ती घोषणा होऊ दिली नाही.

**चंद्रगुप्त** : मला याचं कारण समजलं पाहिजे.

**चाणक्य** : मी कारण सांगू शकत नाही.

**चंद्रगुप्त** : सम्राट कोण आहे ? चंद्रगुप्त की चाणक्य ?

**चाणक्य** : चंद्रगुप्त !

**चंद्रगुप्त** : तर मग सम्राट चंद्रगुप्ताच्या आज्ञेची अवहेलना का होते आहे ?

**चाणक्य** : एवढ्याचसाठी की ती आज्ञा एखाद्या हट्टी बालकाच्या हट्टासारखी आहे.

**चंद्रगुप्त** : तरीही त्याचं रक्षण केलं पाहिजे.

**चाणक्य** : नाही, लहान मुलाला ज्वाला पकडायची इच्छा असते म्हणून का कोणी त्याला ज्वालेला हात लावू देते ?

**चंद्रगुप्त** : हा तुमचा अहंकार आहे, महामंत्री.

**चाणक्य** : हे तुमचं अज्ञान आहे, सम्राट.

**चंद्रगुप्त** : (**क्रुद्ध होऊन**) महामंत्री ! कुसुमपूरवर विजय मिळविण्यात तुमचा हात आहे हे खरंच आहे. पण या एवढ्या छोट्याशा विजयानं तुमच्या अहंकाराच्या ठिणगीचं फुंकर मारून ज्वालेत रूपांतर झालं की काय ? या तुमच्या अहंकारानं चितेची आग पेटेल आणि त्यात तुमची राजनीती जळून भस्म होऊन जाईल.

**चाणक्य** : मला याची मुळीच चिंता नाही, सम्राट ! अहंकार हा माझा स्वाभाविक अधिकार आहे. त्याच्यावर शासनाची सत्ता नाही. परंतु मी तुम्हाला स्पष्ट करू इच्छितो की चाणक्याच्या अहंकाराच्या ठिणगीचं रूपांतर स्वर्ग मिळाला तरीही आगीत होणार नाही. हा अपमानाच्या हलक्याशा झुळुकेनं तो दावाग्नी बनून तुमच्या

**वैभवाचं नंदनवन** क्षणभरात भस्मसात करेल. तुम्हाला नंद वंशाच्या विनाशाची पुनरावृत्ती पहायची आहे काय ?

**चंद्रगुप्त :** आर्य चाणक्य ! सैनिक चंद्रगुप्त म्हणजे विलासी नंद नव्हे. नंद अधःपतनाच्या दरीच्या टोकावर उभा राहिलेला असल्याने राजनीतीच्या हलक्याशा धक्क्याचीच त्याला गरज होती. मौर्य चंद्रगुप्त हिमालयासारखा कणखर आहे. महामंत्री चाणक्यांच्या कुटिल राजनीतीची घोंघावणारी वादळे त्याला कणभरही विचलित करू शकणार नाहीत.

**चाणक्य :** मौर्य चंद्रगुप्त ! क्षत्रियत्वाचं एवढं अधःपतन व्हावं की त्यानं ब्राह्मणावर पदाघात करावा ? मौर्य हिमालयासारखा कणखर कसा झाला हे तुम्हाला माहीत आहे ना ? या ब्राह्मणाच्या राजनीतीच्या पायावर त्याचा कणखरपणा उभा राहिला आहे. जर हा पाया एक क्षणभर जरी अलग झाला तर तो हिमाद्री आजूबाजूच्या झाडांसकट इतक्या वेगाने खाली कोसळेल की त्याला सरळ समुद्रतळच गाठावा लागेल. आणि मग समुद्राच्या लाटा या ब्राह्मणाच्या चरणावर लोटांगण घ्यायला येतील आणि हा ब्राह्मण तिकडे ढुंकूनसुद्धा बघणार नाही.

**चंद्रगुप्त :** आर्य चाणक्य ! जगात जी एवढी प्रतापशाली राज्ये झाली ती काय सगळी महामंत्री चाणक्यांच्या राजनीतीच्या बळावरच उभारली गेली काय ? या सगळ्या राज्यांची ताकद महामंत्री चाणक्यांच्या ताकदीकडून भिक्षा मिळवूनच चालली काय ? आणि चंद्रगुप्त काय एवढा दुर्बल आहे की तो त्या ताकदीच्या जोरावरच विजय मिळवू शकेल ? तेव्हा त्या शक्तीचं कौतुक पुरे झालं ! मी तिला आजच दूर करतो. महामंत्री चाणक्य आपणास महामंत्री पदातून मुक्त केलं आहे.

**चाणक्य :** मौर्य, घ्या आपलं शस्त्र ! (**फेकतो**) हा कलंक याचवेळी धुवून टाकतो. राजमंत्री राक्षसाच्या दुष्टचक्रात सापडलेल्या चंद्रगुप्ता ! माझी जटा सोडून मी परत विनाशाची प्रतिज्ञा करू की काय ? ज्या ब्राह्मणाच्या जटा नागिणीनं एकाच दंशात नंदवंश संपवून टाकला त्या नागिणीवर मौर्यही हात टाकू इच्छितो काय ? ज्या चंद्रगुप्ताला आपला समजून कुसुमपुराच्या सिंहासनावर आरूढ केलं त्या चंद्रगुप्ताच्या विनाशानं काय स्मशान सुसज्जित करू ? वारे ब्राह्मण ! ब्रह्मज्ञान सांगणारा आज राज्यातील कुचक्रांमुळे लज्जास्पद झाला आहे. आज आपल्याच हातानं मी वीष पीत आहे. परंतु चंद्रगुप्त, लक्षात असू द्या, माझ्यामध्ये कालकूट पिणाऱ्या शंकराची शक्ती आहे.

**चंद्रगुप्त :** समजलं चाणक्य ! (**शस्त्र हातात घेऊन**) या शस्त्रावर आज माझा अधिकार आहे. आज मी संपूर्ण राजनीती आपल्या बाहुबलावर एकत्रित करून कुसुमपूरचं राज्य चालवीन आणि विद्रोहाचे सर्प जाळून टाकण्यासाठी महायज्ञ करीन.

**चाणक्य** : करा. आताच त्या महायज्ञाला सुरुवात करा आणि त्यात तुम्हीही नष्ट होऊन जा. आज कौमुदी महोत्सव करा आणि आपला नवीन समाहर्ता आणि राजनर्तकीच्या रूपातील आपल्या मृत्यूला निमंत्रण द्या.

**चंद्रगुप्त** : माझ्या आनंदोत्सवाची तुम्हाला असूया वाटते, चाणक्य. म्हणून तुम्ही हेच म्हणणार. अशा ऐश्वर्याचा ब्राह्मणाला द्वेष वाटणं अगदी स्वाभाविक आहे.

**चाणक्य** : हेच विचार आपल्याबरोबर मृत्यूला जवळ करताहेत हे विसरताहात, क्षत्रिय ! लक्षात ठेवा–शत्रूच्या गुप्तहेरांवर आणि विषकन्येवर विश्वास ठेवणारा सम्राट एका झेपेत दीपशिखेवर जळून जाणाऱ्या पतंगाप्रमाणे एकाच पदक्षेपात मृत्यूला आलिंगन देत असतो. इच्छाच असेल तर भस्म व्हा आणि आपल्या जळून राख झालेल्या वैभवाचा काळा धूर मागे सोडून जा.

**चंद्रगुप्त** : आपल्याच राजनीतीवर आपला विश्वास नाही, चाणक्य ! तुम्ही प्रत्येक व्यक्तीला गुप्तहेर आणि प्रत्येक स्त्रीला विषकन्या समजता. राज्याच्या सीमारेषेवर रेंगाळणारी तुमच्या डोळ्यांची बुबुळं काळ्या किड्यांप्रमाणे केवळ निरपराध प्राण्यांची हिंसा करू पाहतात. महामंत्र्यांची विशेषत:...

**चाणक्य** : महामंत्री म्हणू नका, मौर्य ! मी आता तुमचा महामंत्री नाही. मीही तुम्हाला सम्राट म्हणत नाही आहे. फक्त मी एक ब्राह्मण आहे. ज्याने आपली शेंडी खूप दिवस मोकळी ठेवली आणि जेव्हा त्याने आपल्या प्रतिज्ञेप्रमाणे नंद वंशाचा विनाश केला तेव्हाच ती बांधली–तो ब्राह्मण ! आता त्याच्यासमोर केवळ दोनच मार्ग आहेत. एक मार्ग म्हणजे त्याने परत आपली शेंडी सोडून मौर्य वंशाच्या विनाशाची प्रतिज्ञा करणं किंवा क्षितिजाप्रमाणे आपले बाहू पसरून निसर्गाच्या नेत्रांनी या विश्वंभरा पृथ्वीवर आपल्या करुणेचा आणि शांतीचा वर्षाव करणे. त्यावेळी सर्व सृष्टीवर त्याचंच साम्राज्य असेल. पशुपक्षी त्याचे सहप्रवासी बनतील आणि वाऱ्याच्या झुळुकांमध्ये गाणं गात तो तुम्हाला क्षमा करील.

**चंद्रगुप्त** : हे तपोवन नाही, आर्य ! तसा चंद्रगुप्त क्षमेला पात्रही नाही आणि क्षमेची याचनाही करत नाही. आता तपोवनातल्या होमकुंडात हिंसा करा किंवा हिरवे तृणांकुर खाणाऱ्या हरिणांना क्षमा करा. परंतु जाण्यापूर्वी या राज्याचा नवीन समाहर्ता वसुगुप्त आणि राजनर्तकी अलका यांच्यावर आपण केलेल्या आरोपाचं निराकरण करून जा. आणि जर हा आरोप असत्य ठरला तर लक्षात ठेवा, राज्याचं दंडविधान फक्त अपराधी ओळखतं, हा माझा अंतिम आदेश आहे.

**चाणक्य** : आपल्या नवीन महामंत्र्यांना प्रथम आदेश द्या. मौर्य ! मी तुमच्यासमोर सत्य उघडं करायला बांधलेला नाही.

**चंद्रगुप्त** : जो ब्राम्हण सत्य उघड करणं हा आपला धर्म समजत नाही त्याला मी

कोणत्या विशेषणानं संबोधू ?

**चाणक्य :** मी आपल्या इच्छेप्रमाणे सत्य उघड करू शकतो, परंतु त्यानंतर मी क्षणभरही इथे राहू शकणार नाही. हे वातावरण शाप बनून माझ्या रोमारोमात तीव्र प्रतिहिंसेच्या ज्वाळा उत्पन्न करत आहे.

**चंद्रगुप्त :** प्रथम पुरावा उपस्थित केला जाऊ द्या.

**चाणक्य :** (**हाक मारून**) सैनिक !

(**सैनिकाचा प्रवेश**)

**सैनिक :** आज्ञा महाराज !

**चाणक्य :** समाहर्ता वसुगुप्त आणि राजनर्तकी अलकाला घेऊन या.

**सैनिक :** जशी आज्ञा. (**जातो**)

**चाणक्य :** चंद्रगुप्त ! प्रजेवरील संस्कार लगेच पुसले जात नाहीत. या वेळीही महाराज नंदाविषयी सहानुभूती असणाऱ्या व्यक्ती विद्रोहज्वालेच्या स्फुल्लिंगाप्रमाणे आहेत. राजमंत्री राक्षस कुसुमपूरच्या बाहेर राहूनही कुसुमपूरच्या नागरिकांमधील असंतोषाच्या बीजावर आपल्या नीतीचं खतपाणी घालतो आहे. कुसुमपूरमधील सर्व कार्यात षडयंत्राचे जाळे विणून गुप्तवेषात सर्वत्र फिरत आहेत. आणि तुम्ही कौमुदी महोत्सवात बेसावध राहून विषकन्येला स्पर्श करू इच्छिता आहात ! चंद्रगुप्त ! मी माझ्या निःस्पृह डोळ्यानी सर्व काही पाहतो आहे आणि तुम्ही हे पाहूनही कौमुदी महोत्सवाच्या शीतलतेत हलाहलपान करायला निघाला आहात. मी परत हेच सांगू इच्छितो की... (**सैनिकाचा वसुगुप्त आणि अलकासह प्रवेश**) ठीक ! समाहर्ता वसुगुप्त आणि राजनर्तकी अलका ! सैनिक, तू जाऊन दरवाजापाशी आपलं स्थान ग्रहण कर.

(**सैनिक प्रणाम करून जातो.**)

(**वसुगुप्ताला**) समाहर्ता वसुगुप्त ! सैनिकांच्या नियंत्रणाखाली तुम्हाला ठेवलं याचं मला वाईट वाटतं. तुम्ही सम्राट चंद्रगुप्ताचे विश्वासू असे नवीन समाहृत आहात हे मी जाणतो.

**वसुगुप्त :** मी समाहर्ता नाही, महामंत्री ! मी जर समाहर्ता असतो तर माझा हा असा अपमान सम्राटांनी सहन केला नसता.

**अलका :** (**करुण स्वरात**) आणि स्त्रीचा अपमान आजपर्यंत कुसुमपूरच्या राजकक्षेत झालेला नाही. मी अपमानित आहे, सम्राट !

**चंद्रगुप्त :** (**दृढपणे**) यात शंकाच नाही ! मी दोघांच्याही अपमानाचा प्रतिकार केल्याखेरीज रहाणार नाही.

**चाणक्य :** (**वसुगुप्ताला**) सम्राटांकडून तुम्हाला आश्वासन मिळालं आहे, समाहर्ता

आणि (**राजनर्तकीला**) राजनर्तकी तुम्हालाही सम्राटांच्या बाहूंची शीतल छाया लाभली आहे. परंतु (**वसुगुप्ताला**) मी एवढंच जाणू इच्छितो समाहर्ता! की राजनर्तकीचा आणि आपला परिचय कधीपासून आहे?

**वसुगुप्त** : मला राजनर्तकीचं नावसुद्धा माहीत नाही, महामंत्री! कौमुदी महोत्सवाच्या घोषणेच्या आधी थोडा वेळच राजनर्तकीची ओळख करून देण्यात आली.

**चाणक्य** : आपण कुसुमपूरचे रहिवासी आहात, समाहर्ता!

**वसुगुप्त** : कुसुमपुरातील एका गावचा–अमरावतीचा रहिवासी आहे. मी तिथला अंत:पाल होतो.

**चाणक्य** : तर मग तुम्ही कुसुमपुरमध्ये केव्हापासून रहाता आहात?

**वसुगुप्त** : मी सांगितलं ना, महामंत्री! मी कुसुमपुरचा नव्हे तर अमरावतीचा रहिवासी आहे.

**चाणक्य** : समाट चंद्रगुप्तांना आपण कुसुमपूरमध्ये भेटलात की अमरावती मध्ये? आपणाला समाहर्ता बनविण्यासाठी त्यांनी तुमचं कुसुमपूरचं नागरिकत्वच लक्षात घेतलं असेल ना?

**वसुगुप्त** : महामंत्री! मी कुसुमपुरात राहात नाही. मी अमरावतीहून कुसुमपूरला नेहमी येतो.

**चाणक्य** : वर्षातून किती वेळा येता?

**वसुगुप्त** : हे सांगता येणार नाही.

**चाणक्य** : (**कठोर स्वरात**) प्रश्नाची अवहेलना चालणार नाही. नीट उत्तर द्या.

**वसुगुप्त** : महाराज, नंदांच्या प्रमुख उत्सवाना येत असे.

**चाणक्य** : अमरावतीचे अंत:पाल! आपण गेल्या वर्षी वसंतोत्सवात सामील झाला होता का?

**वसुगुप्त** : होय, महामंत्री!

**चाणक्य** : वसंतोत्सवात राजनर्तकी अलकाने नृत्य केलं होतं. तुम्ही ते पाहिलं होतं का?

**वसुगुप्त** : होय, महामंत्री!

**चाणक्य** : म्हणजे तुम्हाला अलका हे नाव परिचित आहे ना?

**वसुगुप्त** : होय, महामंत्री!

**चाणक्य** : आताच तर तुम्ही म्हणालात की मला अलकाचं नावदेखील माहीत नाही आणि कौमुदी महोत्सवाच्या आधी फक्त काही क्षण आपली ओळख झाली, खरं ना?

**वसुगुप्त** : राजनीतीतल्या सर्व गोष्टी मी प्रगट करीत नसतो.

**चाणक्य** : (**हसून**) मोठे राजनीतिज्ञ आहात ! बरं तर, राजनीतीच्या गोष्टी बोलू नका. सरळ उत्तर द्या. आपण राजमंत्री राक्षसचे गुप्तहेर कधीपासून झालात ?

**वसुगुप्त** : महामंत्री ! मी दुष्ट राक्षसाला ओळखतही नाही !

**चाणक्य** : जसे तुम्ही राजनर्तकीला ओळखत नव्हता तसेच ना ?

**वसुगुप्त** : सम्राट ! माझा अपमान होऊ देऊ नका ?

**चंद्रगुप्त** : समाहर्ता वसुगुप्त ! प्रथम महामंत्री चाणक्यांच्या प्रश्नांची उत्तरे द्या.

**वसुगुप्त** : मी उत्तरे देऊ शकत नाही, सम्राट ! कौमुदी महोत्सवाच्या या प्रसंगी मी जादा आसव-पान केलं आहे. त्यामुळे माझी उत्तरे नीट नाहीत.

**चाणक्य** : काही बिघडणार नाही, समाहर्ता ! मी तुम्हाला आणखी आसव-पान करायला देईन म्हणजे हा कौमुदी महोत्सव तुम्हाला अधिकच मंगलमय वाटेल.

**वसुगुप्त** : अधिक आसव-पान करणं हे मी राजधर्माच्या विरोधी समजतो, महामंत्री !

**चाणक्य** : आताच तर तुम्ही सांगितलंत की अधिक आसव-पान केल्यामुळे आपण उत्तरे देऊ शकणार नाही. आता सांगताय की अधिक आसव-पान करणं हे राजधर्माला प्रतिकूल समजतो म्हणून. यात खरं कोणतं समजायचं !

**वसुगुप्त** : मी राजनीतीची रहस्ये आपल्यासमोर उघड करू शकत नाही.

**चाणक्य** : प्रत्येक वेळी राजनीती ! प्रत्येक प्रश्नात राजनीती! राज्याच्या महामंत्रींना राजनीतीची रहस्य सांगायला तयार नाही ? आणि आसव-पान करण्यात सुद्धा तुमची ती राजनीती आहे ! हां, तुमची नाही, माझी आहे, समाहर्ता ! आता तुमची इच्छा नसेल तर राजनीतीची रहस्ये तुम्हाला उघड करायला सांगत नाही. काव्याच्या गोष्टी बोलेन. काव्याच्या गोष्टी कराल ना ? सांगा, वन्यकुसुमांचा सुगंध घेऊन आलेलं आसव एवढं मादक का असतं ?

**वसुगुप्त** : मला माहीत नाही, महामंत्री !

**चाणक्य** : तुम्हाला माहीत नसेल पण मला माहीत आहे. वन्य-कुसुमांनी सुगंधित झालेलं आसव एवढं मादक असण्याचं कारण म्हणजे सुंदरी ते आपल्या हातानं प्यायला लावतात. त्याही अशा सुंदरी की ज्यांच्या नेत्रातच आसव आहे. त्या तुमच्या आसवाकडे पहात असतानाच आपल्या डोळ्यातलं आसव त्यात घालून अधिकच मादक बनवतात.

**वसुगुप्त** : आपण तर राजनीती आणि काव्य दोन्हीतही पारंगत आहात, महामंत्री !

**चाणक्य** : चाणक्याच्या सुकलेल्या नसेत काव्य कुठलं असायला ! परंतु मी तुमच्या

इच्छेप्रमाणे राजनर्तकीच्या रहस्याऐवजी तुम्हाला काव्य ऐकवणार आहे. आणखीन एक गोष्ट विचारू ? सुंदरीच्या नेत्रात मादकता जास्त असते की अधरात ?

**वसुगुप्त** : या प्रश्नाचं उत्तर देणं कठीण आहे, महामंत्री !

**चाणक्य** : ज्यात तुम्ही पारंगत आहात अशा राजनीतीच्या रहस्यांपेक्षाही कठीण, समाहर्ता ? अमरावतीच्या अंत:पालांना आणि महाराज नंदाच्या वसंतोत्सवात सामील झालेल्या वसुगुप्ताला हा प्रश्न कठीण नाही. महाराज नंदाच्या वसंतोत्सवात 'अनंग क्रीडे'ची व्यवस्था झाली होती ?

**वसुगुप्त** : होय, महामंत्री !

**चाणक्य** : आणि तुम्ही त्यात सामील झाला होता. म्हणजे तुम्हाला माहीत असलंच पाहिजे की सुंदरींच्या नेत्रांपेक्षा अधरात मादकता जास्त असते. असते ना, समाहर्ता ? (**तीव्र स्वरात**) उत्तर द्या !

**वसुगुप्त** : होय, महामंत्री !

**चाणक्य** : म्हणजे, जे आसव सुंदरी आपल्या ओठांना लावून देतात त्यात अधिक मादकता येते असंच ना ? (**तीव्र स्वरात**) उत्तर द्या !

**वसुगुप्त** : होय, महामंत्री !

**चाणक्य** : आता मला तुम्हाला काहीच विचारायचं नाही. तुम्हाला एवढे प्रश्न विचारून मी जो त्रास दिला त्याबद्दल मला तुम्हाला काही बक्षीस द्यायचं आहे. आणि हे बक्षीस म्हणजे राजनर्तकी अलकाच्या अधरांचा स्पर्श झालेल्या मादक आसवाचा तुम्ही एक घोट...

**अलका** : (**विव्हल स्वरात**) क्षमा असावी, महामंत्री ! मी आसवाला स्पर्श करीत नाही. आजपर्यंत मी आसव-पान केलेलं नाही आणि कुणाला दिलेलंही नाही. मी क्षमेची भीक मागते आहे, महामंत्री !

**चाणक्य** : कौमुदी महोत्सवात बक्षीस मिळतं, देवी ! भीक नव्हे ! (**हाक मारून**) सैनिक ! (**सैनिकाचा प्रवेश**) आसवाचा एक चषक घेऊन ये.

**सैनिक** : जशी आज्ञा ! (**प्रस्थान**)

**अलका** : (**विव्हळून**) महामंत्री ! माझं जीवन शापित आहे. मी राजनर्तकी झाल्याने स्त्रीही राहिले नाही. जगातील सर्वात मोठी विटंबना मी आहे. मी पापीण आहे. मी नरकातली ज्वाला आहे. मी . . . मी . . .

**चाणक्य** : नाही, देवी ! आपण महाराज नंदच्या दरबारातील राजनर्तकी आहात. अनिंद्य सुंदरी ! कलापूर्ण नृत्याची सम्राज्ञी ! मला वाईट वाटतं की तुमचं जीवन... (**सैनिक चषक घेऊन येतो**) चषक घेऊन आलास काय ? हां, मी माझ्याबरोबर आसव आणि चषकही आणला होता. घे तू हे पी, राजनर्तकी !

**अलका :** महाराज ! मला आसव–पान करायला लावू नका. मला **विष द्या.** जालीम विष द्या. त्यात मला शांती मिळेल. माझ्या जिभेला सर्पाच्या दंशाची आवश्यकता आहे. सर्पदंश ! सर्पदंश ! महामंत्री !

**चाणक्य :** राजनर्तकी ! आपल्याला सर्पदंशाची आवश्यकता नाही. दुसऱ्या कुणाला तरी आहे. (**सैनिकाला**) हे आसव राजनर्तकीला...बळजबरीने पाजा. (**सैनिक राजनर्तकीला बळजबरीने आसव पाजतो. अनिच्छेनं आसवपान केल्याचं दर्शवीत**) बस्स ! पुरे कर. (**सैनिक राजनर्तकीच्या अधरापासून चषक बाजूला करतो**) आता हे आसव राजनर्तकीच्या अधरस्पर्शाने अधिकच मादक बनलेलं आहे. आता कौमुदीमहोत्सवाच्या समाहर्त्या वसुगुप्तांना त्यांचं बक्षिस दिलं पाहिजे. सैनिक ! आता हे उरलेलं आसव समाहर्ता वसुगुप्त पितील.

**वसुगुप्त :** सम्राट, माझं रक्षण करा. मी हे आसवपान करणार नाही, नाही करणार.

**चाणक्य :** सैनिक, वसुगुप्तांना उरलेलं आसव बळजबरीने पाजा.

(**सैनिक बळजबरीने आसव पाजतो. घोट गिळतानाचा आवाज.**)

**वसुगुप्त :** (**अडखळत्या शब्दात**) ओहो ! जालीम . . . विष . . . आगीची . . . ज्वाळा ! सर्पदंश . . . सर्प . . . दंश . . . महामंत्री . . . चाणक्य ! आपण राजमंत्री राक्षस . . . विजयी झालात . . . कौमुदी . . . महो . . . त्सव . . . होऊ . . . शकला . . . नाही . . . अलका . . . मला . . . क्षमा ! . . . कौमुदी . . . महो . . . त्सव . . . कौमुदी . . . म . . . हो . . . त्स . . . व . . .

(**प्राण जातो**)

**चंद्रगुप्त :** ओहो, विषकन्या ! राजनर्तकी विषकन्या आहे. अधरस्पर्शानं आसव... हलाहल बनलं ! समाहर्ता...

**चाणक्य :** समाहर्ता आता या जगात नाहीत. चंद्रगुप्त आता अलका...

**अलका :** सम्राट, माफ करा ! महामंत्री, प्राणांची भिक्षा घाला ! मी निर्दोष आहे ! सम्राट, आपले चरण चुंबून...

(**पायावर पडण्यासाठी पुढे होते**)

**चाणक्य :** मागे हो. मागे व्हा चंद्रगुप्त ! (**चंद्रगुप्त मागे होतो.**) ही तुमच्या पावलात आपले दात रुतवून तुम्हाला मृत्युमुखात ढकलणार होती. हा तिचा शेवटचा प्रयोग होता. स्त्री रूपातली भयानक नागीण – विषकन्या ! राजमंत्री राक्षसानं कौमुदी महोत्सवाचा प्रस्ताव वसुगुप्ताकडून सुचवला आणि बेसावध चंद्रगुप्तावर विषकन्येचा प्रयोग करून नष्ट करण्याचा त्याचा विचार होता. सैनिकांनो ! राजनर्तकीला बंदिवान करा. हिचा प्रयोग शत्रूवर करण्यात येईल. (**सैनिक राजनर्तकीला हातकड्या घालतात.**) समाहर्ता वसुगुप्त राक्षसाचा गुप्तहेर होता आणि राजनर्तकी अलका

विषकन्या ! या सत्याचा खरेपणा मी माझ्या इच्छेनं उघड केला आहे आणि यानंतर मी इथे एक क्षणही थांबू शकणार नाही. माझा मार्ग सोडा. बाजूला व्हा. तपोवन माझी वाट पहात आहे. चंद्रगुप्त ! आपल्या विश्वासपात्र समाहर्ता वसुगुप्ताचे अंत्य-संस्कार आणि कौमुदी महोत्सवाचे आयोजन दोन्हीही एकदमच करा आणि आपलं राज्य सांभाळा. (प्रस्थान)

चंद्रगुप्त : (विव्हल स्वरात) आर्य चाणक्य ! महामंत्री चाणक्य चंद्रगुप्ताला आपली, गरज आहे. महामंत्री चाणक्य नसतील तर हे राज्य नष्ट होईल. चंद्रगुप्त नष्ट होईल. महामंत्री चाणक्य, कौमुदी महोत्सव होणार नाही. (चाणक्याच्या मागून धावत जातो. त्याचा आवाज क्रमशः क्षीण होत जातो.) कौमुदी महोत्सव होणार नाही ! ... कौमुदी महोत्सव होणार नाही ! ! ... कौमुदी महोत्सव होणार नाही ! ! !

( पडदा पडतो )

( स्थान : पत्नीचे प्रसूतिगृह )

वेळ : संध्याकाळ

(प्रसूतिगृह) एक अद्यावत खोली. भिंतीला बरेच दरवाजे आणि खिडक्या आहेत. परंतु मागील बाजूचे सर्व दरवाजे आणि खिडक्या बंद आहेत. डाव्या आणि उजव्या भिंतीच्या कोपऱ्यातली एकेक खिडकी खोलीत स्वच्छ हवा खेळावी म्हणून उघडी ठेवली आहे. भिंतींना क्रीम डिस्टेंपर काढलेला आहे आणि त्यावर करडस रंगाच्या पट्ट्या आहेत. भिंतीवर काही चित्रेही लावलेली आहेत. सुंदर शेड असलेले विजेचे दिवे छतावर झुलत आहेत, यावेळी ते दिवे लावलेले नाहीत. जमिनीवर संगमरवरी फरशी आहे. पण त्यावर काही अंथरलेलं नाही. मागच्या भिंतीकडे एक आधुनिक पद्धतीचा मोठा पलंग आहे त्यावर अति शुभ्र पांढऱ्या रंगाचा बिछाना घातलेला आहे. त्याच पलंगाजवळ आधुनिक प्रकारचा छोटासा लोखंडी पाळणा आहे. पाळण्यावर जाळीदार मच्छरदाणी असल्याने आत काय आहे ते स्पष्ट दिसत नाही. पलंगाजवळ एका बाजूला एक टेबल त्यावर औषधाच्या बऱ्याच बाटल्या. थर्मामीटर वगैरे ठेवलेलं आहे. एक सुंदर टाईमपीस घड्याळही ठेवलेलं आहे. पलंगाच्या जवळच दुसऱ्या बाजूला दोन कुशनच्या खुर्च्या ठेवलेल्या आहेत. त्या खुर्च्यांवर मखमली तक्के आहेत. खुर्च्यांच्यामध्ये रेशमी टेबलक्लॉथ घातलेलं. छोटसं टेबल आहे. आणि त्यावर फुलांनी भरलेली फुलदाणी ठेवलेली आहे. उजव्या बाजूच्या भिंतीजवळ एका लाकडी खुंटीवर काही कपडे टांगलेले आहेत. पलंगावर एक स्त्री पहुडलेली आहे. ती अगदी सरळ झोपलेली आहे आणि तिचं शरीर गळ्यापर्यंत करड्या रंगाचा किंमती रगानं झाकलेलं आहे. तिचे दोन्ही हात रगाच्या बाहेर आहेत. तिचं तोंड आणि हात सोडून शरीराचा कोणताच भाग दिसत नाही. तिचं वय ३० च्या आसपास आहे. ती स्त्री गौरवर्णाची साधारण सुंदर दिसणारी अशी आहे. तिच्या पलंगाजवळील एका खुर्चीवर एक पुरुष बसलेला आहे. तो बहुतेक ३२-३३ वर्षाचा आहे. तो गौरवर्णीय, मध्यम बांध्याचा आणि दिसायला बऱ्यापैकी असा आहे. बटर-फ्लाय मिशा आणि इंग्लिश फॅशनचा पोषाख ! स्त्रीच्या चेहऱ्यावर दारुण दुःखाबरो-

बरच संताप आणि निराशाही स्पष्ट दिसत आहे. ती ह्या पुरुषाकडे नजर भिडवून त्याला काही सांगत आहे. तिच्या आवाजात जोर नाही. आवाजातील क्षीणतेबरोबरच एक प्रकारची तीव्रताही आहे. क्षीणता आणि दृढता अशा परस्परविरोधी भावनांनी भरलेल्या बोलण्याला उत्तर देणं अशक्य नसलं तरी कठीण मात्र नक्कीच आहे. तो पुरुष–हालत नाही की बोलत नाही. फक्त चोहोकडे निर्विकार नजरेनं पहातो आहे. त्याच्या पहाण्याचा ढंगच असा काही विचित्र आहे की, पहाणाऱ्याला वाटतं सर्व काही पहात असूनही तो काहीच पहात नसावा. त्याचं बसणं, पाहणं आणि त्याचा चेहरा यांवर एक प्रकारचा उदासपणा दिसतो आहे. त्याच्या डोळ्यातील बाहुल्या सगळीकडे फिरताहेत आणि वरचा ओठ खालच्या ओठावर एखाद्या झाकणासारखा घट्ट बसला आहे.

**स्त्री** : हं, आज ऐकावंच लागेल. जाण्यापूर्वी एकदा मनातलं सगळं ओकून तर टाकू दे मला ! हे सांगण्यासाठीच, कदाचित, अजून मी जिवंत राहिले असेन. (**थोडं थांबून**) बारा वर्षांच्या एका तपात ऐकलं नसेल पण आज निमूटपणे, कसलीही आड-काठी न करता ऐकावंच लागेल ! बारा वर्षांच्या तिरस्करणीय तपश्चर्येनंतर एवढं फळ मिळालं तर ते काही फार नाही.

(**समोरच्या भिंतीकडे असलेली नजर पुरुष तिच्याकडे वळवतो आणि एक दीर्घ सुस्कारा सोडतो.**)

**स्त्री** : याचाही त्रास होऊ लागला ? एवढा मोठा सुस्कारा बाहेर पडतो ? तुम्हाला त्रास झाला आणि लांब सुस्कारे टाकावे लागले तरी हरकत नाही पण ऐकावंच लागेल.

(**तो आणखीन लक्षपूर्वक तिच्याकडे पाहतो. त्याच्या ओठावर एक कोरडं हास्य उमटून जातं**)

**स्त्री** : असं कोरडं ... असं निर्जीव. ..असं क्षणभंगुर हास्य ! रसरशीत जिवंत आणि प्रसन्न हास्याच्या आशेने मी तुमच्या या घरात पाऊल ठेवलं होतं. त्यासाठी मी माझं सर्वस्व अर्पण करायला तयार होते. (**थोडं थांबून**) लग्नापूर्वी आई, वडील, मैत्रिणी, शेजारीपाजारी यांना काय काय वाटत असावं. वडिलांना तर वाटलं होतं ... या घराशी संबंध जुळला, आपण धन्य झालो. मी केवढ्या मोठ्या घरात जात आहे, या आनंदाने आईचे डोळे सारखे भरून यायचे. मैत्रिणीमध्ये काहींना आनंद तर काहींना मत्सर वाटत होता. शेजाऱ्यापाजाऱ्यांना वाटायचं हिला कोणतंच सुख अशक्य नाही. मला पुढं मिळणाऱ्या साती सुखांची कल्पना करून, त्यांची वर्णनं करून माझ्या त्या सुखी संसाराची एक सुंदर सृष्टी माझ्याभोवती उभी केली जात असे. (**थोडं थांबून**) मलाही वाटायचं खरोखरच मी किती भाग्यवान आहे ! या देशात कोट्याधिशाहून अधिक श्रीमंत दुसरं कोण असणार ? कोट्याधिशाच्या घरात मी

येत होते ! तुम्ही फार सुंदर आहात, सुशिक्षित आहात असं ऐकलं होतं. हे ऐकल्यावर आपल्या जीवनात काही कमतरता राहील असं वाटणं कसं शक्य होतं ? (**थोडं थांबून**) माझ्या वडिलांचं घर तुमच्या घराइतकं संपन्न नसलं तरी ते दरिद्रीही नव्हतं. मला चांगल्या प्रकारे शिक्षण दिलं होतं. डोंगरांवरून, मोठमोठ्या शहरातून फिरवूनही आणलं होतं. मी वरचेवर कालिदास आणि वर्डस्वर्थ यांची निसर्गवर्णनं वाचीत असे. कधी-कधी भवभूती आणि शेले यांची प्रेम-काव्येही. कधी सूरदासाच्या प्रेम-यमुनेत डुंबत असे तर कधी तुलसीदासांच्या कर्तव्य-गंगेत ! रवींद्र बाबूंचं काव्य मी समजू शकत नव्हते. परंतु, माइकेलच्या कवितांचा हिंदी अनुवाद मला अगदी मुखोद्‌गत होता. गालीब आणि जोष यांचे भाषानुवाद मी नजरेखालून घातले होते. त्याचप्रमाणे पंत आणि महादेवी हेही माझ्या वाचनातून सुटले नव्हते. आयुष्यासंबंधीच्या मी काय काय कल्पना केल्या होत्या, कशी माझी दुनिया चितारली होती ! आपण दोघांनी कसं राहायचं, आपलं खाणं-पिणं, फिरणं ऋतुप्रमाणे कसं बदलायचं, पहाटे आणि संध्याकाळी, चांदण्याराती आणि काळोख्या रात्री आपण काय काय करायचं याचा एक चार्टच मी बनवला होता ! कधी पर्वत.वर तर कधी समुद्रकिनाऱ्यावर, कधी मोठ-मोठ्या शहरात तर कधी बागेत किंवा उद्यानात आपल्या मनीषा कशाप्रकारे साकार होतील याचीच मी कल्पना करीत असे. सगळी सृष्टी आपल्या पायाशी लोळण घेईल आणि एवढ्या मोठ्या जगात तुम्हाला फक्त मी आणि मला फक्त तुम्हीच असाल अशा विचारावरच माझं विश्व मी रचलं होतं. (**थोडसं थांबून**) काय काय कल्पना करून आले होते. पण . . .इथे आल्यावर माझ्या मनाच्या फुललेल्या बगिच्यावर पाणी पडलं. अशी पडझड झाली की नंतर वसंत कधी पाहिलाच नाही. (**परत थोडसं थांबून**) कारण ? . . . कारण फक्त तुम्ही . . . मला वाटलं होतं तसे तुम्ही नव्हता.

(**तो थोडासा घाबरून भिंतीवरच्या एका चित्राकडे पाहतो आहे. जणू काही ते निर्जीव चित्र त्याला काही विचारते आहे.**)

**स्त्री :** अहो, नीट इकडे पहा. ही तर माझी नुसती सुरवात आहे. अजून मला बरंच काही सांगायचं आहे. एका युगाचा इतिहास आहे हा ? याच्यावर एक पुराण लिहिलं जाईल, पुराण !

(**तो परत तिच्याकडे पाहतो.**)

**स्त्री :** तुमचं प्रेम...तुमचं प्रेम मिळालं असतं तरच ना माझं जग साकार झालं असतं ? ते मनोहर पर्वत, तो विशाल समुद्र, ते सुंदर बगिचे, ती उत्साहानं भरलेली शहरं, ते बदलणारे ऋतू, त्या सुंदर चांदण्याराती हे सगळं, प्रेमाचा छोटासा अंकुर जरी उगवला असता, प्रेमाचा एक थेंब जरी मिळाला असता तरी साकार झालं असतं ! प्रेम करणं आणि त्यात बुडून जाणं हे तर दूरच राहिलं. तुम्ही माझ्याकडे

प्रेमाचा एक कटाक्षही कधी टाकला नाही. माझ्या वाट्याला आणलीत ती उपेक्षा... फक्त उपेक्षा ! वैराग्य...फक्त वैराग्य !

**(तो उठू पाहतो.)**

**स्त्री :** नाही, नाही ! मुळीच नाही. तुम्ही हलायचं नाही. **(याचनेनं)** आजही माझं न ऐकता जाणार ?

**(तो बसतो, पण बसताना आपले हात आणि डोकं अशा प्रकारे हलवतो की जसं काही त्याच्या चारी बाजूंनी किडे-पाखरे गोळा होत आहेत आणि तो त्यांना बाजूला करून बसतो आहे.)**

**स्त्री :** तुमच्या प्रेमाचा ओलावा नसलेलं हे संपन्न घर मला स्मशानासारखं वाटत होतं. इथली धनदौलत, सोनं–चांदी, हिरे–माणके मला अनवाणी पायात बोचणाऱ्या टोकदार खड्यांसारखी वाटत होती आणि सगळं वैभव म्हणजे चितेच्या ज्वालाच !

**(तो मोठा सुस्कारा सोडतो.)**

**स्त्री :** हां, क्षणाक्षणाला टाका हे सुस्कारे. पण आता ते विझलेले आहेत, पूर्णपणे विझलेले आहेत. **(थोडं थांबून)** हां, तर माझं जग जरी पोकळीनं व्यापलेलं होतं तरी तुमचं मात्र तसं नव्हतं. माझ्या त्या शून्य जगात फक्त तुम्हीच होता. पण तुमच्या जगात मात्र दुनियेतलं सारं काही होतं. मला हवंसं वाटणारं प्रेम धनाने मिळालं नसतं ! पण लालसा तर मोठ्या प्रमाणात विकत घेता येते ? त्या लालसेला तृप्त करण्यासाठी तुमचे ते विलास आणि विहार, त्यात रमलेल्या त्या युवती ! **(थोडंसं थांबून)** जेव्हा...जेव्हा मी ही सगळी कथा ऐकत असे तेव्हा...तेव्हाची माझी स्थिती ...माझा...माझा जळफळाट आणि त्या यातनांतून निर्माण झालेला-तुमच्या या लांबलचक सुस्काऱ्यापेक्षा भयंकर...असा ज्वालेसारखा सुस्कारा !...वादळ ! **(परत थोडा वेळ थांबून)** सासुसासऱ्यांनी मला पर्वत शिखरं दाखवली. पण बर्फाने झाकलेली आणि सूर्यकिरणांनी चमकणारी ती शिखरं मला तुमच्याखेरीज ज्वालामुखीसारखी वाटत होती. कधी कधी त्यांच्याबरोबर समुद्र किनाऱ्यावरही गेले. पण तुम्ही नसल्याने तो समुद्र म्हणजे मला हिंस्र प्राण्यांनी भरलेलं एक भयानक संग्रहालयच वाटलं. कधी कधी मुंबई, कलकत्ता, दिल्ली वगैरे शहरातही ते मला घेऊन गेले पण तुमच्याखेरीज मला तिथली नाटकं, सर्कस, सिनेमा हे सगळं निर्जीव पुतळ्यांचे खेळ वाटले. माझं खरं जीवन सर्वस्व तुम्ही होता. तुमच्यामुळे त्या सगळ्या गोष्टीत मला रस घेता आला असता. प्राणाशिवाय शरीर म्हणजे प्रेतच, दुसरं काय ? **(थोडं थांबून)** मी तुम्हाला रिझवू शकले नाही याचा मला पश्चात्ताप होत होता

या जन्मात तर कसलं पाप केलं नव्हतं. पण वाटलं, पूर्वजन्मीची पापं असतील कदाचित ! पण...पण...भाग्य आणि पूर्वजन्म हे फक्त दुःखी लोकांना दिलासा

देणारे शब्द तर नव्हेत ना? अशी शंका सारखी मनात येऊ लागली आणि मग...मग त्यातूनच तुमच्याबद्दल चीड निर्माण झाली...आता...आता तर मला वाटायला लागलं की, आपणही तुमच्यासारखी मौज का नाही करायची?

**(त्याच्या चेहऱ्यावर संताप दिसतो आहे आणि तो आपला खालचा ओठ संतापाने चावतो.)**

**स्त्री : (तिरस्काराने हसून)** तुम्हाला संताप आला. मी नुसता मनात आलेला विचार बोलून दाखविला तर एवढा संताप! का नाही येणार म्हणा! इतर सांपत्तिक वस्तूप्रमाणे स्त्रीसुद्धा पुरुषाने विकत घेतलेली एक वस्तूच आहे ना? त्यामुळेच जिवंत असूनही तुम्ही तिला निर्जीव समजता! तिच्या मनात कामविचार आला की ते पाप, तिला राग येणं हे अक्षम्य, पण का...हे असं का? मी...मी तर फक्त तुमच्याप्रमाणे ..तुमच्याच सारखं आयुष्य घालवण्याचा विचार केला होता... तुमच्यापासून निराश होऊन...आणि तुमचं हे असलं आयुष्य पाहून दुसरा विचार तरी मी काय करणार होते?...माझ्या भावनांचा तुम्हाला जर इतका राग येऊ शकतो...तर मग तुमच्या वागण्याची मला किती चीड येत असावी, याचाही जरा विचार करा!

**(पुरुष एकदम उठून उभा राहतो.)**

**स्त्री : (हाताने बसण्याची खूण करून)** घाबरू नका, बसा! बसा! माझा तो विचार फक्त विचारच राहिला होता.

**(पुरुष परत बसतो आणि खुर्चीच्या हातावर हात फिरवत राहतो)**

**स्त्री :** जज्ज, जुरी किंवा असेसर करतात ना तसा चेहरा करू नका. मी स्वतःच माझ्या या भावनांचा तुमच्या इच्छेप्रमाणे निर्णय घेतला आहे. हिंदू...अभागी हिंदू संस्कार होते ना? रामायण वाचलं होतं, पुराणं ऐकली होती आणि त्या सर्वांवर एक श्रद्धा होती. या सर्वांनी मिळून माझ्या बुद्धीला आणि मनाला एका अदृश्य साखळीने जखडून टाकलं होतं. शिवाय समाज...पतित समाजाच्या बदनामीचं भूत मागे होतंच, पुरुष...पुरुषानं काहीही केलेलं चालतं परंतु स्त्री...स्त्रीने केलं तर? ज्या घरानं, ज्या कुटुंबानं माझं जीवन उध्वस्त केलं त्या घराण्याला काळिमा लागण्याची भीती होती ना? मी...जसे तुम्ही होता तशी मी बनू शकले नाही. **(थोडे थांबून)** जसजसे दिवस गेले तसतसं माझं दुःख वाढतच गेलं आणि ज्यावेळी मुलं होण्यासाठी अनुष्ठान, यज्ञ सुरू झाले, तुपाची आहुती पडली तेव्हा तर या दुःखाचा अधिकच भडका उडाला, आणि तरीही मूल झालं नाही आणि प्रेमळ सासुसासऱ्यांची सुद्धा मनं फिरली. तेव्हा तर मला जीवन म्हणजे एक भयंकर विटंबना वाटू लागली. मूल होत नाही हा माझाच दोष...तुमचा नव्हता? सासुबाई किती तरी वेळा मला म्हणत

असत ' वांझोटी, पाषाण, कुलक्षणी ! ' काही दिवसानंतर सासरेही तेच म्हणाले, ' ही आपल्या आईची एकुलती एक मुलगी आहे, हिला भाऊ नाही, तर मग आमचा वंशसुद्धा या वांझबाईकडून कसा काय वाढेल ? ही आपल्या आईपेक्षा एक पाऊल पुढेच आहे.' माझ्यावरच नाही, माझ्या आईवडिलांवर देखील शितोडे उडाले. (**नंतर थोडं थांबून**) तेव्हा...तेव्हा माझ्या मनात काय तुफान उठत असेल याची तुम्हाला कल्पना आहे ?

(**पुरुष स्त्रीकडे पहात बोलण्याचा प्रयत्न करताना दिसतो. स्त्री गप्प बसते. जेव्हा बोलू की नको असा त्याला पडलेला संभ्रम ती पाहते आणि त्याच्या तोंडून एकही शब्द बाहेर पडत नाही तेव्हा तीच परत बोलू लागते.**)

**स्त्री** : तोंडातून शब्द फुटत नाही ? कसा फुटणार ? माझ्या मनात आलं मूल न होण्यात कुणाचा दोष आहे ? माझा की तुमचा हे मी लगेच सिद्ध करू शकेन. महाभारतात विचित्रवीर्य आणि चित्रांगद यांच्यातील दोष त्यांच्या मृत्यूनंतर वेदव्यासांनी सिद्ध केला होता. पांडु आणि धृतराष्ट्र यांचा जन्म नियोगव्रताने झाला होता. त्या राण्यांना किंवा व्यासमुनींना का कुणी पापी नाही म्हटलं. वाटलं होतं की, तुम्ही जिवंत असताना कोणी आधुनिक महर्षी शोधून आपण वांझपणाच्या दोषापासून मुक्त व्हावं आणि तुमची वंशवृद्धी करावी.

(**पुरुष एकदम उठून उभा राहतो आणि इकडे तिकडे फिरतो. असे काही त्याला स्वत:चे शरीर एकदम अद्‌भुत वाटत आहे.**)

**स्त्री** : बसा हो, बसा ! परंतु मी माझे विचार कृतीत आणू शकले नाही. त्याचवेळी तुमच्या आई–वडिलांच्या व्याकुळतेने तुमच्या हृदयाला पाझर फुटला. संपत्तीच्या वारसाची इच्छा हेही कदाचित मूल हवं असं वाटण्याचं कारण असेल. तुम्ही माझ्याकडे येऊ लागलात...सांगते ना बसा म्हणून.

(**पुरुष आता बसू लागतो पण बसण्यापूर्वी खुर्चीवरचा चिमटलेला तक्का नीट ठेवतो.**)

**स्त्री** : ज्याचा सहवास नसल्याने सगळं जग मला सुनंसुनं वाटत होतं तो सहवास देखील आता मला सुख देऊ शकत नव्हता. त्या चिमटलेल्या तक्क्याला तुम्ही व्यवस्थित करू शकलात पण माझ्या चिमटलेल्या हृदयाला नाही, याचं कारण माहीत आहे ? (**पुरुष परत बोलण्याचा प्रयत्न करतो. स्त्री निमूट बसते. पण पुरुषाचे ओठ नुसतेच हलतात, शब्द बाहेर पडत नाहीत तेव्हा स्त्री परत बोलू लागते.**)

**स्त्री** : नाही बोलू शकणार. पुढं ऐका, मीच त्याचं कारण सांगते. तुमच्या येण्याजाण्यानं मला आनंद झाला नाही. कारण तुमच्या येण्याचा हेतू काय आहे हे मला माहीत होतं. तुमचे आईवडील आणि तुम्ही यांच्यात काय चर्चा झाली त्याची कुजबुज

माझ्या कानावरून पुसटशी गेली होती. मला माहीत होतं की, तुमच्या वंशाचं नाव चालवण्यासाठी, तुमच्या संपत्तीला, वैभवाला एका उत्तराधिकाराची आवश्यकता आहे आणि त्याकरिता मनात जराही प्रेम नसतानाही माझ्या रक्तामांसातून एक पुतळा तुम्हाला उत्पन्न करायचा होता. तोही अशा कुटुंबासाठी...की, ज्या कुटूंबाबद्दल माझ्या मनात आता स्नेहाचा किंवा प्रेमाचा लवलेशही उरला नव्हता. त्यावेळी...त्या तुमच्या येण्यानं माझ्या मनात विरक्ती...मोठी विरक्ती निर्माण झाली.

**(पुरुष आश्चर्याने आ वासून तिच्याकडे पाहतो आहे.)**

**स्त्री :** (मोठ्याने हसून) आश्चर्य वाटतंय ? ... का वाटणार नाही ? पुरुष आहात ना, पुरुष ! मला वाळवंट बनवून त्यावर प्रणयाची जराही बरसात न करता त्यापासून तुम्हाला फळ हवं होतं ? तुमचा यंत्रासारखा चेहरा मला फारतर त्या यंत्राचा एक भाग बनवू शकला असता, खरी स्त्री नव्हे ! जेव्हा हा भाग चालेनासा झाला, मशीन थांबली त्यावेळी नवीन अवयव आणण्याची गोष्ट निघाली. तुमचं दुसरं लग्न ! अशा पतित, अशा अधम, अशा राक्षसी हातात आणखीन एक आत्मा, एक हृदय देऊन त्याचा नाश करण्याची भयंकर योजना ! श्रीमंतीची संततीची ही इच्छा आणि त्यासाठी हृदयाचा थरकाप उडवणारं हे बलिदान ! समाजात किती तरी कोमल हृदयांचे सुशील तरुण ब्रह्मचारीच राहतात परंतु प्रथम पत्नी असतानाही श्रीमंतांच्या इथं आणखी विवाह होऊ शकतात. का होणार नाहीत ? संपत्तीच्या उत्तराधिकाऱ्याला जन्म देणारी स्त्री देखील एक जिवंत संपत्तीच नाही का ? पैशाने ती विकत घेता येते ना ? हे पतित समाजा ! जसा काही जीव शरीराकरिता आहे. शरीर जीवासाठी नाही. माझ्यासारख्या स्त्रीचं बलिदान झाल्यावर या यज्ञात कुठल्यातरी कोमलांगीची आहुती पडणार या कल्पनेनं माझा थरकाप उडाला आणि याचमुळे...कदाचित याच कारणाने असेल...पण मला दिवस गेले.

**(पुरुष शांतपणे खुर्चीला चिकटून बसतो.)**

**स्त्री :** या घटनेनं समाधान झालं—का होणार नाही ? मलाही त्यामुळे समाधान लाभलं असं तुम्हाला वाटलं असेल. पण थांबा, ऐका, सुरवातीला एकाएकी मला जो आदर आणि मोठेपणा मिळाला त्याची हकीकत प्रथम ऐका आणि नंतर माझ्या भावनांची कथा ऐका.

**(थोडं थांबून)** वांझोटी चांगल्या कुशीची ठरली. पाषाण फुलाहूनही कोमल झाला. अवदसेचे पाय लक्ष्मीचे पाय बनले. सासुसासऱ्यांच्या मनात माझ्याबद्दल प्रेमाची एवढी भरती आली की त्याला ओहोटी नव्हतीच मुळी. क्षणोक्षणी, मिनिटा-मिनिटाला हे प्रेम सतत वाढतच गेलं.

रोज डॉक्टर आणि लेडी डॉक्टर मला तपासायला येत असत. माझी तब्येत

ठीक राहावी म्हणून जगातली कोणतीही वस्तू मागवली गेली असती. युरोप आणि अमेरिकेत कोणजाणे किती प्रकारच्या औषधाच्या आणि खाण्याच्या पदार्थांच्या ऑर्डरी गेल्या. त्या चिजा भारतात मिळाल्या नसत्या ना ! आणि मिळाल्याच असत्या तर जुन्या, शिळ्या, सरळ विलायतेहून आल्या असत्या तशा ताज्या नसत्या ना मिळाल्या ! रोज नवं पक्वान्न, नवे-नवे रुचकर, स्वादिष्ट पदार्थ माझ्या जेवण्यात येऊ लागले. सकाळी एक, दुपारी बघावं तर दुसरंच आणि संध्याकाळी तिसरंच ! माझ्या बाबतीत अगदी विरक्त अशा तुमच्या कोरड्या मनातही माझ्या बद्दलची प्रेमभावना उतू जाऊ लागली.

**(पुरुष प्रसन्नपणे स्त्रीकडे पाहतो. त्याला काही बोलायचं आहे पण तोंडाने शब्द उमटत नाही. तो खुर्चीच्या हातावर बोटं फिरवू लागतो.)**

**स्त्री : (रुक्षपणे हसून)** हे ऐकून, तुम्ही खुश झाला असाल, याच खुशीमुळं तुमची बोटं नाचू लागली आहेत. बोटं का नाही नाचणार ! एकदा का होईना माझ्याबद्दल तुमच्या मनात प्रेमभाव जागृत झाला हे माझ्या तोंडून ऐकून तुम्हाला प्रसन्न वाटणं शक्य आहे. **(थोडंसं थांबून)** स्त्रीला मुलाची किती ओढ असते, आई बनण्याची किती तीव्र इच्छा असते हे मी ऐकलं होतं, वाचलंही होतं. परंतु, सासू, सासरे आणि तुम्ही यांचा उत्साह पाहून माझी काय स्थिती झाली, माहीत आहे ?

**(पुरुष गंभीरपणे स्त्रीकडे पाहतो.)**

**स्त्री :** त्याची प्रतिक्रिया ! आतापर्यंत तुम्ही आणि तुमच्या आईवडिलांनी माझ्या सगळ्या सद्‌भावनांचा चोळामोळा करून टाकला होता. ही संपत्ती, हे वैभव म्हणजे माझ्या हृदयावर ठेवलेला एक फार मोठा भार होता. तुमच्या कुटुंबाचा मोठेपणा, वंशाची प्रतिष्ठा ही मला एक विटंबना वाटत होती. या सर्वांसाठी मी एका वारसाला जन्म देते आहे ही गोष्ट आनंदाची आणि उत्साहाची वाटत नव्हती तर उलट क्लेशदायक आणि वेडेपणाची वाटत होती. हे सगळं नष्ट व्हावं अशी माझी इच्छा होती त्याच्या रक्षणाची नव्हती.

**(पुरुष थरथरतो.)**

**स्त्री :** भीतीने थरथर कापू लागलात ? कापा, असेच थरथर कापा ! तुमची ही थरथर सगळ्या समाजाला आणि जगाला एकदा पाहू दे. **(थोडं थांबून)** माझ्या मृतवत् मनाला जिवंत बाळाची इच्छाच राहिली नव्हती. जसजसा तो माझ्या पोटात वाढू लागला तसतसं मला वाटू लागलं तुमच्या आईने मला ज्या पत्थर शब्दाने संबोधलं होतं तो पत्थरच माझ्या पोटात वाढतो आहे.

**(पुरुष परत उभा राहून येरझारे घालू लागतो. आता तो अशा प्रकारे येरझारे घालू लागतो की, त्याला आपलं शरीर सांभाळणं अशक्य झालं असावं.)**

**स्त्री : (अतिशय तीक्ष्ण स्वरात)** बसा !

**(पुरुषावर तिच्या या छोटयाशा वाक्याचा इतका प्रभाव पडतो की तो गडबडून लगेच बसतो.)**

**स्त्री :** प्रसूतीची वेळ आली. बापरे केवढया भयानक वेदना ! आणि ज्यावेळी डॉक्टरांनी सांगितलं की, माझे प्राण वाचवायचे असतील तर मुलाचं डोकं कापावं लागेल आणि जर मुलाला वाचवायचं असेल तर माझं पोट चिरावं लागेल आणि त्यात माझे प्राण जातील त्यावेळी ... त्यावेळी तुम्ही सगळे कसे फुटबॉलसारखे उडालात. दोघं कसेही करून वाचावेत अशी तुमची पहिली इच्छा होती. श्रीमंत लोक मिळालेली वस्तू सोडायला तयार नसतात आणि सोडतीलही ... पण त्याहीपेक्षा मोठी वस्तू मिळाल्यानंतर किंवा मिळेल या आशेनं. शेवटी ... शेवटी माझं पोट कापलं जावं असाच निर्णय घेतलात. अधमांनो, पतितांनो, मुलाची एवढी किळसवाणी इच्छा. संपत्तीच्या उत्तराधिकाऱ्याची एवढी घाणेरडी लालसा ! मी पोट चिरायला नकार दिला. तेव्हा ... तेव्हा थोडी कुजबुज झाली. मला सांगितलं की मूल डोके कापूनच काढलं जाईल आणि फसवून बेशुद्ध केलं गेलं. शुद्धीवर आल्यावर लक्षात आलं की, माझं पोट चिरलं गेलं आहे. डॉक्टर ... डॉक्टर तर पुरुषच होते पण ती लेडी डॉक्टर स्त्री असूनही एका मुलासाठी ... जी रोज कोणजाणे कितीशी जन्माला येतात आणि मरतात ... अशा एका मुलासाठी एका सुसंस्कृत, सुशिक्षित आणि सभ्य बाईचं पोट चिरण्यासाठी विकत घेतली गेली ? **(थोडंसं थांबून)** एका स्त्रीच्या भावनांशी आणि शरीराशी हा जो खेळ खेळला गेला तो एखाद्या पुरुषाच्या शरीर आणि आत्म्याशी खेळता आला नसता का ? **(थोडं थांबून)** शुद्धीवर आल्यावर जे पहिले शब्द माझ्या कानावर पडले ते तुमच्या आईचे होते ! 'मुलगी झाली' या स्वरात इतकी वेदना भरलेली होती – वेदना कसली एक विडंबना होती ! 'मुलगी झाली आहे' जसा काही भूकंपच झालाय. आगीचा जणू वर्षाव झाला आहे, वीज कोसळली आहे. समुद्रातील अचानक उठणाऱ्या वादळाप्रमाणं त्याच्या लाटेनं या घरात वारसाचा प्रलय निर्माण केला होता. मला एकाएकी प्राप्त झालेला सन्मान क्षणात धुळीला मिळाला होता. माझ्या आईला मी मुलगीच झाले होते. मलाही तेच होणार, दुसरं काय झालं असतं ? दगड, धोंडा, लाकूड, कोळसा झाला नाही हेच आश्चर्य ! मुलगी असणं ही इतकी तिरस्करणीय, इतकी वाईट गोष्ट होती की, कोणी तिच्याकडे डोळे फिरवून पहातही नव्हतं. पण ... पण ... माझी काळजी घेतली जात होती. मी वांझोटी ठरले नव्हते ना ! ... कदाचित मी आता एका मुलग्याला जन्म देऊ शकले असते. मला स्वतःला काही किंमत नव्हती. मुलगा जन्माला घालणारी मशीन झाले असते तर माझा आदर होणार होता. त्याचसाठी

माझ्याकडे लक्ष दिलं जात होतं ... पण ... मी जाते आहे, मी चालले. ताप वाढतो आहे.

**(पुरुष घाबरून उभा राहतो.)**

**स्त्री :** नाही, एवढया लवकर नाही. थोडा वेळ लागेल आणि जरी लगेच गेले तरी तुम्ही जवळ आहात म्हणून भूत बनून लगेच तुम्हाला दाबून टाकणार नाही आणि समजा पिशाच्च बनून तुमच्या मानगुटीवर बसलेच तर पळालात तरीही सुटका करून घेऊ शकणार नाही. **(बटावून)** बसा पहिले !

**(पुरुष घाबराघुबरा होऊन बसतो. त्याच्या चेहेऱ्याचं उरलं-सुरलं तेजही नाहीसं होतं.)**

**स्त्री :** यावेळी मला सर्वात प्रिय गोष्ट कोणती आहे, माहीत आहे, ? **(थोडं थांबून पाळण्याकडे बोट दाखवून)** ती बेबी. का माहीत आहे ?

**(पुरुष तिच्याकडे असं पाहतो की, असं काही खूप लांबून पाहतो आहे. फार दुरून शब्द आल्यासारखं तिचं बोलणं ऐकतो आहे.)**

**स्त्री :** माझं या मुलीवर प्रेम आहे याचं कारण तिच्यावर दुसऱ्या कुणाचीच माया नाही. ती कुणालाच नको आहे. आज माझ्या हृदयात वात्सल्य उत्पन्न होत आहे. माझं दूध पाजून, डोळयातील आसवांनी न्हायला घालून हिला बलवान आणि पवित्र बनवायचं ठरवलं आहे. **(थोडं थांबून)** पण . . . पण मला माहीत आहे मी हिच्यासाठी जगू शकणार नाही. तुम्हाला, तुमच्या आईवडीलांना, या धन-वैभवाला, या कुटुंबाला कशालाच सोडून जाण्याचं दु:ख मला वाटत नाही. पण या मुलीला सोडून जाताना मात्र वाईट वाटतंय ! तुम्ही सर्वांनी मिळून फार पूर्वीच माझ्या आत्म्याचा आणि हृदयाचा खून केला आहे आणि आज मुलाच्या लालसेने माझं पोट चिरून माझ्या या शरीराचाही खून केला आहे. **(थांबून)** जाताजाता त्या परमेश्वरापाशी माझी प्रार्थना आहे की, परमेश्वरा ! हिंदुधर्मात मला जन्माला घालू नकोस. घालायचंच झालं तर निदान श्रीमंत कुटुंबात तरी नको, श्रीमंत घरात जन्माला आलेच तर निदान लग्न तरी धनवान कुटुंबात होऊ देऊ नको, आणि हे सगळंच झालं तर मला निदान सुशिक्षित, सुसभ्य, सुसंस्कृत न बनवता मुलं जन्माला घालणारी एक भावना-शून्य मशीन बनव. ही माझी एकटीचीच स्थिती नाही. बहुतेक सर्व श्रीमंत कुटुंबातील स्त्रियांच्या नशिबी हेच आल्याचे मला दिसून आलं आहे. आणि जर मी सुशिक्षित, सभ्य आणि सुसंस्कृत झालेच तर मला निदानं धार्मिक, सामाजिक आणि कौटुंबिक बंधने झुगारून देणारी बनव. जसे तुम्ही श्रीमंत पुरुष आम्हा स्त्रियांचे खून करून त्यांच्या प्रेतावर तांडवनृत्य करू शकता तशीच मी देखील तुमचा खून करून त्या वाहणाऱ्या रक्तावर थयथय नाचेन-प्रलयनृत्यासारखी ! **(धापा टाकत थोडं थांबून)**

यापेक्षा गरीब लोकच जास्त सुखासमाधानाने राहत असावेत. बायकांना मोलकरणी-सारखं घरातलं काम करावं लागतं परंतु पुरुषांना तुमच्यासारखी बाहेर मौजमजा उडवायला तर मिळत नाही. तिथे पतीपत्नीचं एकमेकावर प्रेम असतं. सासुसासऱ्यांची सुनेवर माया असते. आणि तुम्ही श्रीमंत जी थेरं करता ती तर नसतातच नसतात. वारसाची काळजी नसते. माझ्यासारखा प्रसुतीचा त्रास तिथं एकाद्या स्त्रीला झालाच असता तर श्रीमंत कुटुंबात जसं माझं पोट चिरलं गेलं तसं न करता त्यांनी हॉस्पिटलमध्ये तिच्या मुलाचं डोकं कापून काढलं असतं. (**थोडं थांबून**) याच बरोबर परमेश्वराकडे आणखीन एक प्रार्थना आहे की, माझ्यासारखी दुसऱ्या कुणाची भीषण आहुती पडू देऊ नकोस. आणि जर माझ्या जागी दुसरी कोणी आलीच तर ती भावनाशून्य कोरडी असू दे. तिच्यामध्ये शिक्षणाचा सुगंध किंवा संस्काराची कोमलता नसावी. ती फुलासारखी किंवा कळीसारखी कोमल असू देऊ नको. हे स्मशान आहे. इथे प्रेताची आवश्यकता आहे, (**परत थोडं थांबून क्षीण स्वरात**) जिवंत माणसाची नाही. प्रत्येक चित्रात प्रकाश आणि सावली दोन्ही असतात. पण माझ्या जीवन चित्रात फक्त काळोखच आहे आणि पावसाच्या पाण्याने धुतले जावेत त्याप्रमाणे माझ्या आसवानी त्यांचे उरले सुरले रंगही पुसले गेले आहेत. मला काहीच पाहता आलं नाही, ऐकता आलं नाही, बोलताही आलं नाही. माझे डोळे, माझे कान आणि जीभ नेहमीच थंड राहिली, बर्फासारखी थंड, नाही, नाही . . . प्रेतासारखी निश्चेष्ट ! माझ्या जीवनाचे तास, दिवस, महिनेच काय . . . पण वर्षे देखील . . . ही वर्षेच्या वर्षे पाला पाचोळ्यासारखी फेकली गेली आहेत आणि माझं हे असलं आयुष्य तुमच्या उपहासांचा विषय ठरलं आहे. एखाद्याचं मर्मभेदी दुःख जेव्हा दुसऱ्याच्या चेष्टेचा विषय बनतं. तेव्हा ... तेव्हा तर ...

(**फुलदाणीतलं एक फूल पडतं. पुरुष ते उचलून परत फुलदाणीत ठेवतो.**)

**स्त्री :** (**अतिशय रुक्ष हसून क्षीण स्वरात**) तुम्हाला वाटलंच तर तुम्ही खाली पडलेलं फूल परत फुलदाणीत ठेवू शकता पण हे...हे मातीत गेलेलं आयुष्य . . .

(**आपल्याच आवाजाला घाबरल्याप्रमाणे स्त्री एकाएकी गप्प बसते. काही क्षण स्तब्धता**)

**स्त्री :** (**एकाएकी उंच स्वरात**) पहा, पहा हो ! आता मी चालले. ऐका जाता-नाचा हा शाप ऐका . . . हो, शाप देतेय तुम्हाला ! तुमचा वंश निर्वंश होऊ देत. या ऊपर या मातीत गाडला जाण्यासाठी कोणताही जीव जन्माला न येवो. हे सोनं–चांदी, हे हिरे–मोती हे निर्जिव वैभव हृदय, भावना आणि आत्म्यापासून वंचित असं हे सारं प्रयोजन . . . (**अत्यंत क्षीण स्वरात**) इतकं सगळं . . . सगळं असूनसुद्धा मी जर धर्माप्रमाणे पतिव्रता ... पतिव्रताच राहिले असेन तर .. माझ्या ...

शापाने ... शा . . . पा . . . ने भस्म . . . भस्म . . . भ. . .

(स्त्री डोळे मिटून घेते. त्याचवेळी पाळण्यातून रडण्याचा आवाज येतो. अगोदरच चेहरा निस्तेज पडलेला तो पुरुष घाबरून झटकन् उठतो आणि झोकांड्या देत प्रत्येक वस्तुंचा आधार घेत दरवाजा उघडून बाहेर जाऊ लागतो.)

(पडदा पडतो.)

( **स्थान : पत्नीचं प्रसूतिगृह** )

**वेळ : संध्याकाळ**

प्रसूतिगृह म्हणजे खेड्यातल्या घरातली एक साफसूफ केलेली खोली. मातीने सारवलेल्या स्वच्छ भिंती. अरुंद दरवाजे आणि छोट्या खिडक्या. दारे आणि चौकटी गावच्या पद्धतीच्या असल्या तरी तेल-पाणी लावून स्वच्छ ठेवलेल्या आहेत. सर्व दारे आणि खिडक्या बंद आहेत. छतावर गोणपाट शिवून तयार केलेला कपडा ताणला आहे आणि त्याच्या चारी बाजूंना लाल आलवणाची झालर सोडली आहे.

जमीन शेणाने सारवलेली आहे. जमिनीवर सुंभाच्या दोऱ्याने विणलेलं एक खाटलं आहे, त्यावर स्वच्छ बिछाना अंथरलेला आहे. त्या खाटेजवळ लाकडाच्या एका मोठ्या फळीवर बाळंतिणीसाठी लागणारे काही सामान ठेवलेले आहे. लाकडाच्या फळीजवळच एका मातीच्या शेगडीत निखारे पेटत आहेत. खाटेजवळच एक लाल रंगाचे प्रिंटेड जाजम पसरले आहे. जाजमावर बसलेल्यांना सूतिकागृहाची शिवाशिव होऊ नये म्हणून खाट आणि जाजम यांच्यामध्ये हळदीची सीमारेषा काढलेली आहे. खाटल्यावर एक स्त्री झोपलेली आहे. ती कुशीवर झोपल्यामुळे तिची नजर जाजमावर आहे. तिचा गळ्यापर्यंतचा भाग लाल रंगाच्या स्वच्छ रजईने झाकलेला आहे. तिचा चेहरा आणि दोन्ही हात रजईच्या बाहेर आहेत. तिच्या मागेच एका छोट्या रजईत एक नुकतेच जन्माला आलेलं मूल झोपलेले आहे पण त्याला रजईत गुंडाळलेले असल्यामुळे ते दिसत नाही. स्त्रीचे वय बहुधा ३० वर्षाचे असावे. ती गव्हाळी रंगाची आणि आकर्षक बांध्याची आहे. जाजमावर एक पुरुष बसला आहे. त्याचं वय जवळजवळ ३२-३३ आहे. तोही गव्हाळ वर्णाचा साधारण देहयष्टीचा, दिसायला आकर्षक असा आहे. स्वच्छ सफेत कुडते आणि पांढरे शुभ्र धोतर नेसला आहे. गळ्यात लाल चौकडीचे उपरणे आहे. त्याचे सारेच कपडे स्वच्छ आहेत. एका पितळेच्या पणतीत तेवत असलेल्या काही वातींच्या प्रकाशात ते दृश्य दिसत आहे, विशेषत: स्त्रीचा व पुरुषाचा चेहरा ! स्त्रीच्या चेहऱ्यावर अतिशय प्रेमळ भावना दिसत आहेत. अश्रूंनी डबडबलेल्या उघड्या डोळ्यांनी ती स्वप्न पहात असावी असे वाटते. ती पुरुषाकडे पाहून त्याच्याशी काही बोलते आहे. तिचा आवाज क्षीण असला तरी त्याच्यात

जडपणा आहे. हा जडपणा, बाहेर पडणारे अश्रू थोपविण्याचा सतत प्रयत्न करीत राहिल्यानेच आलेला असावा. ती स्त्री आसवे थोपविण्याचा सतत प्रयत्न करीत आहे. आसवांची एक रांगच लागलेली दिसत आहे. अधिक बोलता यावे, बोलण्याची ताकद आणि होणारे कष्ट एकाच वेळी खर्च होऊ नयेत म्हणून ती आसवे गिळण्याचा सतत प्रयत्न करते आहे. त्या प्रयत्नात चेहरा, गळा आणि डोळे आसवांच्या धारांनी भिजले आहेत. ती हळूहळू प्रत्येक शब्दावर जोर देत बोलत आहे. पुरुषाच्या चेहऱ्यावर शोक आणि लाचारी दिसत आहे. तो काहीच न बोलता, अत्यंत भावुकतेने तिच्याकडे टक–मक पाहतो आहे. अगदी डोळ्यात प्राण आणून पाहतो आहे.

**स्त्री :** बरं का...आज हे शेवटचं...माझं शेवटचं बोलणं ऐका, नाथ, जी तुम्हाला प्राणांपेक्षा प्रिय होती, जी दिसायला साधारण असूनही तुम्हाला जगात सर्वात सुंदर वाटत होती, जिच्या स्वरात खास काही नसूनही तुम्हाला स्वरसम्राज्ञी वाटत होती अशा तुमच्या ह्या लाडक्या पत्नीचे हे शेवटचे शब्द !

**(पुरुषाचे डोळे अश्रूंनी भरून येतात. तो डोळे पुसतो.)**

**स्त्री :** हे काय...असं काय बरं करता प्राणेश्वर ! तुम्ही जर असे व्यथित झालात तर मग माझं बोलणं मला अवेळीच थांबवावं लागेल आणि एक–फक्त एकवेळ मनातलं सर्व काही तुम्हाला सांगून टाकायची माझी शेवटची इच्छा मनातल्या मनातच राहून जाईल. तीच घटना आणि त्याच गोष्टी प्रत्येक वेळी त्यात नाविन्य ओतून फक्त प्रेमवेडेच सांगू शकतात. तर मग...मग अशा प्रसंगी तरी...**(गप्प होते आणि कातर दृष्टीने पुरुषाकडे पहात थोड्या वेळाने)** माझी शेवटची इच्छा पुरी होऊ देणार नाहीत का ?

**(पुरुष जरा खाकरून ताठ बसतो.)**

**स्त्री :** हां, आता कसं, नाथ ! यावेळी मन कठोर करा, सगळं ऐकून घ्या. तुम्ही नेहमीच माझ्या सगळ्या इच्छा पूर्ण केल्या आहेत. ही शेवटची इच्छाही पुरी होऊ द्या. **(थोडसं थांबून, गळा साफ करत)** प्राणनाथ ! तुमच्याशी विवाह होऊन एक तप लोटलं, तुमच्याशी लग्न झाल्यानंतरचा तुमच्याबरोबर घालवलेला तो सारा काळ, सिनेमातील दृश्याप्रमाणे माझ्यासमोर नाचत आहे. बारा वर्षांपूर्वी, याच ऋतूत, ज्यावेळी डोंगर, वनं, उपवनं आणि शेतं नवनवीन पालवीनं, फळा-फुलांनी बहरून गेली होती, त्यावेळी, मला आठवतं नाथ, आपला वाङ्निश्चय झाला आणि थोड्याच दिवसांनी विवाह ! तुमचं घर आजूबाजूच्या आणि दूरदूरच्या गावांतील शेतकऱ्यांना सुद्धा माहीत होतं. त्या सर्व भागातील तरुणांमध्ये तुमच्याइतका सुंदर आणि सुशिक्षित दुसरा कोणीच नव्हता. का कुणास ठाऊक पण मलाही सुंदर म्हटलं जात असे.

**(पुरुष रुक्ष हसून मान डोलावतो.)**

**स्त्री :** (**कोरडं हसून**) मी आताच सांगितलं नाथ, तुमच्या दृष्टीनं सगळ्या जगाचं मीच सुंदर आहे. (**थोडं थांबून**) आईनं आपल्या या लेकीला अतिशय प्रेमाने वाढवलं होतं. तिला जराही कोमेजू दिलं नव्हतं आणि वडिलांनी चौथीपर्यंत शाळेत शिक्षण दिलं होतं. ते स्वत: पंडित होते. त्यांच्याइतकं संस्कृतचं ज्ञान आसपासच्या गावात कुणालाच नव्हतं. त्यांनी स्वत: मला घरीच संस्कृत भाषेच्या साहित्याचं जुजबी ज्ञान दिलं होतं. मला संगीताचंही थोडं फार शिक्षण मिळालं होतं.

(**पुरुष उपरण्याने तोंड आणि गळ्याचा घाम पुसतो आणि दुसऱ्या टोकाने कान साफ करतो.**)

**स्त्री :** (**तसेच कोरडे हसून**) कानांशी चाळे बंद करा की ! हो, जगातील सर्व स्वरांत तुम्हाला माझाच स्वर सुरेल वाटतो हे मी तुम्हाला नाही का सांगितलं ? (**थोडं थांबून**) आईवडिलांनी किती मोठ्या आशाआकांक्षा उराशी बाळगून माझा हात तुमच्या हातात दिला होता ! स्वत: पंडित असल्यानं कन्यादानाच्या वेळी माझ्या वडिलांनी शुद्ध आणि संगीतमय उच्चारांत दानाचा संकल्प सोडला होता. तितक्याच निश्चयानं आम्ही एकमेकांच्या कर्तव्याच्या आणा-भाका घेतल्या होत्या. (**थोडं थांबून**) नाथ ! अग्नीला साक्ष ठेवून केलेल्या त्या प्रतिज्ञांचं मी कितपत पालन केलं हे सांगता येणार नाही परंतु ... तुम्ही ... तुम्ही मात्र त्यांचं अक्षरश: पालन केलं आहे.

(**पुरुष उजव्या हाताची नखे डाव्या तळहातावर घासतो आणि एका विचित्र नजरेने स्त्रीकडे पाहतो.**)

**स्त्री :** (**तसेच हसत**) माझ्यात काही दोष असेल असं तुम्हाला वाटतच नाही. परमेश्वरच निर्दोष आहे असं जेव्हा मी म्हणते तेव्हा तुम्ही नेहमी जे उत्तर देता ते मी कधी विसरू शकेन ? तुम्ही त्यावर म्हणता आणखी एक व्यक्ती निर्दोष आहे. सुरवातीला कधी-कधी विचारत असे कोण बरं ती व्यक्ती ? उत्तर मिळत असे 'तू'. याच कारणासाठी बऱ्याच दिवसापासून मी विचारणंच सोडून दिलं. (**थोडे थांबून**) प्राणनाथ ! त्या ... त्या संकल्पाच्या वेळी, त्या प्रतिज्ञांच्या वेळी माझ्या मैत्रिणींनी जे गीत म्हटलं होतं त्याचे पडसाद कितीतरी वेळा माझ्या कानांत उमटले होते आणि आज तर ते असे उमटताहेत की पूर्वी असे कधीच उमटले नसावेत. (**परत थोडे थांबून**) मी ... मी तुम्हाला त्यावेळी प्रथमच पाहिलं होतं ... घुंगटाच्याआडून आणि कुणाला दिसू नये म्हणून चोरट्या नजरेनं ... झटकन तुम्हाला कसं पाहून घेतलं असेन ? तुमच्या त्या अस्पष्टशा ओझरत्या दर्शनानंच माझ्या शरीरावर आनंदानं रोमांच उभे राहिले होते. हृदयाला कशा ... कशा अगदी गुदगुदल्या होत होत्या. ती ... ती घटना माझ्या जीवनाचा एक ठेवा ... एक अतूट ठेवा बनली आहे. (**पुन्हा थोडेसे**

**थांबून**) सासरी येताना, आई, वडील, आपलं वडिलोपार्जित घर आणि तेथील परिचित वातावरण यांचा निरोप घेतांना, पावलं जड झाली, गहिवरून आलं, डोळे अश्रूंनी डबडबले परंतु सजवलेल्या बैलगाडीतून जाताना माझ्या तिळतिळ तुटणाऱ्या हृदयाला एक मोठा आधार वाटावा तसे तुम्ही माझ्या बाजूला येऊन बसलात. तुमचं गाव, तुमचं घर जसजसं जवळ येऊ लागलं तसतसा माझ्या हृदयात नवचैतन्याच्या, एका आगळ्याच उत्साहाच्या लाटाच लाटा उमटू लागल्या. ज्या गावात, ज्या घरात तुमचा जन्म झाला, जिथे तुमचं सांभाळ केला गेला, तुम्ही लहानाचे मोठे झालात, शिक्षण घेतलंत तो तुमचा गांव पाहण्यासाठी माझं मन कसं अधीर झालं होतं ! मी सासऱ्यांना पाहिलं होतं आणि त्यांच्या बद्दलच्या आदरानं आणि पूज्य भावानं मनाचा कोना कोपरा भरून गेला होता. आता सासुबाईंना पाहण्याची उत्कंठा दाटली होती (**थोडं थांबून**) सारखं वाटत होतं – तुम्हाला विचारावं, तुमचं गाव अजून किती दूर आहे ? परंतु त्या आधी तुमच्याशी कधीच बोलले नव्हते. त्यामुळे जीभ उचलत नव्हती. जेव्हा बैलगाडी एका गावाकडे वळून हळूहळू चालू लागली तेव्हा समजलं की, तुमचा गाव आला. या गावात तुमचा जन्म झाला, तुम्ही मोठे झालात, शिकलात या भावनेन मन भरून आलं. त्या गावची प्रत्येक वस्तू मला सुंदर आणि पवित्र वाटू लागली. तिथल्या मातीच्या कणा–कणात आणि झाडांच्या पाना–पानांत सौंदर्य आणि पावित्र्य दिसू लागले. तुमच्या घराजवळ येऊन गाडी थांबली आणि स्त्रियांनी मधुर स्वरांनी गीत म्हणून माझं स्वागत केलं तेव्हा त्या गीताचे पडसाद कसे अगदी माझ्या हृदयात उमटले ! जेव्हा सासुबाईंनी मला आरती ओवाळली, माझ्यावरून पाणी उतरवून टाकलं आणि मी त्यांना वाकून नमस्कार केला तेव्हा त्यांनी मला हृदयाशी धरलं त्यावेळी मला जे सुख, जो आनंद लाभला तो मी कधीच विसरू शकणार नाही. सासऱ्यांना पाहिलं आणि मर्यादाशील पूज्यभाव अंतःकरणात दाटून आले. त्यावेळी हृदयात ज्या भावना उचंबळून आल्या त्या अमर्याद होत्या. ज्या छातीवर सासुबाईंनी माझं डोकं टेकवलं होतं ती त्यांची छाती मला सागरासारखी, आकाशाप्रमाणं, अथांग – अमर्याद वाटली. (**थोडं थांबून**) आणि ... आणि त्यानंतर त्या दिवशीची ती पहिली रात्र ... पहिली ...!

(**पुरुषाचे डोळे आसवांनी भरून येतात.**)

**स्त्री** : नाही, नाही ! तुमच्या डोळ्यातून एक टिपूसही गळलं तरी माझी वाचा बंद होईल आणि माझी शेवटची ... शेवटची इच्छा तशीच अपुरी राहून जाईल. (**थोडं थांबून पुरुषाकडे कातर दृष्टीने पहात**) बरं, जाऊ देत ... पहिल्या रात्रीची घटना नाही सांगत, ती तुम्हाला माहीत आहे. ती मी अबोल सुखाच्या ठेव्यासारखी मनातच साठवून पुढं सांगते ... (**पुन्हा थांबून**) ज्या–ज्या इच्छा होत्या त्या सर्व

पुऱ्या होत गेल्या. प्राणेश, एवढंच नव्हे तर ज्यांचा मी पूर्वी कधी सुद्धा विचार केला नव्हता अशा नवनव्या इच्छा हृदयात उठत होत्या आणि पुऱ्या होत होत्या. मी सासुबाईच्या तर गळ्यातला ताईतच बनले होते. सासऱ्याचं मी म्हणजे सर्वस्व झाले होते आणि ... तुमची ... तुमची तर कोण होते ते सांगूच ...

(**पुरुष हातावर हात ठेवून एक मोठा सुस्कारा सोडतो.**)

**स्त्री** : हा दीर्घ सुस्कारा ! ... हा श्वास ... यावेळी माझा श्वास कोंडून टाकील.

(**पुरुष ताठ बसतो.**)

**स्त्री** : हं, असं नाही हं करायचं. हिम्मत धरा, हृदय–निधी ! (**थोडं थांबून**) आता सासुबाई म्हाताऱ्या होत चालल्या होत्या. तरीही मला घरातलं काम करू देत नव्हत्या. त्यांच्या हातातली कामं मला मोठ्या मुष्किलीनं काढून घ्यावी लागत. ज्या ज्या वेळी मला एखादं काम करताना पहात त्या त्या वेळी त्या म्हणत, 'थकून जाईल माझी सुनबाई, थकून जाईल' आणि त्यांचा तो गोड आवाज कानी पडला की, काम करायला मला दुप्पट उत्साह येई. सासरे जेव्हा मला काम करताना पाहत असत तेव्हा म्हणत, 'हे दिवस हिचे खाण्यापिण्याचे, हुमण्याबागडण्याचे, काम करण्याचे नव्हेत !' त्यावेळी अंगावर रोमांच फुलत असे. आणि तुम्ही...तुम्हाला तर सारखंच माझ्याजवळ रहायला हवं असायचं. रात्रीच काय दिवसा–उजेडीसुद्धा. तुम्ही तरुण होता, लहान नव्हता तरीही लहान मुलासारखी शिटी काय वाजवत होता, सासुबाईचा डोळा चुकवून खुणा काय करत होता, दारं खिडक्या उघडून त्यांच्या फटीतून पहात काय होता आणि दारावर थाप मारून मला आपल्या खोलीत बोलावण्याकरिता काय–काय करत होता ! काही वेळा मी कशीवशी यायची आणि एकदोन गोष्टी बोलून लगेच परत फिरायची. त्यावेळी माझ्या साडीचा पदर पकडून तुम्ही केविलवाण्या नजरेनं माझ्याकडे पहात रहायचे. तुमची ती दृष्टी...ती अनुपम दृष्टी...

(**पुरुष मान वळवून दुसरीकडे पाहतो.**)

**स्त्री** : (**केविलवाणेपणे**) जरा इकडे पहाता, या इथं, प्राणेश !

(**पुरुष झटकन मान वळवून स्त्रीकडे पाहतो आणि जरा ताठ बसतो.**)

**स्त्री** : मीच सारखी बोलून-बोलून तुम्हाला घरची कामं करायला आणि सासऱ्यांना थोडा आराम द्यायला लावायची. तुमच्या आणि माझ्या या कामांच्या वाढत्या व्यापामुळं आपला विरह–कालही वाढत होता. पण त्याचा परिणाम ! त्यानंतर रात्री आपण जेव्हा भेटत असू तेव्हाचं ते मीलन ! आणि ते मीलन जेव्हा चांदण्या रात्री होत असे तेव्हा...! तेव्हा तर विचारायलाच नको ! चांदण्याचा आनंद आपण आपल्या छोट्याशा खोलीतच घेत होतो. बाहेर जायला लाज वाटत असे, आपण खिडकी उघडत असू आणि त्यातून चंद्राची किरणं आपल्या हृदयात नवनवीन इच्छा

निर्माण करीत खोलीत घुसत असत. त्या किरणांच्या नृत्यानं आमच्या हृदयात उल्हासाच्या लहरी उसळायच्या. **(थोडं थांबून)** थोड्या दिवसानंतर आपण बाहेरही फिरू लागलो. त्यावेळी कधी–कधी तुम्ही मारलेल्या त्या ताना आणि मला आग्रह करकरून गायला लावणं ! माझं गाणं ऐकून तुमचं ते नाचणारं मन ! चांदणं तर प्रत्येक महिन्यात असे पण झोपाळे मात्र वर्षातून एकच महिना आणि होळी तर वर्षातून एकच दिवस. गावातील उत्सव ! श्रावणातील ते 'कजली गीत' आणि होळीतला तो धुमाकूळ ! आणि या सगळ्या सुखांचे आराध्य दैवत तुम्ही...

**(पुरुष एकाएकी उभा राहून येरझाऱ्या घालू लागतो. त्याच्या चालीवरून त्याला आपले शरीर जड झालंय असे वाटत असावे. स्त्री निमूटपणे त्याच्याकडे पाहत आहे. त्याचा चेहरा सांगतो आहे की, बोलण्यासाठी तो शब्द शोधतोय, काही वेळ स्तब्धता पसरते.)**

**स्त्री :** प्राणनाथ ! आज तुम्हाला मी फार कष्ट देत आहे हे मला माहित आहे... परंतु...आज तुम्हाला हे सहन करावंच लागेल. बसा प्राणेश ! हृदयेश्वर बसा !

**(पुरुष पुन्हा निमूटपणे बसतो आणि एका हाताने दुसऱ्या हाताची बोटे दाबत राहतो.)**

**स्त्री :** विहाराबरोबरच आहार आणि वस्त्रांचीसुद्धा कमतरता नव्हती. गाईचं दूध, म्हशीच्या दूधाचं दही, ताक आणि तूप, कधी ज्वारी–बाजरीच्या तर कधी गव्हाच्या तर कधी जवाच्या पोळ्या, मूग आणि उडदाची डाळ आणि आपल्या भाजीच्या मळ्यातली हिरवी–हिरवी ताजी भाजी ! पौष आणि माघात हरबऱ्याचा उळा व गव्हाचा हुरडा तर आश्विन–कार्तिकातला ज्वारी आणि मक्याचा हुरडा ! या खाण्यापिण्याबरोबरच ल्यायला साधी आणि स्वच्छ वस्त्रे. कपड्यांमध्ये सुद्धा अगणित रंगाची इंद्रधनुष्ये ! श्रावणातली चुनडी आणि वसंत ऋतूतलं वसंती लुगडं, दिवाळीला सासूनं सोनेरी चमकदार टिकल्यांचे काठ लावून माझ्यासाठी तयार केलेली लाल साडी ! एखाद्या जमीनदाराला, लखोपतीला किंवा कोट्याधिशाला देखील आपल्याला लाभलेलं सुख लाभणं कठीण आहे, नाथ ! **(थोडं थांबून)** आपल्याला कसलं दुःख नव्हतंच असं नाही. सुख–दुःखाची चक्रं नेहमीच फिरत असत. पण दुःखातसुद्धा आपलं एकमेकावरचं प्रेम आपल्याला सांभाळून घेत असे. सासू वारली त्यावेळी मला वाटलं सगळ्या घरात अंधार खायला उठलाय. आणि सासरे गेले त्यावेळी तर सगळं जगच खायला उठलं. त्यावर्षी धान्यं पिकली नाहीत, आर्थिक संकटं आली परंतु माझ्यासाठी तुम्ही आणि तुमच्यासाठी...आणि तुमच्यासाठी... **(ती थांबते.)**

**(पुरुषाच्या डोळ्यांतूनही आसवे येतात पण तो ती लगेच पुसून टाकतो आणि**

**आरामात असल्याचे भासवतो. या प्रयत्नात तो खालचा ओठ दातांनी चावतो. काही वेळ स्तब्धता पसरते.)**

**स्त्री : (हळू-हळू)** सासूबाई गेल्यावर माझी काम वाढली आणि सासरे गेल्यावर तुमची ! दिवसा आपल्याला वेळच मिळत नसे पण रात्र मात्र आपली होती. आणि दिवसा...दिवसासुद्धा...पहाटेच तुम्ही शेतावर निघून गेल्यावर मी तुमचंच स्मरण करीत सर्व कामं करीत असे. गायी म्हशींचे दूध काढताना दुधाच्या धारातून तुमच्या प्रेमधारेची आठवण होत असे. त्या धारेचा भांड्यात होणारा आवाज तुमचा प्रणयी-स्वरच वाटायचा जणू ! दही घुसळताना मडक्यातून निघणाऱ्या लोण्यात तुमच्या प्रेमाची स्निग्धता दिसायची ! गहू आणि डाळ दळताना जात्याची घरघर सुरू झाली की, मेघगर्जनेच्या वेळी तुम्ही प्रेमानं घातलेली मिठी आठवायची. भाकरी करताना ती फुगली की वसंत ऋतूतलं फुलांचं-फुलणं आणि त्यावेळी तुम्ही घेतलेलं चुंबन आठवायचं. भांडी घासतानाही मला आनंद वाटे, कारण त्याच भांड्यांत तुमच्यासाठी मी स्वयंपाक करणार आहे हे विसरू शकत नसे आणि त्या भांड्यात स्वयंपाक करून थाळीत वाढून घेत असे, बरोबर दूध आणि लोणी घेऊन मी जेव्हा तुम्हाला देण्यासाठी शेतावर येत असे तेव्हा...तेव्हा तुम्हाला जेवताना पाहून आणि तुमची प्रेममुद्रा बघून मला वाटे की, माझे जीवन धन्य झालं, सफल झालं. **(थोडं थांबून)** संध्याकाळी लगबगीनं मी तुमची खोली झाडत असे. झाडूची झरझर माझ्या मनात प्रेमाचे झंकार उमटवीत असे. शेतातून येऊन मातीने माखलेले पाय स्वच्छ केल्यानंतर खोलीतली धूळ तुमच्या पायांना लागू नये याची काळजी मी घेत असे. आणि रात्री...रात्री जेव्हा मी माझ्या थकलेल्या हातांनी तुमचे थकलेले पाय चेपीत असे त्यावेळी माझे हात तर थकत नसतच पण दिवसभराचा थकवाही कुठल्या कुठं निघून जात असे. ती...ती...

**(पुरुष एकदम उभा राहून दारू प्यायलेल्या माणसासारखा येरझारे घालू लागतो. तो आपले डोळे सारखे पुसतो. पुरुषाच्या चेहऱ्यावर क्षणाक्षणाला कधी प्रकाश तर कधी अंधार दिसतो.)**

**स्त्री : (शांत स्वरात)** आता फार वेळ...फार वेळ कष्ट नाही देणार, प्राणेश ! ताप वाढतो आहे.

**(पुरुष घाबरून स्त्रीकडे पाहतो.)**

**स्त्री : (क्षीण स्वरात)** बसा, प्राणप्रिया ! बसा, आता आणखीन थोडं ऐका.

**(पुरुष बसतो आणि आपल्यावर हृदयावर दोन्ही हात ठेवून असे जोरात दाबतो की, जसे काही ते छाती फोडून बाहेरच पडणार आहे.)**

**स्त्री :** आपणा दोघांना कोणी बाहुला-बाहुली म्हणत तर कोणी बच्चा व बच्ची

काही का असेना ? ज्या वयात लहान मुलांचा सरळपणा, त्यांची निरागसता, त्यांची निर्व्याजता नाहीशी होते त्या वयातही प्रेमामुळे आम्ही ते टिकवू शकलो. जोपर्यंत आपला दोघांचा संबंध होता तुमचा सहवास हा नेहमीच पहिल्या रात्रीच्या मीलना-सारखा वाटला. आपण आपल्यात नव्या नवरा-नवरीप्रमाणेच होतो. (हळू-हळू) सांगण्यासारखं अजून बरंच आहे. बारा वर्षातसुद्धा आपल्या गप्पा संपल्या नाहीत. आपली ही प्रेमकथा कधी संपणारच नाही. परंतु...परंतु वेळ...वेळ आता जास्त नाही. (थोडं थांबून) एका गोष्टीचं दुःख होतंय, नाथ ! मी सासुसासऱ्यांना एक समाधान देऊ शकले नाही. नातवंड पाहाण्याची त्यांची फार इच्छा होती. त्यांची किलबोल ऐकत राहावी, त्यात रमून जावं, त्यांच्या धुळीने माखलेल्या पावलांनी आपले कपडे मळवून घेऊन त्यांना मांडीवर घ्यावं यांसाठी ते आतुर झाले होते. आई बनण्याची माझी इच्छासुद्धा दिवसेंदिवस वाढतच चालली होती. सासूबाईंनी कितीतरी नवस केले होते. मला गंडेदोरे बांधले होते. सासऱ्यांनी अनुष्ठाने मांडली होती आणि मी त्यांची इच्छा पूर्ण करू शकत नाही याचं मला दुःख होतंय हे जेव्हा त्यांच्या लक्षात आलं तेव्हापासून त्यांनी याबाबतीत बोलणंच सोडून दिलं. इतकंच नव्हे तर सासूबाईंनी काहीतरी उलट सुलट सांगून माझी समजूत काढण्याचा प्रयत्न केला. त्यांची इच्छा आज पुरी झाली आहे. ते पुण्यवान होते. स्वर्गात असतील तिथे ते आनंदित झाले असतील ! (थोडे थांबून) मला...तुमचा हा अंश उदरात वाढत असताना मला जे समाधान वाटत होतं, याच्या वाढत्या भारानं मला जो आनंद होत होता, तो मी शब्दात कसा व्यक्त करू ? आई होणार या कल्पनेनंच मला जो आनंद झाला जो उत्साह वाटला त्याचं वर्णन मी कसं करू ? ...माझ्या उदरात त्यानं जेव्हा हालचाल करायला सुरवात केली त्यावेळी मला वाटलं विश्वातील चैतन्यच माझ्या उदरात हालचाल करीत आहे. त्यानं जेव्हा फिरायला सुरुवात केली तेव्हा असं वाटलं की, सारे त्रैलोक्य पोटात फिरत आहे. प्रसूतीच्या वेदनांनी मी तळमळत होते तरीही एकीकडे माझ्या हृदयात आनंदाचं कारंजं उडत होतं. याचा चेहरा पाहून आणि... आणि...त्याला...त्याला...तुमच्या...तुमच्यासारखा पाहून...

(तिच्या डोळ्यांत अश्रु दाटतात)

(पुरुषाच्या डोळ्यांतूनही अश्रूंच्या धारा वाहतात. तो आपल्या दोन्ही हातांनी जोराने आपला उजवा गुडघा पकडून बसला आहे. काही वेळ स्तब्धता पसरते.)

**स्त्री :** (अतिशय क्षीण स्वरात) माझ्यावर इलाज करण्यात तुम्ही जराही कसूर केलेली नाही. डॉक्टर, वैद्य, हकीम सगळे झाले. परंतु...परंतु ज्यांची जाण्याची वेळ झालेली आहे त्यांना कोण अडवणार ? सर्वांनाच जायचं आहे प्राणनाथ ! कुणी पिकल्यावर जातो, कुणी कच्चा असताना, कुणी लवकर तर कोणी उशिरा. मी ऐन

तारुण्यात जात आहे याचा मला आनंद होत आहे. (**विचार करीत**) तारुण्यातलं मरण एवढ्याचसाठी चांगलं असतं की, हृदयाचा पत्थर होण्यापूर्वी आणि जीभ व डोळे धोकेबाज होण्याआधी माणूस या वाईट जगातून उठून जातो. मला जावं लागतंय याचं दुःख नाही पण तुम्हाला सोडून जावं लागतंय याचं आहे. मी तर सौभाग्य घेऊन जात आहे. जाता–जाता परमेश्वराकडं एकच प्रार्थना करते की– जन्मोजन्मी तुमच्यासारखा पती, तुमच्या आईवडिलांसारखे सासुसासरे आणि तुमच्या घरासारखं घर मिळू देत.

आणि...आणि हे...हे हृदयनिधी, तुमच्याकडे...तुमच्याकडे एक वर मागते आहे, तो...तो तुम्ही जर दिला नाही...जर दिला नाही तर तुमच्याबरोबर ज्या समाधानात होते त्या समाधानानं जाऊ शकणार नाही.

(**पुरुष रडता–रडता स्त्रीकडे उत्सुकतेने पाहतो आणि आपले डोके दोन्ही हातावर ठेवतो.**)

**स्त्री :** नाथ ! आपण माझ्यानंतर घर रिकामं ठेवणार नाही, एकाकी जीवन जगणार नाही आणि या बाळाला आईविना वाढवणार नाही असं मला आपल्याकडून वचन हवं आहे. स्वर्गात जाते आहे, प्राणेश, स्वर्गात ! नरकात कशी जाईन ? स्वर्गातून तुमचा विवाह पाहीन. तो पाहून मला आणि माझ्या सासुसासऱ्यांना जो आनंद होईल त्याची तुम्हाला कल्पनाच करता येणार नाही. ३२–३५ वय म्हणजे संन्यास घेण्याचं वय नव्हे. अरे, शास्त्रसुद्धा ७५ वर्षांनंतर वानप्रस्थ स्वीकारण्याची आज्ञा देतं...(**अतिशय क्षीण स्वरात...जसं काही ती स्वतःचे स्वतःशी बोलत आहे, थांबून**) तुम्ही एकाकी...एकाकी राहिलात तर मला स्वर्गात...स्वर्गातसुद्धा तुमची...काळजी वाटत राहील. तुम्हाला कोण वाढील.. पाणी देईल...शेतावर तुमचं जेवण कोण आणिल ? रात्री...तुमचे...पाय कोण चेपील ? (**बंद होणारे डोळे उघडे ठेवण्याचा प्रयत्न करीत**) कोण...कोण...या बाळाचा...सां...भा...ळ...क...री...ल...व...च.....न...व

(**स्त्रीचे डोळे मिटतात. श्वास जोरात होतो आणि थांबायला लागतो. पुरुष झटकन उठून हळदीची लक्ष्मणरेषा ओलांडतो आणि स्त्रीच्या खाटल्याकडे जातो. तिच्याकडे लक्षपूर्वक पाहतो आणि स्फुंदून स्फुंदून रडतो आणि तिच्या शरीराला मिठी मारतो. त्याचवेळी त्याच्या रडण्याला नवजात बालक आपल्या रडण्याची साथ देते.**)

(**पडदा पडतो.**)

पात्रे

वसंत

मधू

चित्ती

सुरो

मंगला

( स्थान : नवी दिल्ली )

(पडदा वर जातो. वसंताची ड्रॉइंगरूम दिसते. ड्रॉइंगरूम फार मोठीही नाही आणि छोटीही नाही. फारशी सजवलेलीही नाही. वसंताला महिन्याला अडीचशे रुपये मिळतात. परंतु नव्या दिल्लीतील अडीचशे...आणि तो आहे एका फर्मचा मॅनेजर, म्हणून घरात टेलिफोन आहे, डाव्या भिंतीकडे एक टेबल आहे, त्याच्यावर एका बाजूला कागदपत्र आणि एकीकडे टेलिफोन ठेवलेला आहे.

टेबलाच्या एका बाजूला एक दरवाजा आहे. तो आतल्या खोलीसाठी आहे. टेबलाच्या दुसऱ्या बाजूला कोपऱ्यात एक शेगडीची जागा आहे. परंतु ती उपयोगात नसावी कारण शेगडीच्या जागेच्यावर कपडा असून तो अत्यंत सुबक आहे. त्यावर मध्यमवर्गातील घराला शोभेशा सजावटीच्या काही वस्तू ठेवलेल्या आहेत. त्या पसरलेल्या नाहीत, सगळ्या व्यवस्थित रचलेल्या आहेत. याशिवाय दोन पितळेचे फ्लॉवरपॉट शेगडीच्या दोन्ही कोपऱ्यात ठेवलेले आहेत. याच शेगडीच्या वरील कापडी झालरीला स्पर्श करणारा एक रेडिओ सेट खाली एका छोटयाशा टेबलावर ठेवलेला आहे, टेबलक्लॉथचे डिझाइन आणि शेगडीच्या वरच्या कपडयाचे डिझाईन मॅचिंग आहेत व त्यामुळे मधूच्या रसिकतेची ओळख पटते.

शेगडीच्या वर भिंतीवर एक कॅलेंडर अशा रीतीने टांगलेले आहे की, टेबलावर बसलेल्या माणसांच्या ते नजरेसमोर यावे. कॅलेंडरकडे नजर टाकता तो नोव्हेंबर महिना असल्याचे ध्यानात येते.

स्वयंपाकघरात जायला शेगडीच्या बाजूलाच एक दुसरा दरवाजा आहे.

या दरवाजाच्या जरा बाजूला समोरच्या भिंतीला लागून एक बेताचा सोफा सेट आहे. पुढे एक तिवई आहे. सेटच्या गाद्या सुंदर आणि आल्हाददायक आहेत आणि तिवईवरचे कव्हर शेगडीच्या कपडयाला मॅच होईल असे आहे.

समोर, भिंतीच्या डाव्या बाजूला कोचापासून जरा दूर एक दरवाजा असून तो स्नानघराकडे जाण्यासाठी आहे.

डाव्या भिंतीला लागून प्रसाधन टेबल आहे. तेथे वसंत आणि मधू दोघेही प्रसाधन करीत आहेत. याच्यावर खुंटयांना टॉवेल्स टांगलेले आहेत. टेबलाच्या दोन्ही बाजूना एकदोन खुर्च्या आहेत.

उजवीकडील भिंतीच्या बाजूला बाहेर जाण्यासाठी दरवाजा आहे.

पडदा वर जातो आणि प्रेक्षकांना वसंत प्रसाधन टेबलावर बसून दाढी करत असलेला दिसतो. खरे म्हणजे त्याची दाढी झालेली आहे आणि तो आता टॉवेलने तोंड पुसत आहे. तेवढ्यात स्वयंपाकघराच्या दरवाजातून स्वेटर विणीत मधूचा प्रवेश)

**मधू** : अरे, पुन्हा तुम्ही मदनचा टॉवेल घेतला ! मी म्हणते तुम्ही...

**वसंत** : (**तोंड पुसत पुसत थांबून**) खरंच की ! हे साले दळभद्री टॉवेल ! माझ्या बघ लक्षातच रहात नाही ! खरं सांगू का (**हसतो**) मदनचे टॉवेल छोटे आहेत आणि दाढी...

**मधू** : (**चिडून**) आणि दाढीच्या टॉवेलासारखे आहेत ! असंच ना ? महाराज ! जरा डोळे उघडे ठेवून पहा, दाढीचे टॉवेल कसे रांगेत ते आहेत. पट्टेच आधी किती आहेत त्यांना आणि मदनचे किती साधे आणि...

**वसंत** : परंतु टर्किश...

**मधू** : (**उपहासाने**) दोन्हीही आहेत ! डोळे बंद करून देखील माणूस दोन्हींतला फरक सांगू शकेल म्हटलं. मी म्हणते...

**वसंत** : (**निरुत्तर होऊन**) खरं म्हणजे माझं लक्ष जरा दुसरीकडेच होतं. बरं आण बघू माझा दाढीचा टॉवेल इकडे. कुठं आहे तो ? मला कसा दिसला नाही ?

**मधू** : (**खुंटीवर टांगलेला टॉवेल काढून**) हा इथं समोर टांगलेला आहे, आणि...

**वसंत** : मी चष्मा काढून ठेवला ना, आणि चष्म्याखेरीज तुला माहीत आहे आमचं जग...(**खजीलपणे हसतो**.)

**मधू** : वा महाराज, आमचं जग म्हणे ! कुणास ठाऊक तुम्ही कोणत्या जगात वावरत आहात. आता एक वेळ चष्मा नाही ! पण चष्मा असताना असं काय तुम्हाला दिसत असतं सांगा पाहू ? (**तोंड वाकडे करून धप्पदिशी कोचावर बसते आणि काहीं न बोलता स्वेटर विणू लागते. वसंत दाढीचे सामान ठेवतो, आणि एकदम तिच्याकडे पाहतो**.)

**वसंत** : पुन्हा तोंड वाकडं केलंस ! रागावलीस होय !

**मधू** : (**उपहासाने हसून**) छे, मी कुठं रागावले ?

**वसंत** : तुला काय वाटलं एवढं देखील न कळायला मी काय मूर्ख आहे ?

**मधू** : (**तशीच हसत**) मी कुठं म्हटलं ?

**वसंत** : (**सामान तसेच टाकून, खुर्ची तिच्यापुढे सरकवीत**) मी तुला किती वेळा सांगितलं की, चेहऱ्यावरचे भाव लपवणं तुला जमत नाही. तुझी अपेक्षा, तुझा राग, तुझ्या साऱ्या भावना तुझ्या चेहऱ्यावर लगेच उमटतात. तुला माझ्या सवयी आवडत नाहीत पण मी काही तुला अंधारात ठेवलं नव्हतं. माझ्याविषयी, माझ्या स्वभावा-

विषयी सर्व काही सांगून टाकलं होतं मी. मी माझी सारी पानं . . .

**मधू :** उघडी केली होती (**तशीच उपहासाने हसून**) मी कुठं नाही म्हटलंय ?

**वसंत :** तुझं हे हसणं किती विषारी आहे. अशा रीतीने विष घोटून घोटून तू तुझ्या तब्येतीचं खोबरं करून टाकलंस.

**मधू :** (**गप्प राहते**)

**वसंत :** मी स्वत: स्वच्छतेचा मोठा भोक्ता आहे हे तुला कसं पटवून देऊ ?

**मधू :** (**हसते**) त्यात शंकाच नाही.

**वसंत :** आणि मला स्वत:ला गलिच्छपणा कुठं आवडतो ?

**मधू :** (**फक्त हसते.**)

**वसंत :** परंतु तुझ्यासारखा अॅरिस्टोक्रॅटिक वातावरणात वाढलो नाही आणि तुझे हे नखरे मला जमत नाहीत. आमच्या घरात फक्त एक टॉवेल असे आणि आम्ही सहा भाऊ त्याचा उपयोग करीत असू.

**मधू :** तुम्ही मला अॅरिस्टोक्रॅटिक म्हणून हिणवता ? दहा दहा टॉवेल्स असावेत असं मी कुठं म्हटलंय.

**वसंत :** दहा आणखी कमे असनात ? आंघोळीचा वेगळा, दाढीचा वेगळा, हात-तोंड पुसण्याचा वेगळा आणि पुन्हा तुझे आणि तुझ्या मदनचे...

**मधू :** (**मुद्दा बदलून**) परंतु मला कळत नाही यात काय चूक आहे ? दहा दहा टॉवेल्स विकत घ्यायची ऐपत असल्यास का खरेदी करू नये ? ईश्वर नसे न करो-पण उद्या जर का आपली ही परिस्थिती राहिली नाही तर गरिबीत देखील स्वच्छता राखता येते हे मी तुम्हाला दाखवून देईन. टॉवेल्स नाही जमले तर खादीचे पंचे चालतील. एखादी जुनीपुराणी पण स्वच्छ चादर किंवा धोतराचे तुकडे का असेनात काहीही वापरता येतं परंतु ज्या टॉवेलनं दुसऱ्या एखाद्याने तोंड पुसलं असेल त्यानंच आपलं अंग पुसायचं ?

**वसंत :** मी म्हणतो आम्ही सहा भाऊ एकाच टॉवेलानं अंग पुसत होतोच की ?

**मधू :** परंतु आजार ...

**वसंत :** आमच्यापैकी कुणालाही कसलाही रोग झाला नाही.

**मधू :** त्वचा रोग देखील...

**वसंत :** तुला आणि मदनला काही आजार नाही...आणि खरं म्हणजे रोग अशा प्रकारे थोडाच पसरतो ! रोग वाढतो अशक्तपणामुळं शरीरातील रोगाची प्रतिकार करणाऱ्या पेशी कमी होतात, तेव्हा ! 'चूहा सैदनशाह' ची गोष्ट ऐकली आहेस.

**मधू :** 'चूहा सैदनशाह ?'

**वसंत :** शिकार करण्यासाठी काही अधिकारी असेच एकदा चूहा सैदनशाहला

गेले, त्यात अमेरिकेच्या रॉकफेलर ट्रस्टचे काही डॉक्टरही होते. लंचच्या वेळी त्यांना पाणी हवं होत. पोऱ्याने येऊन सांगितलं की, गावात एकही विहीर नाही. लोक डबक्यातील पाणी पितात. डॉक्टरांचा ह्या गोष्टीवर विश्वास बसेना; कारण डबक्यातलं पाणी घाणेरडं, चिखलानं भरलेलं होतं. कुठल्याही रोगाचे जन्तू त्या डबक्यातील पाण्यात खात्रीने असणार; आणि त्या भागात राहणारे जाट लोक मात्र कमालीचे जाडजूड, बलवान आणि उंचपुरे...

**मधू :** म्हणजे आपण देखील डबक्यातलं पाणी प्यायला लागावं अशी तर तुमची इच्छा नाही ना ? **(हसते)**

**बसंत : (उठून खोलीत येरझारे घालत)** या गोष्टीवर तू तुझे ते विषारी हास्य करशीलही **(तिच्यासमोर थांबून)** पण तुला सांगतो की अमेरिकेतील डॉक्टरानी तेथेच मुक्काम ठोकला, एका जाटाच्या रक्ताची त्यांनी परीक्षा केली. तेव्हा त्यांना कळून आलं की, त्यात रोगाला पोषक होणाऱ्या पेशीपेक्षा रोगाचा प्रतिकार करणाऱ्या पेशींची संख्या किती तरी जास्त आहे. नंतर त्यांनी ते काय खातात त्याची चौकशी केली. तेव्हा त्यांना कळलं की, ते विशेषत: दही आणि लस्सीच जास्त पितात. दह्यात तर पुष्कळशा रोगजंतूंना मारण्याची शक्ती असते. तेव्हा रोगाचा प्रतिकार तुझ्या अशा प्रकारच्या नाजुकपणानं आणि सौदर्यदृष्टीनं होत नसतो, तर आपल्या शरीरात रोगाचा हल्ला परतवून लावू शकेल अशी शक्ती निर्माण केल्याने होत असतो. **(पुन्हा येरझारे घालू लागतो.)**

**मधू :** ऐकली बरं मी चूहा सैदनशाहची गोष्ट ! मळकट टॉवेलने शरीरात लाल पेशी वाढोत की पांढऱ्या वाढोत मला त्यांच्याशी कर्तव्य नाही. लहानपणापासून मला स्वच्छता आवडते. एवढंच मला माहीत. माझे मामा.

**वसंत : (टेबलाच्या कोपऱ्याला रेलून)** तू पुन्हा तुझ्या त्या मामा आणि मावशीची गोष्ट सुरू केलीस. ते विलायतेला जाऊन आले असतीलही पण त्याचा अर्थ असा नव्हे की ते जे काही सांगतात, ते ब्रह्मवाक्य ! एकदा तुझ्याच मावशीचे यजमान आले होते. त्यांनी हात धुतल्यावर मी चुकून कुठं आपला टॉवेल दिला. **(मधूजवळ जाऊन)** त्यांनी दात–ओठ चावले **(नक्कल करीत)** 'मी कधीही दुसऱ्याच्या टॉवेलानं हात पुसत नसतो !'...आणि आपल्या रुमालानं हात पुसू लागले. मी म्हणतो त्यांनी टॉवेलानं हात पुसले असते तर त्यांना असा कोणता आजार चिकटला असता ?

**मधू :** आता ही तर...

**बसंत ; आणि तुझे मामा... (परत येऊन टेबलावर बसतो.)** तू गेल्यानंतर एक दिवस मी त्यांच्याकडे गेलो. रात्री तेथेच मुक्काम केला. दुसऱ्या दिवशी मला तिथूनच ऑफिसला जायचं होतं. म्हणाले, दाढी इथेच कर. मी म्हटलं मी दाढी एक दिवसा-

आड करतो तेव्हा तशी काही आवश्यकता नाही. त्यांनी आग्रहच केला तेव्हा म्हटलं, "ठीक आहे करतो दाढी" ते मग कुठला तरी खराब झालेला रेझर घेऊन आले आणि म्हणाले (**नक्कल करत**) "मी स्वतःचा रेझर दुसऱ्या कुणालाही दाढी करायला देत नसतो म्हणून मी पाहुण्यांसाठी हा दुसरा रेझर ठेवला आहे.' रागानं मी लालीलाल झालो, परंतु स्वतःला सावरून मी इतकंच म्हटलं... "राहू द्या हो, मी घरीच जाऊन दाढी करीन!"

**मधू** : मामा...

**वसंत** : (**आपलं बोलणं चालू ठेवत**) मला त्यांचं म्हणणं पसंत पडलं नाही, हे त्यावेळी त्यांच्या लक्षात आलं असावं कारण नंतर त्यांनी मला त्यांच्या रेझरने दाढी करायला लावली. परंतु माझी दाढी झाल्यावर माझ्याच समोर ते ब्लेड त्यांनी बाहेर फेकलं आणि नोकराला बोलावून रेझर 'स्टेरिलाइझ' करून घेतला. (**नक्कल करून**) काय पण मामा...

**मधू** : मी म्हणते, तुम्हाला त्यांचा स्वभाव माहीत नाही म्हणून तुम्हाला वाईट वाटलं. स्वच्छतेची भावना देखील काव्य आणि कलेप्रमाणे...

**वसंत** : (**चिडून तिच्याजवळ जात**) कशाला काव्य आणि कलेला तुझ्या या घाणीत लोटतेस. तुमच्यासारख्या वातावरणात वाढलेल्या लोकांच्या स्वच्छतेत तिरस्काराची भावना वास करत असते. देहाचा, घाणीचा आणि जीवनाचा तिरस्कार!

**मधू** : (**गप्प बसते**)

**वसंत** : आणि मला जीवनाचा तिरस्कार वाटत नाही, शरीराचा वाटत नाही आणि खरं सांगायचं म्हणजे मला घाणीबद्दलही तिरस्कार नाही.

**मधू** : (**हसत**) तर मग बसा की जाऊन कचऱ्याच्या ढिगावर! (**वसंत पुन्हा खुर्चीवर बसतो आणि खुर्ची तिच्या आणखी जवळ नेतो.**)

**वसंत** : मला घाणीबद्दल घृणा नसली तरी मला घाण आवडत नाही, मोठा नाजूक फरक आहे. आपल्याला जीवनात यशस्वी व्हायचं असेल तर रोज घाणीशी संबंध ठेवावाच लागेल. मग तिची घृणा करून कसं चालेल? ज्या गरिबांना तू आपल्या व्हरांड्याच्या फरशीवर पाऊल ठेवू देणार नाहीस त्या गरिबांबरोबर मी तासंतास बसून गप्पा मारू शकतो.

**मधू** : (**हसते**)

**वसंत** : मी अशा घाणेरड्या भागात माझ्या जीवनाची काही वर्षं सतत घालवली आहेत तेथे मी तुझी ती अतिरेकी स्वच्छता पाळायची म्हटली असती तर क्षणभर सुद्धा राहू शकलो नसतो.

**मधू**: (**तिथेच बसून आणि तसाच स्वेटर विणीत**) परंतु आता तर तुम्ही दरिद्री

नाही ? आता तर तुम्ही घाणेरड्या भागात राहात नाही ना ? गरिबीतली लाचारी मी समजू शकते पण स्वाभाविक घाणेरडेपणा मी समजूच शकत नाही.

**बसंत** : मी घाणेरडा माणूस आहे असं म्हणायचंय का तुला ?

**मधू** : (**तेच विषारी हास्य**) मी कुठं म्हणतेय ?

**बसंत** : (**उभा राहतो**) एकाच बनियनवर अनेक दिवस काढण्याची पाळी देखील माझ्यावर आली होती. धुवायला सुद्धा वेळ मिळत नसे. आणि आता मी दिवसातून दोन दोन वेळा बनियन बदलतो. मला जर घाणेरडेपणाच पसंत असता तर...

**मधू** : (**ते हास्य**) मी असं कुठं म्हणते ?

**बसंत** : स्वच्छता वाईट नाही पण तू जी स्वच्छतेच्या नावाखाली प्रत्येक गोष्ट विक्षिप्तपणाच्या अगदी टोकाला नेतेस. मला त्या विक्षिप्तपणाची चीड आहे. (**परत खोलीत येरझारा घालतो**). बनियन आणि टॉवेलची कैद मी एकवेळ मानतो. पण चुकीने बनियन बदलायचा राहून गेला किंवा चुकीचा टॉवेल वापरला गेला तर त्याचा अर्थ असा नाही की, तू लागलीच घुश्शात बसावंस किंवा उपहासानं हसावंस.

**मधू** : (**गप्प बसते**).

**बसंत** : (**रेडिओजवळून**) तू स्वत.ला या फालतू बंधनात इतकं जखडून घेतलं आहेस की माझा जरासा मोकळेपणासुद्धा तुला बोचतो. आपल्या सिद्धान्ताला तू विक्षिप्तपणाच्या शेवटच्या टोकाला नेऊन ठेवलं आहेस. उषी आणि निम्मो...

**मधू** : ( **विणकाम बाजूला ठेवून**) तुम्ही पुन्हा ती उषी आणि निम्मोची गोष्ट सुरू केली. उषी आणि निम्मो ..

**वसंत** : (**हसत**) काल बाजारात भेटली होती. मी विचारलं, "हल्ली इतक्या दिवसात आली नाहीस ती ? म्हणाली... आम्हाला काकींची भीती वाटते (**हसतो**)

**मधू** : (**तेच विषारी हास्य**) मी काय तिला खाते ?

**वसंत** : (**टिपॉयजवळून**) तू काय खाणार म्हणा ! पण त्या लहान मुली आहेत...

**मधू** : लहान मुली ! (**उपहासाने हसते**)

**बसंत** : (**तिच्या उपहासाकडे लक्ष दिले न दिलेसे करून टिपॉयवर बसत**) हसणं हा त्यांचा स्वभाव आहे. त्या हसतील फालतू गोष्टीवर सुद्धा-पण तुझे ते ऐटिकेटस्...धड मोकळेपणं हसयाचं नाही की बोलायचं नाही (**वैतागाने मानेला झटका देत उठतो.**) जो माणूस पोटभर खाऊ शकत नाही, ज्याला हसणं–हसवणं जमत नाही तो आयुष्यात करूच काय शकणार ? जीवनाला शिष्टाचाराच्या बेडीनं जखडून ठेवायला चिंता आणि संकटाच्या बेड्या काय कमी आहेत ? हे करू नका-ते करू नका, असं बोलू नका-तसं बोलू नका–हुकुमांना देखील काही मर्यादा !

**मधू** : (**गप्प बसते.**)

**वसंत :** आणि परत तुझ्या या शिष्टाचारात मार्दव तरी कुठे आहे ? तू येण्यापूर्वी मी, देव आणि नारायण एकच मोठी रजई पांघरत होतो. जरा कल्पना कर, थंडीतल्या सकाळी किंवा संध्याकाळी, एकाच कॉटवर एकच रजई गुडघ्यापर्यंत ओढून चारपाच मित्र बसले आहेत. गप्पा चालल्यात. सुखदुःखाच्या गोष्टी बोलताहेत. तिथेच चहा येतो. त्याच्याबरोबर गप्पाही रंगतात. चहाचे घोट घेतले जाताहेत. या कल्पनेतच किती आनंद आहे ! मार्दव आहे ! आता मित्र येतात. वेगवेगळ्या खुर्च्यांवर बसतात. दुसऱ्यावर ओझं वाटतं. (जोरात) बिछान्याजवळ तू पक्ष्यांनासुद्धा फिरकू देत नाही. मी तर या शिष्टाचाराने कसा अगदी गुदमरून जातो. (**जाऊन खुर्चीवर बसतो आणि हजामतीचं सामान नीट ठेवू लागतो.**)

**मधू :** मला देखील कृत्रिमपणा आवडत नाही. पण जर का कुणाला दुसऱ्याच्या स्वच्छतेची जरासुद्धा चाड नसेल तर, मग मात्र मला नाईलाजाने खबरदारी घ्यावी लागते. तुम्हीच सांगा किती माणसं अशी आहेत ज्यांना स्वच्छतेची मुळातच आवड आहे ? कितीजण आमच्यासारखे पाय धुवून बिछान्यावर बसतात ?

**वसंत :** (**तेथूनच**) पाय धुण्याचं संकटच मुळी बिछान्यावर बसण्याचा सारा आनंद नष्ट करून टाकते.

**मधू :** कुत्रादेखील बसताना शेपटी हलवून बसतो. मी मुळातच स्वच्छतेची भोक्ती आहे. मला घाणेरड्या लोकांचा तिरस्कार वाटतो. (**पुन्हा स्वेटर विणू लाग.**)

**वसंत :** (**वळून**) तिरस्कार – हेच तर मी सांगतो आहे. तुला माझा तिरस्कार वाटतो, माझ्या स्वभावाबद्दल तिरस्कार वाटतो, तुझ्या वागणुकीत माझ्या वागणुकीचा तिरस्कार भरला आहे.

**मधू :** (**तसेच विचारी हसत**) हे तुम्ही म्हणू शकता.

**वसंत :** तुला माझ्या प्रत्येक गोष्टीचा तिरस्कार वाटतो–माझ्या खाण्या–पिण्याचा, बसण्या–उठण्याचा, हसण्या-बोलण्याचा. मी हसतो तेव्हा पोट धरधरून हसतो आणि म्हणूनच उपी आणि निम्मो. . .

**मधू :** (**स्वेटर फेकून**) तुम्ही पुन्हा उपी आणि निम्मोची गोष्ट काढलीत. मला हसणं आवडत नाही असं नाही, परंतु त्याला काही काळवेळ ? त्या दिवशी पार्टीला आल्याबरोबर उपीनं माझ्या काकांकडे पाहून चुटकी वाजवली आणि निम्मोनं माझे डोळे बंद केले. अशा तऱ्हेनं थट्टामस्करी करण्याची वेळ होती का ती ? मला चीड आहे ती बेशिस्तीची, थट्टामस्करीची नाही समजलं ?

**वसंत :** उपी . .

**मधू :** कमालीची बेशिस्त आणि असभ्य मुलगी आहे. मदनच्या वाढदिवसाला त्या सर्वजणी आल्या होत्या. निम्मोइतकी चंचल पण ती देखील एका बाजूला जाऊन बसली,

आणि ही नवीन सँडलसह बसली माझ्या समोर मांडा ठोकून, तिचे ते घाणेरडे सँडल माझ्या साडीच्या अगदी जवळ आले. हे शिष्टाचार सोडून वागणं वाटल्यास तुम्ही पसंत करा, मी मात्र हे कधीही पसंत करू शकणार नाही. ज्याला उठण्या–बसण्याचा, बोलण्याचा साधा शिष्टाचार कळत नाही, तो माणूस काय, पशू आहे पशू !

**वसंत** : पशू ? तर मग तू मला पशू म्हणतेस ? तू माणसाच्या नैसर्गिक भावनांना जखडून टाकू इच्छितेस, कठोण सिद्धान्ताच्या बेडीने जखडू पाहातेस म्हणजे त्याचे मूळच मरून जावं – मला हे सारं पसंत नाही म्हणून तू माझा तिरस्कार करू नये. मला माहीत आहे तुझ्या या विषारी हास्यामागे किती भयंकर नजर लपलेली आहे. मी खरोखरच एखाद दिवशी पशू तर नाही ना होणार याची आता मला भीती वाटू लागली आहे आताच माझ्या मनात आलं की हे टॉवेल उचलून बाहेर फेकून द्यावेत आणि... आणि . तुझ्या त्या हसण्याचा एकदा गळा दाबावा घृणा.. तू माझ्या प्रत्येक गोष्टीची घृणा करतेस – मला पशू समजतेस ?

**मधू** : (**स्वेटर उचलून, दाटल्या गळ्याने**) तुम्ही उगाचच प्रत्येक गोष्ट स्वतःवर ओढवून घेता. ज्या गोष्टी माझ्या स्वप्नातही नाहीत त्या स्वतःच्याच कल्पनेनं माझ्यात पहाता. मला तुमचा तिरस्कर वाटतो की नाही हे मला जास्त कळतं पण तुम्हाला मात्र माझ्याबद्दल नक्कीच घृणा आहे. तुम्ही माझ्याशी लग्न केलंत, हे मान्य आहे. का केलंत तेही माहीत आहे. परंतु माझ्याशी लग्नाला तयार झाला याचा असा अर्थ नाही की तुम्हाला मजविषयी घृणा नाही त्याचा राग तुम्ही कधी माझ्या स्वच्छतेवर काढता, कधी माझ्या पोषाखावर तर कधी स्वभावावर !

**वसंत** : तू ....

**मधू** : मला वाटलं होतं मी तुम्हाला सुखी ठेवीन. तुमच्या अव्यवस्थित जीवनाला व्यवस्थित वळण लावीन, परंतु शेवटी माझे सारे प्रयत्न फसले...तुम्हाला या घाणीत, गबाळेपणात सुख मिळतं. तुम्हाला माझा टापटीपपणा, माझी स्वच्छता आवडत नाही. मी आता नाही राहणार इथं. ही आजच चालले. (**उठून उभी रहाते–टेलिफोनची घंटा वाजते. वसंत घाईने जाऊन रिसीव्हर उचलतो.**)

**वसंत** : हॅलो, हॅलो, कोण, कोण पाहिजे ?

**मधू** : (**मोलकरणीला हाक मारते**) मंगला !

**मंगला** : (**बाथरूमच्या दरवाज्याकडून येत**) काय बाईसाहेब ?

**मधू** : माझ बेडींग बांध आणि माझी ट्रंक या खोलीत घेऊन ये.

**मंगला** : बाईसाहेब, आपण .... .

**मधू** : मी सांगते ना, जा घेऊन ये.

(**मंगला निघून जाते. वसंत येस सर, फार छान ! म्हणून रिसीव्हर ठेवून देतो**

आणि हसत मधूकडे येत.)

वसंत : तू तुझे सामान बांधण्याची तयारी चालवली आहेस. हे बघ, पहिल्याने माझे सामान नीट भर पाहू. मला पहिल्या गाडीने बनारसला जायचं आहे, आताच साहेबांचा फोन होता. तुझे सामान नंतर बांध (हसतो.)

(पडदा पडतो)

(काही क्षणानंतर पडदा उघडतो. खोली तीच. सामानही तेच. फरक एवढाच की जेथे टेबल होतं त्या ठिकाणी एक पलंग पसरलेला आहे, आणि त्याच्या माथ्याकडे एका तिवईवर टेलिफोन ठेवलेला आहे टेबल ड्रेसिंग टेबलाच्या ठिकाणी, आणि ड्रेसिंग टेबल खुर्ची डाव्या कोपऱ्यात सरकलेल्या आहेत.

पलंगावर मधू रजई गुडघ्यावर घेऊन भिंतीला टेकून विमनस्क स्थितीत अर्धवट पहुडली आहे.

थोड्या वेळाने ती कॅलेंडरकडे पहाते. तिच्या नजरेचा अंदाज घेता लक्षात येतं की, हा जानेवारी महिना आहे. नवं वर्ष सुरू झालेलं आहे. याचा अर्थ असा की दोन महिन्याचा काळ लोटलेला आहे.

बाहेरचा दरवाजा उघडा आहे. गार हवा आत येत आहे. रजई खांद्यापर्यंत घेत मोलकरणीला हाक मारते " मंगला, ए मंगला " परंतु इतक्या हळू आवाजात की, ती मंगलेपर्यंत पोहोचतच नाही. मधू रजई ओढून बिछान्यावर पहुडते. थोड्या वेळाने मंगला स्वतःच तिच्याजवळ येते)

मंगला : बाईसाहेब, आपण अशा उदास का ?

मधू : ( बिछान्यावर पहुडल्या पहुडल्या डोके वाकवून ) मंगला ! हा दरवाजा तेवढा लोटून घे बघू. बर्फासारखं गार वारं आत येतंय.

मंगला : ( दरवाजा बंद करीत ) मी काय विचारलं त्याचं उत्तर नाही दिलं आपण, बाईसाहेब !

मधू : तसं कारण काहीच नाही, पण जरा उदास वाटलं खरं, मंगला !

मंगला : साहेबांचं पत्रबित्र आलं होतं का ?

मधू : होय, कदाचित एवढ्यात ते येतीलही.

मंगला : तर मग.....

मधू : (खेदाने हसून ) डोकं जरा जड झाल्यासारखं वाटतं. कदाचित थंडीमुळे..

(बाहेरून दार ठोठावल्याचा आवाज)

मधू : (जरा उठून) कोण ?

**सुरो :** **(बाहेरून)** दरवाजा तर उघडा.

**मधू :** **( पुन्हा बसत)** मंगला जा जरा दरवाजा उघड.

**(मंगला दरवाजा उघडते , सुरो आणि चिती आत येतात.)**

**मधू :** **(रजई बाजूला करीत)** अरे सुरो, चिती तुम्ही इथं कुठं ?

**सुरो :** आज सकाळीच आम्ही इकडे उतरलो आहोत.

**चिती :** आईला प्रयागला जायचं होतं. सरिता ताईला वाटलं वाटेत दिल्लीही पाहून घ्यावी.

**मधू :** कुठं उतरलात ?

**चिती :** मलिक काकांकडे. कॅनॉट प्लेसला. कधीपासून सारखा आग्रह करीत होते– दिल्लीला आला तर...

**मधू :** आणि मला एक साधं पत्र देखील पाठविता आलं नाही तुम्हाला. इतक्या दिवसांपासून मी सांगत होते दिल्लीला आला तर.....

**सुरो :** सर्वप्रथम तुलाच तर भेटायला आलो, आई म्हणत होती. कुतुबमिनार....

**चिती :** मी म्हटलं कुतुबमिनार कुणीकडे आणि मधू अक्का कुणीकडे...

**(मधू जोरात हसते )**

**सुरो :** आणि तेव्हापासून दोन तास झाले सारखे फिरतो आहोत तुझ्या शोधात !

**मधू :** परंतु माझा तर पत्ता...

**चिती :** सुरो विसरली. हिन टांगेवाल्याला भैरोबाच्या मंदिराकडे न्यायला सांगितलं.

**मधू :** भैरोबाचं मंदिर ?.....

**चिती :** आणि टांगेवाल्याने नेलं भाजी मार्केटकडे, तीस हजारीच्या चर्चजवळ !

**मधू :** चर्चजवळ.....काय म्हणतेस काय ? **(जोरात हसू लागते.)**

**चिती :** **(आपले बोलणे चालू ठेवीत)** तेव्हा कुठं हिच्या लक्षात आलं की, ते मंदिर मारुतीचं आहे. पुन्हा नव्या दिल्लीत परतलो.

**(मधू पुन्हा जोरात हसू लागते )**

**सुरो :** नंतर आम्हाला कळून चुकलं की, आम्ही उगाच वेड्यासारख्या भटकत राहिलो. अगदीच जवळ आहे की ग तुझं हे घर !

**मधू :** तुम्ही माणंस देखील, मी सांगते.....

**सुरो :** अग हे इतकं हसायला कुठून शिकलीस. जन्मापासून तर अगदी...

**चिती :** इतक्या जोरात खदखदा हसायला भैय्यासाहेबांनी तर नाही ना शिकवलं ? आहेत कुठं ते ?

**मधू :** बनारसला गेले आहेत. दोन महिने झाले जाऊन. तेथील कंपनीचा मॅनेजर

आजारी पडला होता. आता येतीलच इतक्यात.

**चिती** : ठीक आहेत ना ?

**मधू** : अगदी मजेत, आहेत अरे पण तू अशी उभी का ? या इथं बिछान्यावर बसा की (**मोलकरणीला हाक मारते**) मंगला ए मंगला.

(**सुरो आणि चिती खुर्च्यांवर बसू लागतात.**)

**मधू** : अरे, खुर्च्यांवर कशाला बसता. या इकडे पलंगावर रजई ओढून बसू इथंच . . . . .

**सुरो** : पण माझे पाय (**हसून**)... आणि मला धुताही येणार नाहीत हे.

**मधू** : असू दे. अशी काय घाण लागली आहे तुझ्या पायांना. पायमोजे तर घातले आहेस तू ?

**चिती** : पण तुझा बिछाना !

**मधू** : माझ्या बिछान्याची नको काही काळजी करायला. काही होणार नाही त्याला. चला या इकडे. हा दरवाजा तेवढा बंद करून घ्या. बर्फासारखी गार हवा येत आहे आत. (**मंगला येते**)

**मंगला** : आपण मला हाक मारली, बाईसाहेब ?

**मधू** : मंगला, चहा बनवून आण लवकर. . . . . (**चिती दरवाजा लावून येते. तिघीही गुडघ्यापर्यंत रजई ओढून आरामात बिछान्यावर बसतात.**)

**सुरो** : पुढच्या महिन्यात पुष्पाचं लग्न आहे.

**मधू** : (**बचकून आनंदाने**) लेफ्टनंट वीरेंद्रबरोबर ?

**चिती** : (**हसून**) सगळेच काही तुझ्यासारखे नाहीत. ती शेवटपर्यंत प्रेम करत राहील वीरेंद्रवर पण तिचं लग्न मात्र होणार आहे प्रोफेसर मुंशीराम बरोबर...

**मधू** : अग पण मुंशीराम. . . . .

**सुरो** : लेफ्टनंट साहेब वर्षातून फारतर एक-दोन वेळा यायचे, आणि प्रोफेसर साहेब मात्र एखाद्या सावलीसारखे चोवीस तास असायचे तिच्याबरोबर !

**चिती** : काय तो ताडमाडासारखा उंच मरतुकडा माणूस ! जोरात वारा वहायला लागला तर वाऱ्याबरोबर उडायला लागेल. त्याचं पुष्पासारख्या लठ्ठ मुलीवर प्रेम जडलं तरी कसं याचं मला खरोखरच आश्चर्य वाटतं !

**मधू** : आणि मला कळत नाही ते हे की, अशा माणसाला पुष्पानं तरी कसं पसंत केलं. मला तर त्याच्या सहवासात पांच मिनिटे देखील काढता येणार नाहीत. काय तो मेल्याचा ओंगळ चेहरा ! वाटतं . . . . .

**चिती** : कित्येक वर्षं न्हाणीघराचं तोंड पाहिलं नसावं !

**सुरो** : पसंत न करून कसं चालेल बिचारीला ! तिचे वडील प्रो. मुंशीरामवर

बेहद्द खुश आहेत. त्यांनीच तर प्रोफेसर महाशयांना शिकवलं आणि आपल्या कॉलेजात लावून घेतलं. वीरेंद्रला बी. ए. ला चार वर्षं बसावं लागलं तर प्रोफेसर मुंशीरामने युनिव्हर्सिटीचं रेकॉर्ड मोडलं.

(मंगला चहाचा ट्रे आणते.)

**मंगला :** चहा कुठे ठेऊ, बाईसाहेब ?

**मधू :** ठेव तिथं टेबलांवर आणि दे इकडे सर्वांना पेल्यांतून ही तिपाई थोडी सरकवून घे आणि तिच्यावर बिस्किटं ठेव.

**सुरो :** (आश्चर्याने) मधू !

**मधू :** वेडी, कशाला उठायचं ? बस इथंच ! ह्या उबदार बिछान्यातून उठून डायनिंग टेबलाकडे जायचं म्हणजे चहाची मजाच संपली की ग ?

**चिती :** (उठण्याचा प्रयत्न करीत लटक्या रागाने) मधू...

**मधू :** राहू दे की, आता इथंच बसून रहा.

**चिती :** (उपहासाने) म्हणजे लग्नानंतर मधुमालती देवींनी आपले सारे सिद्धांत बदलून टाकले म्हणायचं ! आता डायनिंग टेबलऐवजी बिछान्यावरच चहा प्यायला लागल्या आणि भोजनही बिछान्यावरच मागवत असतील !

**सुरो :** साधे पाणी प्यायचे झालं तर डायनिग रूममध्ये जाऊन पिणारी ती मधुमालती कुठं आणि चहासाठी देखील.....

**मधू :** हवेत कशाला एवढे शिष्टाचार, खरं सांगा यावेळी या अशा उबदार बिछान्यातनं उठून डायनिग टेबलाकडे जायला कुणाला आवडेल ? हा चहा आणि ती बिस्कीट घ्या ! चहा थंड होईल नाही तर !

(सर्वजणी चहाचे पेले उचलतात आणि चहाचे घुटके घेत घेत गप्पा मारतात.)

**सुरो :** आणि-चहा बिछान्यावर सांडला तर ?

**मधू :** त्यात काय एवढंसं ! चादर धुवून घेता येईल, पुढं एखादं संकट अचानक येईल या भीतीनं कधी कुणी आपलं रोजचं सुख आणि आराम थोडीच सोडत असतं ?

**सुरो :** सुख ! आराम ! ( उपहासानं हसून ) बिछान्यात बसून चहा पिण्यात तुम्हाला फार मोठं सुख आहे असं वाटतं... ( पुन्हा हसते. )

**चिती :** आणि आपली ती सभ्यता, संस्कृती...

**मधू :** संस्कृती-संस्कृती ती काय ? मानवाच्या मूलभूत भावनांवर दिवसेंदिवस चढत जाणारे नित्यनवे पडदे, दुसरं काय ! समाजाच्या एक वर्गाला दुसरा वर्ग नेहमीच असभ्य, असंस्कृत वाटणार. मग माणसानं सभ्यता, संस्कृती यांच्या माग कुठवर धावायचं बरं ?

**सुरो :** काय सांगतेस तू हे ? तुला काय म्हणायचं आहे ? माणसानं इतकं शिकून–

सवरूदेखीनल पुन्हा पहिल्यासारखं रानटीच रहावं ?

**मधु :** छे, रानटी बनण्याची गरजच काय ? माणसानं प्रत्येक गोष्टीचे अती करायची काय गरज आहे ? मधला मार्ग का पत्करू नये ? त्याने रानटी समजलं जाण्याइतकं स्वैरही राहू नये आणि लहरी म्हणण्याइतकं बंधनात जखडूनही घेऊ नये. भगवान बुद्धाने तर म्हटलं आहे...

**सुरो :** **(हसून)** भगवान बुद्ध ! काय झालंय काय तुला ? शतकांपूर्वीचे बुरसटलेले विचार तू आजच्या सभ्यतेवर थापू इच्छितेस !

**चिती :** माणूस, क्षणा-क्षणाला प्रगतीची वाटचाल करीत असतो. आजचे सिद्धांत उद्या उपयोगी पडणार नाहीत तर उद्याचे परवा ! बर्नार्ड शॉनेच...

**मधु :** **(उपहासाने हसत)** बंद कर तुझा तो बर्नार्ड शॉ, कुठला विषय काढलास चर्चेला ! मंगला, एक–एक कप चहा आणखी बनव पाहू.

**चिती :** पुरे बाई, आता आम्ही निघालो. इथं येऊन किती वेळ झाला. कळलंच नाही. मंगला, आमच्या हातांवर पाणी घाल पाहू.

**मधु :** बसा ग. जाल सावकाश. आणखी एक एक कप चहा तर घ्या.

**सुरो :** छे, आता तू मुळीच आग्रह करू नकोस, आम्ही निघालो. तिकडे सगळे जण काळजी करीत असतील. निघतेवेळी फक्त मधूचं घर पाहून येतो अर्ध्या तासात एवढंच सांगितलं होतं आणि इथं येईपर्यंतच दोन तास गेले.

**चिती :** बरं, तुझा बाथरूम कुठं आहे. तिथंच हात धुऊन घेतो.

**मधु :** कशाला धुता इतक्या थंडीत हात ?

**सुरो :** नाही रे बाबा, हात धुतलेच पाहिजेत. कसे चिपचिपीत झाले आहेत.

**मधु :** धुवा जा ! **(मंगलाला)** मंगला, याना हाथ धुऊ दे पाहू.

**सुरो :** बाथरूम ?

**मधू :** बाथरूम कशाला हवी ? या इकडे व्हरांड्यात धुवा !

**(दरवाजा उघडून सुरो आणि चिती हात धुतात. मधू सावकाश आपल्या पेल्यातला चहा पिऊन टाकते.)**

**सुरो :** **(ओल्या हातांनी परत येत)** हा, टॉवेल कुठं आहे ?

**मधू :** मंगलाने दिलाच नाही का टॉवेल ? वर तो तिथं खुंटीला टांगला आहे बघ !

**सुरो :** **(रागाने)** मधू तुला चांगलं ठाऊक आहे...

**मधू :** मंगला, ह्यांना आतला एक धुतलेला टॉवेल आणून दे पाहू.

**(चितीही तेवढ्यात ओल्या हातांनी येते. मंगला टॉवेल घेऊन येते आणि दोघी हात पुसतात.)**

**मधू** : आणखी थोडावेळ बसला असता तर !

**चिती** : नाही ग बाई, आता उद्या येऊ जमलं तर !

**(हात पुसून टॉवेल खुर्चीच्या पाठीवर ठेवतात.)**

**मधू** : जमलं तर नाही, याच. विसरू नका. आणि जेवायलाच या.

**सुरो** : बरं, बरं, जरूर येईन.

**(मधू उठण्याचा प्रयत्न करते )**

**सुरो** : आता उठण्याची काही गरज नाही. उबदार रजईत तशीच बसून रहा. आम्ही दरवाजा बंद करून जाऊ. बर्फासारखी गार हवा आत येत आहे.

**(हसत–हसत निघून जातात. जाताना दरवाजा लावून घेतात.)**

**मधू** : मंगला, मला आणखी एक पेलाभर चहा दे पाहू.

**मंगला** : **(चहा बनवून देत)** या कोण होत्या बाईसाहेब ?

**मधू** : माझ्या मैत्रिणी ! कॉलेजमध्ये असताना एकत्र शिकलो होतो, आणि हॉस्टेल-मध्ये देखील एकत्रच राहत होतो.

**(थोडा वेळ न बोलता, चहा पिऊन झाल्यावर)**

**मधू** : मंगला !

**मंगला** : आले, बाईसाहेब !

**मधू** : मंगला, जरा माझ्याकडे पाहून सांग तर खरं, काय खरोखरच मी बदलून गेले आहे ?

**मंगला** : **(गप्प रहाते.)**

**मधू** : **(जणू आपल्याशी)** माझ्या मैत्रिणी म्हणतात, मी बदलून गेले. शेजारणी देखील हेच म्हणतात ! मंगला, माझ्याकडे पाहून सांग पाहू. मी खरोखरच बदलू शकले का ?

**मंगला** : मी तर चोवीस तास आपल्याकडेच असते, बाईसाहेब, मला काय कळणार ?

**मधू** : **(आपले म्हणणे तसेच चालू ठेवीत)** माझ्या डोळ्याकडे पाहून सांग, मंगला, खरोखरच हे बदलू शकले आहेत ? यात तिरस्काराची छटा तर नाही ?

**मंगला** : **(आश्चर्याने)** तिरस्कार...

**मधू** : माझ्या वागण्यात शिष्टपणा आणि कृत्रिमपणा तर दिसत नाही ना ?

**मंगला** : **(तशीच आश्चर्याने)** शिष्टपणा ? आणि कृत्रिमपणा ?

**मधू** : तिरस्कार, शिष्टपणा आणि कृत्रिमपणा या तिन्ही गोष्टी मला माझ्यातून काढून टाकायच्या आहेत **(स्वतःशीच जणू)** दोन महिन्यांपूर्वी ते याच गोष्टीवरून माझ्याशी भांडून निघून गेले होते.

**मंगला** : काय म्हणालात, बाईसाहेब आपण ? साहेब तर ..

**मधू** : (**वर पहात**) त्यांचा राग अजून गेलेला दिसत नाही. या दोन महिन्यात त्यांचं एकही पत्र आलं नाही.

**मंगला** : एक पत्र देखील नाही पाठवलं आणि.

**मधू** : (**उपहासाने**) "मी खुशाल, तुझी खुशाली कळवीत जा"
"मॅनेजर आजारी आहेत. ते बरे होताच निघेन" याला काय पत्र लिहिणं म्हणतात ! ते माझ्यावर नाराज आहेत हेच खरं. त्यांना वाटतं मी त्यांचा तिरस्कार करते.

**मगला** : (**गोंधळात पडते**) तिरस्कार, तिरस्कार !

**मधू** : स्वच्छता आणि टापटीप याची जास्तीत जास्त काळजी घेतली जाते अशा वातावरणात लहानपणापासून मी वाढले त्यात माझा काय दोष ! (**कंठ दाटून येतो**) मला सतत वाटतं घर कसं अगदी स्वच्छ आणि नीटनेटकं असावं या माझ्या वाटण्यालाच ते तिरस्कार समजतात. हे सारं सोडून द्यावं असा खूप वेळा विचार करते. वाटतं ह्या साऱ्या शिष्टाचारांना तिलांजली द्यावी. हे प्रयत्न करत असताना कधी कधी माझीच मला घृणा वाटू लागते. (**दीर्घ श्वास घेऊन**) लहानपणापासून हे माझ्यावर झालेले संस्कार आहेत. ते सहजासहजी जाणे कसे शक्य आहे ! (**एकाएकी निश्चय केल्यासारखं करीत**) नाही. आता काही झालं तरी मन घट्ट करायलाच हवं. जुन्या सवयींपासून स्वत:ला सोडवायलाच हवं. त्यांना वाटतं मी त्यांचा तिरस्कार करते.

**मंगला** : काय म्हणताहात हे बाईसाहेब आपण ?

**मधू** : त्यांना वाटतं, त्यांची, त्यांच्या स्वभावाची, त्यांच्या वातावरणाची, त्यांच्या प्रत्येक गोष्टीची मला घृणा आहे. (**हुंदके देऊ लागते**) मी या दोन महिन्यात स्वत:ला बदलून टाकलं आहे (**दरवाजा अचानक उघडतो आणि वसंत आत येतो.**)

**वसंत** : हॅऽलो मधू—काय म्हणता बाईसाहेब ? (**मंगलाला**) मगला, टांग्यातून सामान उतरवून घे पाहू. आणि...(**खिशातून पैसे काढीत**)
आणि हा दीड-रुपया टांगेवाल्याला दे. (**मंगला पैसे घेऊन जाते**)

**वसंत** : (**पुन्हा मधूजवळ जात**) सांगा बाईसाहेब, कसं काय चाललं आहे आपलं. अरे हा चेहरा असा रडका कशामुळं झाला ? तब्येत ठीक नाही का ?

**मधू** : (**तेवढ्यात पलगावरून खाली उतरून हसण्याचा प्रयत्न करीत**) कोरडी थंडी पडू लागली आहे तीन-चार दिवस झाले, थोडा सर्दीचा त्रास आहे.

**वसंत** : तू प्रकृतीला जपत जा म्हणून किती वेळा सांगितलं. आरोग्य-आरोग्य आरोग्य. जगात जे काही चाललं आहे ते आरोग्यासाठी. आयुष्यात तुझं आरोग्य जेवढं उपयोगी पडेल तेवढी तुझी ही स्वच्छता, टापटीप हे नखरे उपयोगी पडणार नाहीत.

आरोग्यच ठीक नसेल तर बाकी सारं काय कामाचं ? आणि आरोग्य आरोग्य जर ठीक असेल तर या इतर गोष्टींची गरजच काय ? **(स्वतःच्या म्हणण्यावर स्वतःच खूष होतो आणि खोली जणू पहिल्यांदाच पहातो आहे असं मासवीत बोलतो)** अरे काय पहातो आहे मी हे ! हा एवढा बदल कसा काय ? हा पलंग बैठकीच्या खोलीत कसा काय आला ? आणि हा ट्रे ह्या कप बशा...!

**मधू** : यापुढे तुम्हाला आणि तुमच्या मित्रांना थोडासुद्धा त्रास होऊ नये म्हणून मी तो पलंग या खोलीत आणून घेतला, आता मजेत रजई ओढून बसा टेलीफोन तुमच्या माथ्याकडे असेल.

**वसंत** : **(उत्साहाने)** अरे वा ! तू तर, तू...तर... किती चांगली आहेस म्हणून सांगू ?

**मधू** : मी स्वत: माझ्या मैत्रिणींबरोबरदेखील याच रजईत बसून होते.

**वसंत** : **(आश्चर्य आणि उत्साहाने)** काय, म्हणतेस काय ?

**मधू** : **(त्याने प्रसंसा करावी या हेतूने प्रेमळ नजरेने त्याच्याकडे पहात)** आणि चहा देखील आम्ही इथंच प्यालो.

**वसंत** : **(प्रसन्न मनाने)** वा...! खरंच आता तुला जगणं कशाला म्हणतात ते समजलं. जीवनाचं रहस्य बाहेरच्या रंग-ढंगात नसून मनाच्या स्थितीवर आहे. आपली प्रतिकारशक्ती कायम असेल...

**मधू** : चहा देखील आता इथंच घ्या, आपल्या मऊ मऊ बिछान्यावर...

**वसंत** : **(कमालीचा खूश होऊन)** वा...रे...वा ! आताच मंगलाला सांग पाहू चहाला पाणी ठेवायला !

**मधू** : आता तर आपला माझ्यावर राग नाही ना ?

**वसंत** : **(आश्चर्याने)** राग ?

**मधू** : दोन महिन्यांत आपण मनापासून एक पत्रसुद्धा पाठविलं नाहीत ते ?

**वसंत** : मी तर पत्रं...

**मधू** : होय ना, लिहिली होती ! मी खुशाल तुझी खुशाली कळवत जा-हे पत्र लिहिणं झालं ?

**वसंत** : **(जोरजोरात खदखदा हसतो.)** याचा अर्थ मी तुझ्यावर रागावलो आहे असा समजलीस ? वेडी कुठची ! तुझ्यावर कधी कुणी रागावणं शक्य आहे काय ?

**मधू** : मग दोनच ओळी...

**वसंत** : दोन ओळी लिहायला देखील वेळ मिळाला हेच भाग्य समज.

**मधू** : बरं, आता आधी हातपाय धुऊन घ्या, मी तोपर्यंत चहा करते.

**वसंत** : खरंच तू किती किती चांगली आहेस ग !

**मधू** : (**हसत**) पुरे, पुरे अगदीच काही असं लाडात यायला नको हातपाय धुऊन कपडे बदला आधी !

**वसंत** : हे बघ, पुन्हा तू कपडे बदलण्याची अट घातलीसच !

**मधू** : म्हणजे, कपडे बदलणार नाही की काय ? एक रात्र आणि एक दिवस गाडीचा प्रवास-प्रवासात अंगभर धूळ उडाली आहे. चला, उठा, लवकर हातपाय तोंड धुऊन कपडे बदला. मी तेवढ्यात चहा तयार करते.

**(वसंताला बाथरूमच्या दरवाजाकडे ढकलते.) आणि मोलकरणीला हाक मारते मंगला. ए, मंगला !**

**मंगला** : (**दुसऱ्या खोलीच्या दरवाजातून डोकावत**) आले, बाईसाहेब !

**मधू** : सामान आत आणलंस की नाही ?

**मंगला** : आणलं ना,

**मधू** : मग हा ट्रे आणि कप उचल चहाचं पाणी इतक्यात गार पण होऊन गेलं असेल बघ. साहेब तिकडे हातपाय धुवायला गेले आहेत-मी दुसरं पाणी ठेवते तोपर्यंत हे पाणी फेकून-चहाचे पेले आणि भांडं चांगलं धुऊन आण.

**(मंगला ट्रे वगैरे उचलून घेऊन जाते एक चमचा खाली पडतो)**

**मधू** : (**जरा रागात**) हा चमचा पुन्हा पडला तुझ्या हातून खाली, कितीवेळा सांगितलं असेल चमचा खाली पडू देऊ नकोस म्हणून, चिकट होऊन जातो आता ट्रे बाहेर ठेऊन ही एवढी जागा ओल्या फडक्याने पुसून घे पहिल्याने.

**वसंत** : (**बाथरुममधून**) अरे, साबण कुठं आहे ?

**मधू** : नीट पहा, तिथचं फळीवर ठेवला आहे.

**वसंत** : (**तिथूनच**) आणि टॉवेल ?

**मधू** : हातपाय धुवून घ्या आणि इकडे खोलीतला नवा वाळलेला टॉवेल घेऊन पुसा.

**(मंगला फडके भिजवून आणते आणि गुपचूपपणे फरशी साफ करू लागते. )**

**मधू** : तू फरशी साफ करून चहाची किटली आणि पेले धुऊन ठेव तोपर्यंत मी चहाला पाणी ठेवते.

**(स्वयंपाकघराच्या दरवाज्यावाटे आत जाते थोडावेळ मंगला गुपचूप फरशी साफ करत राहते. वसंत हाततोंड धुऊन अंगात कुडता घालून गाण्याच्या ओळी गुणगुणत येतो.**

**झोका कसा झुलु माझं मन झुले रे ।**

**मी झोका कसा झुलु माझ मन झुले रे ।**

**आणि आपल्याच नादात सुरो आणि चितीने हाततोंड पुसून ठेवलेल्या खुर्चीच्या पाठीवरल्या टॉवेलाने तोंड पुसू लागतो.)**

**मधू :**(**स्वयंपाक घरातून**) मंगला, ही किटली बघ कशी करून ठेवली आहेस तू मणभर मळ साचला असेल त्याचात. (**किटली हातात घेऊन येते**) तुला कधीच भांडी स्वच्छ धुता येणार नाहीत. मंगला. किती वेळा सांगितल स्वच्छतेचा... (**चटकन सुरोने वापरलेल्या टॉवलने वसंतला तोंड पुसताना पाहून एकदम किंचाळते**) हाच का धुतलेला नवा टॉवेल घेतला तुम्ही ? मी म्हणते वाळलेला आणि ओला या बाबतही तारतम्य नसावं तुम्हाला ? आताच तर सुरो आणि चिंती चहा पिऊन ह्या टॉवेलला हात पुसून गेल्या.

**वसंत :** (**घाबरून**) परंतु नवा...

**मधू :** नवा टॉवेल इथं खोलीत तर टांगलेला आहे.

**वसंत :** अरे, हे दळभद्री टॉवेल माझ्या लक्षातच कसे ते रहात नाहीत बघ. खरं म्हणजे दोन्ही टॉवेल्स तसे स्वच्छ आहेत. मला . . .

**मधू :** हां, हां, म्हणे स्वच्छ आहेत. जरा डोळे नीट उघडून पहा. ओले आणि सुकलेले. . .

**वसंत :** मी चष्मा काढून ठेवला आहे आणि चश्म्याखेरीज आमचं जग तुला माहीतच आहे. (**खजीलपणे हसतो**)

**मधू :** वा महाराज, आमचं जग म्हणे तुम्ही कोणत्या जगात वावरत आहात कोण जाणे ! आता एक चष्मा नाही पण चष्मा असताना असं काय तुम्हाला दिसत असतं सांगा पाहू ?

(**तोंड वाकडे करून घप्पदिशी कोचावर बसते.**)

**वसंत :** हे बघ, पुन्हा तोंड वाकडं केलंस रागावलीस ?

**मधू :** (**उपहासाने हसून**) छे, मी कुठं रागावले ?

**वसंत :** तुला काय वाटलं एवढं देखील न कळायला मी काय मूर्ख आहे ?

(**पडदा पडतो**)

पात्रे

(दृश्य पहिले)

पुरुष

स्त्री

(दृश्य दुसरे)

तीन पुरुष

एक युवक

(दृश्य तिसरे)

पहिल्या दृश्यातील पुरुष

दुसऱ्या दृश्यातील युवक

## दृश्य पहिले

(मध्यम वर्गाच्या वसतीतील एका बंगल्यातील खोली. ही खोली बंगल्याच्या व्हरांड्यात एका बाजूला पडदा लावून तयार केलेली आहे एक भलं मोठं साइड टेबल ठेवलेलं आहे. त्यावर साखरेचे डबे, प्लेटस्, कपबशा प्रदर्शनात मांडाव्या तशा ठेवल्या आहेत; जवळच एका छोट्या टेबलावर फोर्स, क्वाकर ओटस्, पोलसन बटर आणि लोणच्याचे दोन सट व्यवस्थित लावून ठेवलेले आहेत. डायनिंग टेबल अंडाकृती आहे, त्याच्या बाजूला खुर्च्या ठेवलेल्या आहेत. दोन खुर्च्यांवर एक स्त्री आणि एक पुरुष बसलेले आहेत व कमीत कमी दहा मिनिटे झाले असतील तोंडून एक अक्षर नाही. संध्याकाळचा चहा पीत बसले आहेत.)

**स्त्री** : (चहाचा कप फिरवीत) : तर सरदारजी खूप दचकले.

**पुरुष** : (विमनस्क) हां...

**स्त्री** : (काही सांगण्यासाठी म्हणून श्वास घेते)

**पुरुष** : आज दोघांही नोकरांनी सुट्टी घेतली तर...

**स्त्री** : (दोन घोट चहा पिऊन रुमालाने ओठ पुसत) सरदारजीचे डायरेक्टरांत तर खूप चालतं...

**पुरुष** : (कमालीच्या उत्साहाने) हो त्यामुळेच तर ह्या बिचाऱ्यांचा नाश ओढवतो. त्यांना वाटतं, बहुमतानं आपण करू ती पूर्व. आता बहुमताचा अर्थ बदलला आहे हे जाणून घेण्याचीही ह्यांना अक्कल नाही. बेजार झालेली, अर्धमेली काही गांडुळं म्हणजे तर बहुमत नव्हे. तो शक्ती – जगाला हादरून सोडणाऱ्या प्रचंड शक्तीचं ते नाव आहे आणि ती सदैव एका माणसात – एका माणसात एकवटलेली असते.

(स्त्री काही न बोलता चहा गाळत आणि त्यात दूध ओतून स्थिर नजरेने पेल्याकडे पहात आहे. पुरुष पावाला वाटेल तसं लोणी लावत आहे. काही क्षण कोणीच काही बोलत नाही.)

**पुरुष** : सरदारजी, राजेसाहेब, मुनिमजी सर्वांच्या बाबतीत हीच अडचण आहे. मूर्खांना जगण्याची कला देखील अवगत नाही. मरायला टेकलेल्या, हतबल माणसां-

प्रमाणे मरेपर्यंत स्वतःला बचावण्याच्या मागे असतात. मी त्यांच्यापाशी भीक मागत नाही, हांजी हांजी करत नाही, एकमेकांविरुद्ध काही चहाडया करत नाही, कारस्थान रचत नाही हे जेव्हा त्यांना दिसून आलं तेव्हा त्यांना आश्चर्यच वाटलं. (पेला ठेवून हसतो) यांना काही समजणं–उमजणं, छे, नाव नको, ठोकर बसली की मग आ ऽ ऽ वासून उभे रहातात. (हळू आवाजात) खरं सांगायचं तर कपडयांच्या आत दडलेले हे एकजात सारे अब्रूदार लठ्ठ लांबतोंडे गाढव आहेत अगदी गाढव. या सभ्य समाजात त्यापासून कोणता फायदा झाला असेल तर तो म्हणजे हे लाथा खूप सहन करू शकतात. डिव्हिडंड कमी झाला, घाबरले, कुणा कॉलेजकुमारानं पुस्तकी इंग्रजीत हरताळ करण्याची धमकी दिली, घाबरले, खवळले – (नाटकी पद्धतीने हात हालवत) मी सांगून टाकलं – तीन वर्षेपर्यंत कुठचाही डिव्हिडंड वाटणार नाही. करा माझं काय करायचं ते.

(अश्लाघ्य पद्धतीने आंगठा दाखवितो.)

(स्त्री चहा संपवून घडयाळाकडे पाहते. मनातल्या मनात काही पुटपुटते, पुरुषाला बिचाऱ्याला काय कळणार. तो एकाग्रचित्ताने खात रहातो. खोलीत पुन्हा शांतता पसरते.)

• पुरुष : (कंटाळून गेल्यासारखा) तर मग आज दोन्ही नोकर पसार ! बाईसाहेबांनी आज चहा केला पण संध्याकाळचं काय ? माझी मिटिंग संपायला रात्री आठ देखील वाजतील.

स्त्री : (रुमालाने बोटे साफ करीत) मी...मी... (एकदम) तर चालले.

पुरुष : कुठं चाललीस ? कुठं ?

स्त्री : (बाहेरच्या बाजूला रुमाल हालवीत) तिकडे.

पुरुष : (बाहेर पडतो) बाजारात, खरेदीसाठी ?

स्त्री : छे, मी तर लखनौला चालले. शेवटच्या जी. आय. पी. नं परत येईन.

पुरुष : (आपल्याला आश्चर्य वाटलं नाही असं दाखविण्याचा प्रयत्न करीत) लखनौला, जी. आय. पी. नं येणार, पण का ?

स्त्री :(चहा संपवला आहे) उगाचच, फिरायला. सरदारजींची पत्नी आहे. मिसेस निहाल आहेत, मी आणि मिस निहाल आहे. तिचंच काही काम आहे. कदाचित रेडिओ खरेदी करायचा असेल.

पुरुष : (बोटे पुसत) मग असं सांग की (थांबून) पण गाडीच का घेऊन जात नाही ?

स्त्री : छे, गाडी नको. उशिरात उशीरा म्हणजे जी. आय. पी. नं परत येऊ. तीच शेवटची गाडी आहे.

**पुरुष :** **(खिशातून सोन्याचं पॉकेट वॉच काढून ते बास्केटवर पुसून)** म्हणजे, जी. आय. पी. येते सव्वा दहाला, तुला घरी यायला दहा पंचवीस होतील. गाडी मी पंपावर ठेवून देईन. मिलखीरामच्या पेट्रोल पंपावर, समजलं. हे बघ जेवणाच्या बाबतीत असं करू – मी गाडीतच टिफिन बॉक्स ठेवून देईन, तू स्टेशनवरून येताना भाजी किंवा इतर काही तोंडी लावायला घेऊन ये, पोळया घरीच करू. **(खिशात घड्याळ ठेवतो आणि खिसे चाचपून एक हलकी सिगरेट केस काढतो व त्यातून एक सिगरेट काढून पेटवतो. धूर सोडत)** आता सरदार साहेबांची घमेंड चांगली उतरेल. काही ध्येय नाही ! काही उत्साह नाही ! याला काय आयुष्य म्हणायचं ?

**स्त्री :** तर जी. आय पी. इथं साडे दहाला येते ?

**पुरुष :** (पुन्हा घड्याळ बाहेर काढून, पुन्हा पुसत) छे, सव्वा दहाला ! (जणू कुणीतरी आपलाच विषय बोलतो आहे.) जगाचं भविष्य योग्यवेळी योग्य काम करणाऱ्याच्या हातात आहे. जगातील सारी दौलत, सारं सुख, आणि सारं यश हे आपल्या जागी स्थिर असणाऱ्याचं आहे आणि जो सतत यंत्रवत राबून काम पूर्ण करतो. त्याच्या वाटयाला मात्र त्याचा एक नगण्य भाग अमेरिकेतील एक महान लेखक 'बर्नार्ड शॉ' तर म्हणतो ..

**स्त्री :** (एकाएकी कंटाळल्यासारखं करीत) मिसेस निहाल आपली गाडी पाठवून देईन असं म्हणाली होती. तुम्ही मीटिंगला केव्हा जाणार ?

**पुरुष :** (दचकून घड्याळाकडे पहात) साडेचार ! निघालोच बघ मी–(गुणगुणत) चार वाजून सतरा – तीन चार मिनटं ड्यूक कंपनीत जातील, चार–एकतीस, चल मग तुला पिण्डीपकडे सोडतो, तिथून नाहीतर निहालच्या तिथपर्यंत, दोन मिनटांचाच तर प्रश्न आहे.

**स्त्री :** (आळस झाडीत) असं म्हणता ? (उभी रहाते) हीच साडी राहू दे की दुसरी बदलू...

(वळून साडीकडे पहाते)

**पुरुष :** (सिगरेटचे दोन चार झुरके घेत) जशी तुझी इच्छा ! परंतु तुला माझी शपथ आहे, खरं सांग, काय काम आहे लखनौला ?

**स्त्री :** (ओढूनताणून हसत) लखनौला...खूप गोष्टी आहेत–लहान मोठे इमाम वाडे, प्राणी संग्रहालय, हजरतगंज, अमीना...

**पुरुष :** ते नाही मला विचारायचं, आज संध्याकाळी काही विशेष ?

**स्त्री :** (निघत) आज संध्याकाळी आणि विशेष ? छे गं बाई !

**पुरुष :** (एका मोठ्या मोहिमेवर जाण्यासाठीच जणू सज्ज होत) इकडे ये, बैस इथं. (स्त्री वळून उभी रहाते) इथं बैस, मला माहीत आहे, हल्ली काही दिवसापासून तू

अशी विचित्र वागायला लागली आहेस. तुझा वेळ जात नाही हे मलाही पटतं पण सुटीत निर्मल येईल कदाचित. मोनी देखील येणं शक्य आहे. मोनी यावेळी बी. ए. ला पहिली आली हे तुला कळलं की नाही. बरं ते जाऊ द्या. हे सांग, तुला झालं आहे तरी काय हल्ली ?

**स्त्री :** मला काय धाड भरली आहे; तुम्ही जर का माझ्या तब्येतीचा एक चार्ट बनवला ना...तर तो त्या तिथं – तिथं थेट विजेपर्यंत जाऊन पोहोचेल...

**पुरुष :** (उत्साहाने) तर मग आज अशी बेचैन का ? हे बघ माणसाला आपली उरली-सुरली शक्ती कशा प्रकारे उपयोगात आणता येईल हाच त्याच्यापुढे आज फार मोठा प्रश्न आहे. अगदी अनादी रानटीपणापासून आजच्या या संस्कृतीपर्यंत माणसानं स्वतःला सुखी किंवा दुःखी बनविण्यासाठी जे जे काही केलं ते सारं ही आपली शक्ती उपयोगात आणण्यासाठी. आणि सुख किंवा दुःख ह्या इतक्या मजबूत वस्तू आहेत की एक दिवस, खरं सांगतो, त्या बाटल्यातून विकल्या जाऊ लागतील, बाटल्यांतून ! मला या टिपं गाळणाऱ्या लोकांविषयी घृणा आहे. कमालीची घृणा ! हे फक्त पराभूत होऊनच थांबत नाहीत तर आपल्या पराभवाची गीतं गातात, उद्घोष करतात.

**स्त्री :** उठा आता, नाहीतर मला काही तुम्ही गाडीनं पोचवू शकणार नाहीत.

**पुरुष :** (पुन्हा घड्याळ काढून ते पुसत) आता शक्यच नाही. तू आता मिसेस निहालचीच वाट पहात रहा.

(घाईने आत जातो. स्त्री तिथेच बाहेरच्या बाजूला पहात बसून रहाते. थोड्या वेळानं पुरुष बगलेत जुनी फेल्ट हॅट दाबत, हातातली छोटी काठी रुमालाने पुसत आतून बाहेर येतो.)

**पुरुष :** सव्वा दहा वाजता तू स्टेशनवर येशील. तेथून मिलखीरामकडे जायला पाच मिनिटं, दहा वीस झाले म्हणजे साडे-दहा पर्यंत तू इथं पोहोचशील, याचाच अर्थ दहा चाळीस पर्यंत आम्ही दोघं इथंच याच टेबलावर रात्रीचं जेवण घेत असू. मी स्टेशनवर आलो असतो परंतु मिस मित्तल – तू निष्कारण मत्सर करायला लागायचीस. (उपहासाने हसतो. स्त्रीवर जणू काहीच परिणाम होत नाही) बरं चिरियो !

(जिन्यावरून घाईत उतरून निघून जातो. स्त्री तशीच बसून रहाते, नंतर विमनस्कशी आत निघून जाते. स्टेजवर थोड्या वेळासाठी काळोख पसरतो. मध्येच दोन वेळा फक्त टेबल आणि खुर्चीवर तेवढा प्रकाश पडतो. घड्याळात एकदा साडे आठ वाजलेले असतात आणि नंतर सव्वा नऊ.)

## दृश्य दुसरे

(एका दुसऱ्या दर्जाच्या क्लबची खोली, मोठा प्रखर प्रकाश पडलेला आहे. टेबला-वर पत्ते व भरलेले अॅश ट्रे पसरलेले आहेत. बऱ्याच खुर्च्या देखील चारी बाजूला इकडे तिकडे विखुरलेल्या आहेत. कोपऱ्यात एका मोठ्या फ्रेंच टाईप खिडकीसमोर तीन माणसं एका कोचावर बसली आहेत. समोरून फक्त त्यांच्या पाठीमागचा भाग तेवढा दिसतो आहे. जवळच एका खुर्चीवर चट्टेरी पट्टेरी फॅशनचे कपडे घातलेला एक तरुण बसलेला आहे आणि समोरच्या छोट्या टेबलावर पत्ते पिसत आहे. खिड-कीच्या काचेतून ताऱ्यांनी फुललेलं आकाश एखाद्या तस्वीरीसारखं दिसत आहे. भिंतीवरच्या मोठ्या घड्याळात पावणे नऊ वाजताहेत. खोलीत सगळं काही सामसूम आहे. परंतु निःस्तब्धता मात्र नाही.)

पहिला माणूस : हा उदासवाणा ब्रीजचा खेळ मी का खेळतो आहे ते माझं मलाच कळत नाही. (आवाज म्हातारा वाटतो)

दुसरा माणूस : (जांभई देत) काय करणार ? चला दुसरं काही करू.

तिसरा माणूस : ही माणसं अजून कशी आली नाहीत (खुर्चीवरच्या तरुणाकडे वळून) हे बघा, तुम्ही संमिश्र समाजाबद्दल चर्चा सुरू करा....

(दोन्ही माणसं वळून त्या तरुणाकडे पहातात. तिन्ही माणसं जाडजूड, वयस्क, उंची कपडे परिधान केलेली व अत्यंत समाधानी दिसताहेत.)

युवक : (खजील होऊन) मला कसं शक्य आहे ? हां, माझी पत्नी आली असती ना, तर मात्र मी अवश्य असं केलं असतं, हे बघा त्यांना....

(तिघे एकवेळ 'हूं' म्हणून तोंड फिरवून बसतात आणि गप्प होतात. तरुण पुन्हा पत्त्यांना फर्र् मारतो.)

पहिला माणूस : (खिशातून सिगरेट केस काढतो व पुन्हा ठेवतो) चला, निघू आता, मला तर सकाळपासून सारखं काम आहे.

दुसरा माणूस : (वळून घड्याळाकडे पहात) ह्या श्रीचंदने आम्हाला चांगलीच टांग मारली.

पहिला माणूस : छे रे, कुठंतरी, अडकला असेल. त्याला त्या कोळ्यासारखे शंभर डोळे आहेत !

तरुण : नक्की येणार ते. मला तर आमंत्रण देऊन गेले आहेत.

तिन्ही माणसे : (वळून) अस्स ? आणि बेट्याची बायकोही आज नाही आहे !

(सर्व एकदुसऱ्याकडे पहात)

तरुण : अस्सं होय, मला हे माहीत असतं तर मी मुळीच वाट पाहिली नसती.

**पहिला माणूस** : या श्रीचंदला पहा, जेव्हा तो वकिली सोडून व्यापारात पडला तेव्हा सुरवातीला त्याला व्यापारात यश मिळेल याची मला जराही आशा वाटत नव्हती, परंतु पहा एखाद्याचं नशीब कसं असतं ते. आज तो एका कंपनीचा कर्तुमकर्तुम बनला आहे. (हसतो)

**दुसरा माणूस** : (जांभई देत आणि आंगठ्या असलेल्या बोटांनी) चुटक्या वाजवीत मला तर बाबा आता दिवसेंदिवस भाग्य म्हणून काही असतं हे पटू लागलं आहे.

(तरुण पत्ते बाजूला ठेवतो आणि लक्ष देऊन त्यांचे म्हणणे ऐकतो.)

**तिसरा माणूस** : (उठून उभा राहतो) चला, निघू आता. मिस्टर सहाय, तुम्हाला सोडतो गाडीतून, घरापर्यन्त...

**पहिला माणूस** : बसा की थोडा वेळ. श्रीचंद येईलच इतक्यात.

**तरुण** : आणि त्यालादेखील आज आपल्या गाडीतून सोडायचं ठरलं होतं ना ?

**तिसरा माणूस** : (बसत) ठीक, ठीक, तर मग थांबलंच पाहिजे.

(तरुण कोणतातरी विषय सुरू करण्याचा विचार करतो )

**तरुण** : आज मेरठच्या कारस्थानानं पुन्हा उचल खाल्ली म्हणे.

**तिन्ही माणसं** : काय ? जाऊ द्या !

(तिघेही अशा गोष्टीत रस घेत नाहीत परंतु तरीही काही प्रमाणात लक्ष द्यावंच लागतं.)

**पहिला माणूस** : श्रीचंदने यांच्याबाबतीत बरंच काही सांगितलं.

(हसतो, सर्व त्याच्याकडे पाहून ऐकण्याचा प्रयत्न करतात.)

**पहिला माणूस** : (कोटाची कॉलर नीट करीत) कमिशनरला भेटायला माझ्याबरोबर जाताना...त्यांनी मेरठचा विषय काढला. ते सुरुवातीलाच हिंदीतून–हिंदीतून बोलले–हे बघा साहेब, यांना असंच सोडून दिलं पाहिजे, ही तर आमची खेळणी आहेत.

(तिघेही फॅशनेबल हास्य करतात, तरुणही त्यात सामील होतो.)

**दुसरा माणूस** : प्रत्येक राष्ट्रापुढे, प्रत्येक सरकारपुढे एकच प्रश्न आहे आणि तो म्हणजे कशाप्रकारे कराचा बोजा हलका करता येईल. कर कमी करा आणि पहा, प्रजा आपोआप कशी सम्पन्न होते ती !

**पहिला माणूस** : प्रत्येक वेळी साऱ्या जगाला रशियापुढे हीन लेखणाऱ्या या सभ्य माणसांनी तिथे काय दिवे लावले आहेत ते खरोखरच एकदा आमच्यासारख्या माणसानं तिथं जाऊन पाहिलं पाहिजे.

**तिसरा माणूस** : म्हणजे प्रत्यक्ष परमेश्वराला देखील.

(नंतर तिघेही निरुत्साही हास्य करतात. बाहेर खट–खट आवाज येतो. सर्वांचं

लक्ष बाहेरच्या बाजूला जातं. पहिल्या दृश्यातला चिंताग्रस्त माणूस समाधानाने आणि बेपरवाईने आत प्रवेश करतो.)

**पुरुष** : (स्वत:ची हॅट आणि काठी एका मोकळ्या टेबलावर ठेवीत) म्हणजे तुम्ही फक्त वाटच पहात होता. ब्रिजचा डाव संपला ?

**दुसरा माणूस** : (खोलीच्या मध्यभागी येत) आज सहाय पुन्हा हरले ?

**पुरुष** : (हसत) सहाय, तुम्ही सतत हरतच असता बुवा !

(आता सर्वजण आपल्या जागांवरून उठून खोलीच्या मध्यभागी आलेले आहेत.)

**पहिला माणूस** : विजय तर सर्व तुमच्याच वाट्याला आला आहे.

**पुरुष** : अरे बाबा, हरणं काय आणि जिंकणं काय ? मी कधी स्वप्नातही याचा विचार करत नाही. आम्हाला फक्त प्रामाणिकपणे जगणं माहीत. पुन्हा सांगून ठेवतो, जीवन एक कला आहे. फार मोठी कला !

**तिसरा माणूस** : (जांभई देत) चला, फार उशीर झाला.

(सर्व आपल्या घड्याळांकडे पहातात, पुरुष आपलं सोन्याचं पॉकेटवॉच काढतो आणि पुसतो.)

**तिसरा माणूस** : चला, घरापर्यन्त सोडावं लागेल.

(तिघेही आत जाऊन आपापल्या हॅटस् घेऊन येतात. फक्त तरुणाच्या डोक्यावर काही नाही.)

**पहिला माणूस** : हा चौकीदार कुठं मरतो कोण जाणे.

**दुसरा माणूस** : मरतो ? धन्य तुमची. अहो त्यानं नवी बायको केली आहे. जरा विचार करा. नवी बायको !

(सर्व तरुणांसारखे हसतात, फक्त तो तरुण तेवढा थोडा खजील झाल्यासारखा सर्वांच्या मागून बाहेर पडतो. बाहेर व्हरांड्यात दोन तीन वेळा हाका मारल्या जातात–चौकीदार ! नंतर गाडी स्टार्ट झाल्याचा आवाज व पुन्हा शांतता. स्टेजवर काळोख पसरतो. परंतु मध्येच दोन–तीन वेळा प्रकाश पडतो. आणि एक शेतकऱ्यासारखा उतरलेल्या चेहऱ्याचा चौकीदार टेबल पुसत असलेला व सिगारेटची थोटकं गोळा करीत असलेला दिसतो.)

## दृश्य तिसरे

(पहिल्या दृश्यातील खोलीचा ' व्हरांडा ', लांब आणि साधारणपणे थोडा उंच. खांबाजवळ मोठ-मोठे पाम उभे केले आहेत. खांबांवर वेलीही सोडल्या आहेत. सर्व दरवाजे बंद आहेत. समोर तीन चार वेगवेगळ्या खुर्च्या विखुरल्या आहेत. पायऱ्या-

वर एक मोठा केसाळ कुत्रा पहुडला आहे. सुरवातीला कोणी माणूस दृष्टीस पडत नाही पण इतक्यात मालक आणि एक तरुण पायऱ्या चढताना दिसताहेत. ते आताच क्लबमधून आले आहेत. कुत्रा डोकं वर करून अस्पष्टशा ओळखीनं गुरगुरतो, पुन्हा शेपटी हलवत त्यांच्या मागून व्हरांड्यात जाऊन बसतो. स्टेजवर अंधुकसा प्रकाश आहे.)

पुरुष : (कष्टाने पायऱ्या चढत) तर मग मला हे सांगा ? थांबा .....

(खिसा चाचपतो)

(एकदा पायऱ्या उतरून बंगल्याच्या मागच्या बाजूला जातो, तो तरुण तिथंच उभा राहून त्यांच्याकडे उत्सुकतेने पाहून हसत आहे. लगेच तो परत येतो आणि उतावळा होऊन खिसा पुन्हा चाचपतो.)

पुरुष : माझ्या पत्नीनं किल्ली माझ्याकडे दिली की कुठं ठेवली, काही कळत नाही. नोकर...खरंच माझ्या आयुष्यात जर कोणता सूर लागला नसेल तर तो ह्या नोकराचा ! सुट्टी...सुट्टी...सुट्टी ! रोज ह्यांना सुट्टी पाहिजे. साल्यांना हे कळत नाही...

(तो तरुण तेवढ्यात एक खुर्ची ओढून घेऊन त्यावर बसतो. पुरुष स्विच शोधून दिवा लावतो आणि दुसऱ्या खुर्चीवर अगदी त्या तरुणाच्या समोर जाऊन बसतो.)

पुरुष : (एकवेळ हसत) जर हा स्विच खोलीच्या आत असता तर आली असती पंचाइत !

तरुण : जाऊ द्या, इथे देखील आरामात बसलो आहोत की.

पुरुष : ते तर झालंच, आता साडे नऊ वाजताहेत. (घड्याळ काढून ते पुसतो) नऊ सत्तावीस, असू द्या. माझी बायको येईल साडे–दहा पर्यंत. जेवण बरोबरच घेऊन येईल. (जांभई देतो) आणखी काही विशेष ?

तरुण : (उत्साहाने) मला शेवटी एकदाची खोली मिळाली...

पुरुष : (चप्पल वाजवीत) ते खोली–बिलीचं जाऊ द्या हो, पण तुम्ही लग्न का नाही केलंत ते नाही सांगितलंत.

तरुण : (मुश्किलीने) नाही केलं झालं–तसं कारण काहीच नाही.

पुरुष : (हसत) खरं सांगायचं म्हणजे, मी तुमच्यासारख्या तरुणांना पाहून बरेच वेळा अगदी खुश होऊन जातो.

तरुण : (त्याला ही प्रसंशा मुळीच आवडली नसावी) काय म्हणालात ? (हसतो)

पुरुष : (सावधपणे) तसं नाही, मी तुमची थट्टा करत नाही. तुम्ही आमच्यापेक्षा एका पिढीनं पुढे आहात परंतु तुमच्याकडे जर हिशेब मागितला गेला तर काय आहे तुमच्यापाशी ? मला सांगा बघू, तुमच्यासारख्या लोकांनी जगाला काय दिलं ? मी शास्त्रीय शोधांच्या गोष्टींबाबत बोलत नाही, त्याची तर एक वेगळीच योजना

आहे त्यास पिढ्या आणि समाजाचा मुळी विचारच नाही. ती बाब निसर्ग हळूहळू स्वतःच पूर्ण करीत आहे. मला ठाऊक आहे, तुम्ही माझ्या विचारांना जुनाट समजून मनातल्या मनात मला हसताहात; परंतु, हे सांगा–तुम्ही तुमच्या नव्या विचारांनी एवढं काय मोठं नाव घेण्यासारखं यश मिळवलंत ? सांगा ना.

तरुण : विषय लग्नाचा निघाला होता ना ?

पुरुष : हो, हो. लग्नाचाच विषय घ्या की. प्रत्येक माणसाला आपल्या जातीच्या जीवनात प्रवेश करणं आवश्यक आहे याबाबत तर तुमचं दुमत नाही. माझं नेहमीच सांगणं असतं–जग हे एक भागीदारीत चालणारं दुकान आहे–आणि प्रत्येक समजूतदार माणसानं त्याचा भागीदार होणं हे त्याचं कर्तव्य आहे. जर का यासाठी प्राण पणाला लावून आपण झटलो नाही तर मी म्हणेन, आपल्याला स्वतःला मनुष्य म्हणवून घेण्याचा अधिकार पोहोचत नाही. (उत्तेजित होऊन) मी म्हणतो, ही सारी पुस्तकं बेकार आहेत– फसवणूक करणारी आहेत.

तरुण : मी लग्न केलं नाही–नाही केलं कारण मला कदाचित कधीही स्त्रीच्या बुद्धीची . . .

पुरुष : दोस्त, लग्न हा एक गहन विषय आहे, तुम्ही त्याच्याशी खेळ खेळू शकणार नाही. मी म्हणतो, तुम्ही एका कारखान्यात सर्व प्रकारचं शास्त्र, कायदा, ज्ञान यांचा उपयोग करता. मग जीवनालाच कशासाठी परमेश्वराच्या भरवशावर सोडून द्यायचं, त्यात सर्वात स्वस्त आणि निरुपयोगी शक्तीच तेवढ्या कां म्हणून माणसानं उपयोगात आणायच्या ? तुम्ही स्त्रीला समजू शकत नाही, हेच तुमचं म्हणणं आहे खरं ना ? महाशय, ह्या सर्व बाता आहेत, बाता ! समजायला कशाला हवं ? यंत्राचा एक भाग दुसऱ्या भागाचं मोजमाप घ्यायला, त्याला समजून घ्यायला कधी जात नसतो. स्त्री आणि पुरुष जीवनरूपी यंत्रांचे दोन अवयव आहेत–अवयव !

तरुण : फॅक्टरी आणि मशीन–दोहोंची गोष्ट सारखीच ?

पुरुष : तसं नाही बाबा, माझंच उदाहरण घ्या. माझी पहिली पत्नी होती. गाढवीची नेहमी माझ्याबद्दल तक्रार करत असायची. परंतु तिच्या आजारात जेव्हा मी सारखा तिच्या उशाशी बसून राहू लागलो तेव्हा मात्र ती शेवटी माझाच जप करत मेली. आता ही माझी दुसरी पत्नी. मला म्हणजे ह्या पत्नीला मुलं नाहीत. आम्ही कधी क्लबात बरोबर जात नाही. आठवड्यातून एकदा पिक्चर बघतो; थंड हवेच्या ठिकाणी, पहाडावर किंवा वनप्रदेशांत जायला माझ्याजवळ वेळ नाही; तरीही आम्ही दोघेही एकमेकांवर खुश आहोत– कधी आमच्यात कसला मतभेद झालाच नाही. मला सांगायचं एवढंच की, आम्ही दोघांनी स्वतःचं स्थान ओळखलं आहे आणि त्या ठिकाणी आम्ही दोघंही आपापल्या तत्त्वाशी एकनिष्ठ आहोत.

ती आजारी पडते तेव्हा मी डॉक्टरांनी घर भरून नाही टाकीत; मी आजारी पडतो तेव्हा तीही रडत बसत नाही ! काय सांगू, यावेळी मला माहीत आहे, माझी पत्नी स्टेशनच्या बुकस्टॉलवर कोणतं पुस्तक चाळत असेल. ती नेहमी गाडीच्या वेळेपूर्वी दहा मिनटं हजर असते हेही मला माहीत आहे.

**तरुण :** पण समजा, मशीनचा एक अवयव बिघडला !

**पुरुष :** तो पार्ट बदलून टाका किंवा स्वत: बदला. पुस्तकं, मी तुम्हाला सांगतो, पुस्तकं म्हणजे तरी काय ? मी कापसाच्या व्यापारावर एक छोटसं पुस्तक लिहिलं, काय होतं त्यात ? लोकांचे रोजचे विचार आणि त्यांवर चालणारी चर्चा. परिणाम असा झाला की या पुस्तकाचा खूप बोलबाला झाला. परंतु ज्यांची मी वकिली केली तोच विचार स्वत: उपयोगात आणण्याचा अविचार मात्र मी स्वप्नातही केला नाही.

**(आता तो तरुण काही सांगेल या विचाराने पुरुष काही क्षण गप्प बसतो. तो तरुण डोके खाली करून चुप बसून रहातो. कुत्रा मात्र इतका आरडा-ओरडा ऐकून जवळ येऊन उभा रहातो. काही क्षण पुन्हा शांतता.)**

**तरुण : (डोकं वर करून)** फॅक्टरी, अवयव, कमाल आहे बुवा सगळ्याची !

**(पुरुष यावर काही बोलणार इतक्यात फाटकाचा दरवाजा वाजतो आणि कुत्रा भुंकत भुंकत तिकडे धावतो. तो कुत्र्याला बोलावतो आणि व्हरांड्यात उभं राहून जोरात विचारतो 'कोण आहे' पुन्हा कुत्र्याला बोलावतो. एक नोकर हातात सायकल घेऊन येतो आणि सलाम करून खिशातून एक पाकीट काढून देतो आणि सलाम करीत उभा रहातो.)**

**पुरुष :** काय आहे, तू कोण ? **(पाकीट घेऊन ते घड्याळाच्या चेनला लावलेल्या चाकूने उघडतो, प्रकाशाकडे जातो.)** आँ ?

**नोकर :** मी निहाल साहेबांचा ड्रायव्हर आहे, बाईसाहेबांनी सांगितलं आहे की त्या उद्या येतील.

**पुरुष : (पत्र वाचणं तसंच ठेवून)** उद्या येणार ? हॅं ! तुला काय ठाऊक...

**नोकर :** सर्वच बाईसाहेब आज तिथेच रहाणार, मोटर परत पाठविली, मला सांगितलं...

**पुरुष : (येरझारा घालत अधीरतेनं)** आणि जेवण, घर...आणि माझी गाडी मिलखीरामच्या पंपावर पडली आहे ती ?

**(नोकर पुन्हा सलाम करतो आणि चालू लागतो. थोडा वेळ चालल्यावर म्हणतो–)**

**नोकर :** साहेब, आपला कुत्रा मोठा ऐटबाज आहे. इंग्लिश आहे का ?

**पुरुष : (निराश होऊन)** शेवटी...शेवटी...शेवटी, ...बरं...

**तरुण :** (उठत) चला, हॉटेलमध्ये जाऊ, आपल्या फॅक्टरीत तर आज 'स्ट्राईक' आहे.

**पुरुष :** अरे पण माझी कार मिलखीरामच्या पंपावर पडली आहे...

(पुन्हा पत्र बत्तीजवळ नेऊन वाचतो.)

(पडदा पडतो.)

## पात्रे

मनीषा

विवेक

दीप्ती

विश्वजीत

करुणा

अशोक

शरद

इंदू

(एका मध्यमवर्गीय कुटुंबाचे घर. त्यात नवं आणि जुनं बळजबरीने एकत्र नांदत असल्याचं दिसून येतं. एक आधुनिक ढंगाची खोली आहे. त्यात एका बाजूला जेवणासाठी टेबल-खुर्ची ठेवलेली आहे, दुसऱ्या बाजूला सोफासेट वगैरे – मध्ये एक पडदा आहे. तो बहुधा बाजूला सारलेलाच असतो. बैठकोच्या भागानं अपेक्षेपेक्षा जास्त जागा व्यापलेली दिसून येते. भोजन घरातील टेबल नवीन आहे, परंतु खुर्च्या मात्र सोईसाठी दोन्ही ठिकाणी वापरल्या जातात. म्हणून त्या एकसारख्या राहिलेल्या नाहीत–काही मळलेल्या तर काही तुटलेल्या तर काहींवर कुडतं किंवा बुशशर्ट ठेवलेला. डाव्या बाजूला कपाट आहे. त्यात खाण्यापिण्याचे डबे आणि दुसऱ्या काही वस्तू दिसून येतात. डायनिंग रूममधील सोफा जरी जुना नसला तरी त्यावरील कव्हर मळलेलं आहे. तीच गोष्ट मोडे आणि टी–पॉय यांच्या बाबतीत ! मधल्या टीपॉयवर दोन साप्ताहिके पडली आहेत. आत जायला दोन दरवाजे आहेत. एक समोरून आणि दुसरा उजवीकडून. बाहेरून यायचा मार्ग बैठकोच्या खोलीतून उजव्या बाजूने आहे. डाव्या बाजूला कोपऱ्यात एक कपाट आहे. त्यात पुस्तके भरली आहेत. परंतु वरच्या खणात काही खेळणी देखील आहेत. ह्या बाजूला टेबलावर इतर वस्तूंबरोबर टेलिफोनदेखील ठेवलेला आहे. पडदा वर उचलला गेल्यावर हळूहळू सर्वांवर प्रकाश पडतो-व्यवस्थितपणाच्या प्रयत्नांवर आणि बेपर्वाईवर. यावेळी तेथे कोणीही नाही. फक्त वाऱ्याने उडून काही कागद इकडे–तिकडे पसरतात. आतून दारूकामाचे आवाज ऐकू येतात. मुलांचा गोंगाट कमीअधिक होत असतो. काही वेळानंतर २५–२६ वर्षाची एक तरुणी आतून येते. तिचं नाव आहे मनीषा. दिसायला सुंदर आहे. सुंदर आणि आकर्षक साडी नेसली आहे. अंबाडाही तसाच. साडी, सॅंडल, बॅग आणि लिपस्टिक या सर्वांमध्ये मॅचिंग आहे. या क्षणाला ती अत्यंत गंभीर वाटते आहे. इकडे–तिकडे पहाते आहे. दरवाजाजवळ येऊन थांबते आहे आणि म्हणते आहे–)

मनीषा : यावेळी कोणी नाही. मी जाऊ शकते. आपण विचाराल 'मी कोण ?' 'चालले कुठे ?' हाच तर या घराचा प्रश्न आहे आणि तोच आपणही विचारू इच्छिता ! आता मला सांगा माझं हित–अहित कशात आहे हे न समजायला, स्वत:च्या इच्छेनुसार कुठं जाऊ–येऊ न शकायला, जे योग्य वाटेल ते न करायला मी का इतकी

मूर्ख आहे ? कसं शक्य आहे हे ? माझा मार्ग मीच शोधून काढणार. आपल्याला तो अधिकार मी देऊ शकणार नाही, कधीही नाही. मी चालले. जिथं मला जायचं आहे तिथं चालले.

**(ती झटकन तिथून निघून जाते–क्षणभर पार्श्वसंगीताचा आवाज मोठा होतो. नंतर उडती धून वाजवीत एक तरुण बाहेरून येतो–वय वर्षं २४, नाव विवेक. अत्याधुनिक पद्धतीचे लांब केस, कल्ले, दाढी, तंग पॅंट आणि पट्टयापट्टयाचा शर्ट, तोंडावर निर्भयतेचे आणि उपेक्षेचे संमिश्र भाव–सरळ जेवणाच्या टेबलाकडे जाऊन काही शोधतो. एक लिफाफा उचलून पहातो आणि हसतो. तो उघडत म्हणतो...)**

**विवेक** : शेवटी त्यांचे उत्तर आलं तर. हे देवा, काय लिहिळं आहे बरं त्यांनी ? **(अधीर होऊन लिफाफा फाडतो आणि पत्र बाहेर काढतो. वाचतो. दुसऱ्याचवेळी त्याचा चेहरा पडतो.)** आपल्या अर्जाचा आम्ही गंभीरपणे विचार केला पण आपल्या प्रतिभेस साजेसं असं कोणतंही काम तूर्त तरी आमच्याकडे नाही. हे कळविण्यास आम्हाला अत्यंत खेद वाटत आहे. सदैव आपल्या सहकार्याची अपेक्षा बाळगणारे... **(एकदम किंचाळत)** खोटारडे, पाजी साले ! म्हणे आपल्या प्रतिभेला साजेसं ! खरोखरच माझ्यात अशी काही प्रतिभा आहे काय ? आणि जर असेल तर त्याचा उपयोग का नाही होत ? **(दीर्घ सुस्कारा टाकत पत्र फेकून देतो आणि प्रेक्षकांकडे पहातो.)** माझ्यात प्रतिभा असेलच तर ती फक्त अर्ज लिहिण्याची. आजचा तरुण अर्ज लिहिता लिहिता अगदी मशीन बनत चालला आहे. **(परत जोराने)** पण मी नाही मशिन बनणार. मी नाही लिहिणार अर्ज. मी... **(भराभर बरेचसे कागद उचलून इकडेतिकडे पसरून टाकतो. त्याच वेळी आतून एक युवती तिथे प्रवेश करते. तिचं वय बहुतेक २० वर्षे असेल. मलमलचा कुडता, त्यावर अर्ध्या बाह्यांचा लाल स्वेटर, पिवळी बेलबॉटम पायात तोरड्या, मधोमध विभागलेले चेहरा झाकून टाकणारे मोकळे सोडलेले केस. त्यामधून दोन मोठमोठे डोळे चमकताहेत. हातात कंगवा घेऊन ती केस दोन्ही बाजूला विखरून टाकते आहे आणि हंसते आहे )**

**दीप्ती** : **(प्रेक्षकांना)** बघितलंत ! विवेकभैय्या नेहमीप्रमाणेच अर्जाला कंटाळून गेला आहे. **(विवेकजवळ येऊन खांद्यांवर हात ठेवते)** ह्या, विवेकभैया, तुझं हे अर्ज करणं संपणार तरी कधी ? पपानी तुला कुठे जायला सांगितलं होतं हे माहीत आहे ना ?

**विवेक** : पपांनी तुला अशाप्रकारे केस सोडायला सांगितलं नव्हतं एवढं फक्त मला माहित आहे.

**दीप्ती** : माझी नको काळजी करायला ! पपानी तुला कुठंतरी जायला सांगितलं होतं.

**विवेक** : तुलाच सांगितलं असेल कुठंतरी जायला.

**दीप्ती** : मला नव्हे, तुला.

**विवेक** : (जोरात उठून) तुला. तुलाच.

**दीप्ती** : (चिडून) तुला, तुलाच. बरं बाबा! तुलाही सांगितलं नव्हतं आणि मलाही सांगितलं नव्हतं, आम्हाला सांगितलं होतं.

**विवेक** : आम्हाला सांगितलं होतं, ठीक आहे पण विचार करण्यासारखा मुद्दा म्हणजे आपण त्यांचं म्हणणं खरोखरच ऐकलं पाहिजे का ?

**दीप्ती** : मूर्ख आहेस ! ही तर आपल्या फायद्याची गोष्ट आहे. आज दिवाळी आहे. जीजी, दादा, वहिनी—सगळे दिवाळी साजरी करायला जाणार आहेत.आपल्यालाही कदाचित आमंत्रण मिळेल.

**विवेक** : (चुटकी वाजवून) हं. आता समजलं. सगळी माणसं तुझी तारीफ का करतात ते. चल, आपण शरददादा आणि इंदूजीजीकडे जाऊ या. त्याचवेळी अनायासे एकेक अर्जही त्यांना देता येईल.

**दीप्ती** : अर्ज. अर्ज ! मी तुला हे सुचवलं याबद्दल माझे आभार मान पहिले !

**विवेक** : (उपहासाने हात जोडून) आपला अतिशय आभारी आहे. म्हणशील तर एक आभाराचा अर्जही तुला सादर करतो. (दोघे मोठ्याने हसतात )

**दीप्ती** : तर तर आता चल ! मामा आणि पपा येण्यापूर्वी निघू या. नाहीतर आदर्शावर आणखीन एक लेक्चर मिळेल.

**विवेक** : चल, चल (दोघेही हसत हसत जातात. इतक्यात कुटुंबप्रमुख विश्वजीत बाहेरून प्रवेश करतात. त्यांचे वय ६०-७० च्या दरम्यान आहे. सैल कुडता, घट्ट विजार, डोक्यावर गांधी टोपी, चेहऱ्यावर हताश भाव इकडे तिकडे पहात आत जातात. क्षणभराने बाहेर येतात. खोलीवर नजर टाकतात आणि प्रेक्षकांना सांगतात.)

**विश्वजीत** : बघितलत. तोच सामसूम, तेच अर्जांचे ढीग, तोच अव्यवस्थितपणा. जसं काही घरात कोणी माणसं रहात नसून भुतंच राहत असावीत. आज दिवाळीचा दिवस आहे पण कुणाला खरं वाटेल का हे पाहिल्यावर ? सगळं कसं उदास ?

तीही घरात नाही. गेली असेल शेजारी गप्पा ठोकायला. आणि हा विवेक. परत अर्ज फाडून सगळीकडे विस्कटून गेलाय. हे रद्दीच्या टोपलीत टाकायचही त्याच्या डोक्यात नसेल. (उचलून रद्दीच्या टोपलीत टाकतात) काही काम करील तर निदान मला तरी मदत होईल. (प्रेक्षकांकडे पाहून) मदत तरी कसली झाली असती म्हणा ! मोठेसुद्धा मिळवतातच ना ? पण आता आमचा संसर्गही नको त्यांना ! दिवस कसे आले आहेत पहा ! आमचेही दिवस होते. किती प्रेम. किती जिव्हाळा, किती एकोपा ! एकजण कमवायचा आणि दहाजण खायचे. एकमेकांच्या जास्तीतजास्त जवळ येण्याचा

प्रत्येकजण प्रयत्न करीत असे. आता तसं राहिलं नाही. प्रत्येकजण दुसऱ्यापासून वेगळा व्हायला पहातो आहे. (**बोलत असतानाच अर्ज आणि पेपर इकडे-तिकडे करतात. परत आत जाऊन डब्यातून काही काढतात आणि खात खात एक पेपर घेऊन सोफ्यावर बसतात.**) परमेश्वरा ! कुणीतरी येईपर्यंत वाट पहात बसणं भागच आहे मला. आपल्याच घरात आपल्याच लोकांची मार्गप्रतीक्षा ! (**निराशेने उपहासगर्भ हसणे. प्रकाश मंद होत जातो. एक क्षणभर अंधार पसरतो. परत प्रकाश पडतो. विश्वजीत तसेच बसून 'भवर इंडिया' वाचण्यात गुंग आहे. अशावेळी आतून गृहस्वामिनी करुणा हाक मारत येते. तिने ५५ वर्षे ओलांडली आहेत. केसांची गुंतवण झालेली, साधी पण स्वच्छ साडी नेसली आहे. चाकोळी आकर्षक आहे. पण अतिशय अस्वस्थ असल्याने सगळ्या व्यक्तिमत्वावर एक प्रकारची रुक्षपणाची छाप उमटली आहे.**)

**करुणा** : मी विचारते, पूजा कधी होणार ? वाट पाहून पाहून कंटाळून गेले अगदी !

**विश्वजीत** : (**एकदम डोके वर करून**) काय म्हणालीस ? हं, पूजा होय ? जरा आणखीन थोडा वेळ थांब. येतीलच सगळे.

**करुणा** : मी आता आणखी नाही थांबायची. तीन तास झाले तुम्ही मला हेच सांगताहात. मी सांगते, कुणीच येणार नाही.

**विश्वजीत** : कुणीच येणार नाही ? असं कसं होईल ? घरचीच माणसं नसतील तर त्या पूजेला अर्थच काय उरणार ? सर्वांनी एकत्र बसण्याची हीच तर संधी असते.

**करुणा** : भूतकाळात बोलताहात तुम्ही 'एकत्र बसत होतो' असं म्हणा फार तर ! आता कुणी बसणार नाही. वेळ आहे कुठं कुणाला ?

**विश्वजीत** : (**उद्विग्न होऊन**) वेळ ? लहानपणापासून मी ५०-६० लोकांमध्ये बसून पूजा केली आहे. भटजीचं ते मोठमोठ्याने पूजा सांगणं अजूनही माझ्या लक्षात आहे. मला सगळं आठवतं – मुलांचा उत्साही आरडाओरडा, तरुणांच्या गप्पाटप्पा, मोठ्यांच्या आणि म्हाताऱ्यांच्या एकमेकांत चाललेल्या सुखदुःखाच्या गोष्टी – त्यानंतर सर्वांचं ते आदरानं मस्तकावर टोपी नाहीतर रुमाल घालून टिळा लावून घेणं, आणि ज्यावेळी आई हातात लाडवांची मोठी थाळी घेऊन सर्वांना प्रसाद वाटत फिरे त्यावेळी तिच्या चेहऱ्यावर किती अपूर्व तेज दिसे. जशी काय भारतमाताच !

(**बोलता बोलताच दूर कुठेतरी हरवून बसतात.**)

**करुणा** : तुम्हाला सांगून ठेवते. भारतमातेची काळजी करण्यापेक्षा आपल्या मुलांची काळजी करा. एकजण तरी तुमच्या कह्यात आहे काय ? एक एक म्हणता म्हणता सगळेच जाताहेत.

**विश्वजीत** : कृपा करून तू आत जा. मी परत एकदा दारदला बघून येतो. विवेक

अशोककडे गेला आहे आणि इंदूकडे दीप्तीला पाठवलं आहे.

**करुणा** : आणि मनीषाला कुठे पाठवलंत ?

**विश्वजीत** : तिला मी कुठंच पाठवलेलं नाही. आणि मी सांगितलं तरी ती जाणार आहे थोडीच ? गेली असेल कुठंतरी मन मानेल तिथं.

**करुणा** : म्हणूनच तर म्हणते मी की आपली मुलं सांभाळता येत नाहीत तर भारतमातेच्या गोष्टी हव्यात कशाला ? पूजा आहे तेव्हा सगळे घरी येतील अशी आशा बाळगून आहात. पण मी सांगते, कुणीही येणार नाहीत. तुमची स्वतःची मुलंसुद्धा येणार नाहीत.

**विश्वजीत** : सगळे येतील. नेहमीच येतात तर आज का नाही येणार ?

**करुणा** : असं ? मागच्या साली कोणकोण आलं होतं ?

**विश्वजीत** : गेल्या वर्षी होय, का आले नव्हते बरं ? हं, कोणकोण आलं होतं बरं ?

**करुणा** : कशाला उगाच आठवण्याचं नाटक करता ? चार भावातला अशोक तेवढा आला होता, आणि तोही एकटाच ! यावेळी तर तुमची स्वतःची मुलंबाळंही येणार नाहीत.

**विश्वजीत** : का नाही येणार ? (**बाहेरच्या बाजूला पाहून हसतो.**) ते बघ येताहेत !

**करुणा** : (**तिकडे बघत**) हे तर दीप्ती आणि विवेक आहेत. नेहमीप्रमाणेच बघा कशी भांडत येताहेत दोघंही. आणि हो, विवेकला सांगून ठेवा. म्हणावं, तू तुझे अर्ज व्यवस्थित ठेवत जा. त्यांच्या आधारावर तो जगत असेल पण मी ते सांभाळू शकत नाही. हे काय घर आहे की अर्जघर ! बरं, मी जाते. पूजा करायची असेल तर लगेच या, सांगून ठेवते. (**जाते. विवेक आणि दीप्ती भांडत-कांडत येतात.**)

**विवेक** : कंगवा केस नीट विंचरण्यासाठी असतो. केस विस्कटण्यासाठी नसतो, समजलं ?

**दीप्ती** : ठाऊक आहे मला सगळं.

**विवेक** : काय काय काय ठाऊक आहे ?

**दीप्ती** : हेच की तुम्ही सगळे जुनाटपद्धतीची भाषा वापरता.

**विवेक** : 'नीट विंचरणे' ही जुनाट भाषा काय ?

**दीप्ती** : नाही तर दुसरं काय ? हा शांपू वापर, ते तेल घाल, असा अंबाडा घाल, तसा घालू नको, बंगाली अंबाडा, 'पिरनिल' अंबाडा, अजंठाशैलीचा अंबाडा, दक्षिण-पद्धतीची वेणी, 'पॉनी टेल', 'बॉब हेयर', अरे बाबा—आम्हाला जसं हवं तसं आम्ही करणार. तू का मध्ये कडमडतोस ? आम्हाला असंच आवडतं. (**बोलत बोलत**

**विश्वजीतजवळ येतात.)**

**विश्वजीत** : आला तुम्ही दोघं. मी म्हणतो, तुम्ही दोघं नुसते भांडतच राहणार की काय आयुष्यभर ? काही कराल की नाही ? हे बघ विवेक, मला सांग. हे घर आहे की अर्जघर ? सगळी खोली तुझ्या अर्धवट लिहिलेल्या आणि अर्धवट फाडलेल्या अर्जांनी कशी भरून गेली आहे !

**दीप्ती** : पहा ना पपा, हा विवेकभैय्या स्वतः एवढी घाण करतो आणि मला उपदेश करतो केस विंचरण्याचा !

**विवेक** : पपा, तुम्हीच सांगा बरं. कंगवा केस विंचरण्यासाठी असतो की केस विस्कटण्यासाठी ?

**दीप्ती** : आजकाल विस्कटवण्यालाच विंचरणं म्हणतात.

**विश्वजीत** : गप्प बसा पाहू. मी तुम्हाला कुठं पाठवलं होतं ?

**दीप्ती** : इंदूजीजीकडे. ती आणि जिजाजी दोघंही दिवाळीची रात्र साजरी करायला जाणार आहेत. पूजेला येणार नाहीत हे आलंच ओघानं.

**विश्वजीत** : येणार नाहीत ? का ? मनीषा कुठं गेली ?

**दीप्ती** : ती कुठं आहे ते मला काय माहीत ? तीही एखाद्या मित्राबरोबर गेली असेल दिवाळीची रात्र साजरी करायला.

**विश्वजीत** : या सगळ्यांना झालंय तरी काय ? प्रत्येकजण वेगवेगळा ! फक्त स्वतःसाठी जगू पहातोय. कुणालाच दुसऱ्याची काळजी राहिली नाही. आमच्यावेळी मोठ्यांच्या परवानगीखेरीज काही करण्याची कुणाची छाती नव्हती.

**विवेक** : पपा, तुमचा 'जमाना' तर कधीच संपलाय आता भूतकाळातील धडपड आठवण्यापेक्षा चालू परिस्थितीला अनुसरून कसं रहाता येईल ते तेवढ पाहिलं पाहिजे.

**दीप्ती** : पण काही लोक असे असतात की त्यांना भूतकाळातच राहणं जास्त आवडतं.

**विश्वजीत** : पुरे झाली तुमची ही पुस्तकी भाषा ! आम्हालाही काही कळतं. जे निघून जातं ते म्हणजेच इतिहास ना ? आणि तोच आपला असतो. त्याला विसरून वर्तमानकाळाचं रक्षण कसं करता येईल ? पण मला सांगा तुम्ही अजूनपर्यंत गेला होता तरी कुठं ?

**विवेक** : अशोककाकांच्या घरी गेलो होतो. पूजा झाल्यावर ते येऊ शकतील. आणि पूजेला तर बराच वेळ होता. दीपकभैय्या दिवाळीच्या शुभेच्छा देण्यासाठी मुख्य-मंत्र्यांच्या घरी गेले होते.

**दीप्ती** : पपा, जेव्हापासून दीपकभैय्यानं आपला पक्ष सोडून मुख्यमंत्र्यांचा पक्ष

धरला आहे ना, तेव्हापासूनच तो मंत्री बनणार असल्याचं सर्वत्र बोललं जात आहे. कदाचित आज रात्रीच घोषणा होईल !

**विवेक** : तसं झालं तर छानच होईल. आतापर्यंत मी शंभर अर्ज केलेलेच आहेत. आता १०१ वा त्याला देईन. यावेळी माझं काम नक्कीच होईल.

**विश्वजीत** : थू, तुमच्या ह्या असल्या कामावर ! चांगल्या वाईट गोष्टींचा काही विचार ? गांधीजी म्हणत असत...

**विवेक** : गांधीजी जे काही म्हणत असत ना, ते सगळं लिहून आपल्या खोलीत टांगून ठेवलंच आहे की ! मोठ्या लोकांचं म्हणणं हे फक्त टांगून ठेवण्यासाठीच असतं. हे पहा, हे टांगून ठेवले आहेत – गांधीजींनी सांगितलेले भारतीय समाजातील दुर्गुण ! 'तत्त्वहीन राजकारण', 'श्रमाशिवाय धनार्जन', 'अंतरात्म्याखेरीज आनंद', 'चारित्र्यहीन ज्ञान', 'अनीतीचा व्यापार', 'मानवताशून्य विज्ञान' आणि 'त्यागाखेरीज पूजा' !

**(बोलत असतांना त्या-त्या पाटीवर तेवढा प्रकाश पडतो.)**

**दीप्ती** : हे सारं बूर्झ्वा पद्धतीचं झालं. त्याचं युग संपलं आता. आज राजकारणाचा तत्त्वांशी, धनाचा श्रमांशी, आनंदाचा आत्म्याशी, ज्ञानाचा चारित्र्याशी, व्यापाराचा नीतीशी, विज्ञानाचा मानवतेशी आणि पूजेचा त्यागाशी काहीही संबंध उरलेला नाही. (**दोघेही हसतात**).

**विश्वजीत** : (किंचाळून) गप्प बस. युग संपतात पण नीती नेहमीच जिवंत राहते.

**विवेक** : पण तिचा अर्थ बदलत जातो, पप्पा ! दीप्तीच्या दृष्टीनं विचरणं. याचा अर्थ नाही का बदलला आहे ?

**विश्वजीत** : तुम्हा लोकांचं बोलणं मला कळेनासं झालं आहे.

**विवेक** : आणि पप्पा – तुमचं बोलणं आम्हाला समजत नाही पण भाषेला स्वतंत्र सत्ता अशी कुठं आहे ? ती म्हणजे आमच्या मान्यतेचं प्रतीक आहे. तुम्ही म्हणता असं झालं पाहिजे आणि आम्ही म्हणतो असं होत आहे.

**विश्वजीत** : बंद करा हा वाद शरद कुठं आहे ? अजून तो आला कसा नाही ?

**दीप्ती** : शरददादा वहिनीबरोबर दिवाळी साजरी करायला हॉटेलमध्ये गेला आहे. पपा, आपण चटकन पूजा करून घ्या. आम्हालाही तिकडे जायचं आहे.

**विश्वजीत** : काही नको तुम्ही तिथं जायला.

**विवेक** : का ?

**विश्वजीत** : मी सांगतो म्हणून. मी तुमचा बाप आहे ना.

**विवेक** : तुम्ही आमचे वडील आहात यात शंकाच नाही. परंतु तेवढ्यावरून तुम्ही आम्हाला अडवू शकणार नाही पपा. तुम्ही आम्हाला पैसे देता म्हणूनच असे

अवलंबला आहात. इंदू, मनीषा, शरद -सर्वांचे तुम्ही वडील आहात. पण त्यांना आपण अडवू शकाल का तुम्ही ? मी तुमच्यावर अवलंबून असलो तरी तुमचा गुलाम नाही.

**विश्वजीत** : (थरथरत) तुला... तुला जराही लाज नाही. कुणापुढं काय बोलतो आहेस हे तरी तुला समजतंय का ?

**विवेक** : खरं तेच बोलतोय. जे झालं पाहिजे ते नाही सांगत. दीपक भैय्या मंत्री होऊं दे.

**विश्वजीत** : दीपक, दीपक, दीपक. त्यानं जे काही केलं ते अनैतिक आहे. तुला मी अनैतिकतेच्या मार्गानं जाऊ देणार नाही.

**विवेक** : परत तीच जुनाट विचारसरणी. पपा ! आयुष्यभर नैतिकतेचे गुणगान करण्यापलीकडं दुसरं काही घडलं आहे का तुमच्या हातून ? 'यश' हेच जीवनाचं ध्येय समजणारे लोक तुमच्यापेक्षा खूपच बरे !

**विश्वजीत** : आता हद्दच झाली. तत्त्वहीन अशा त्या पक्ष बदलणाऱ्याशी माझी तुलना करतोस ? तू त्याला नोकरीसाठी विचारणार आहेस ?

**विवेक** : दिवसभर बसून पेपरांतल्या जाहिराती पहायच्या. त्यानंतर अर्ज करायचे. यापेक्षा दीपकभैय्याकडे जाणं जास्त चांगल. काम होत असेल तर कुणीही का असेना त्याच्याकडे जाण्यात वाईट काय आहे ? (घाईघाईत करुणा येते)

**करुणा** : चर्चा, चर्चा आणि चर्चा, मी किती वेळ वाट बघायची ? तुम्ही लोक येणार आहात की नाही ? जळळी मेली यांची ती चर्चा.

**दीप्ती** : हं, चला पपा, लवकर पूजा आटपा.

**विवेक** : पूजेला कितीसा वेळ लागणार ? पाच मिनिटं. भटजी तर आलेलेच नाहीत. तुम्ही तीन वेळा गायत्री मंत्राचा जप केलात की बस्स.

**दीप्ती** : गायत्री मंत्रच म्हणायचा असेल तर तो इथेही म्हणता येईल. मग पूजा करण्याची गरजच काय ?

**करुणा** : पूजेची जरुरी आहेच. पूजा नेहमीच होत आलेली आहे. वर्षातून एकदा लक्ष्मी सर्वांच्या घरी येते.

**विवेक** : (उपहासाने) तर मग मी आज एक अर्ज लिहून लक्ष्मीलाच का देऊ नये ?

**विश्वजीत** : चूप, देवदेवतांचीही थट्टा करतोस ? म्हणूनच तर गांधीजींनी म्हटलं आहे की ज्ञानाबरोबरच चारित्र्याची आवश्यकता आहे.

**विवेक** : चारित्र्य, चारित्र्य, चारित्र्य ! (जोराने) आपण चारित्र्यसंपन्न बनून आम्हाला काय दिलंत, पपा ? आपल्या मार्गाने जाऊन मी फक्त अर्ज करणंच शिकलो आहे. आणि ज्याने आपला मार्ग सोडला तो यशस्वी झाला. विमलदादा कॅनडात चैन करताहेत. शरददादा आपलं जीवन मजेत जगताहेत. इंदूजीजीसुद्धा आपलं आयुष्य

सुखात घालवते आहे. आणि ज्या दीपकभैय्याला आपण चारित्र्यहीन म्हणता आहात तो मंत्री होणार आहे. मग मला आपलं हे चारित्र्य घेऊन काय चाटायचं आहे ?

**दीप्ती :** बिछाना हवा हे जिथं उघड आहे तिथ पांघरुणाला गुलामगिरी कशाला म्हणायची ? **(हसू येत असतं पण सर्वांच्या रोखलेल्या नजरांमुळे थांबते.)**

**करुणा :** मी विचारतेय, तुम्ही येणार आहात की नाही ?

**दीप्ती :** **(श्वास ओढून)** चल बाबा.

**विश्वजीत :** कसे हे दिवस पहावे लागताहेत ! ४०–४० लोकांच्या मेळाव्यात बसून तासतासभर षोडषोपचारे पूजा केली आहे. सगळं संपलं ! आता उरली ती फक्त दोन असंतुष्ट मुलं आणि गायत्रीमंत्र !

**करुणा :** मी म्हणते, आज या अशावेळी मनीषा कुठं निघून गेली ?

**दीप्ती :** मम्मी काळजी करू नकोस. मनीषादीदी गेली असेल कुणाबरोबर तरी दिवाळी साजरी करायला.

**करुणा :** तिचे आम्ही कुणीच नाही वाटतं ? घराशी तरी काही संबंध ? तो 'कुणी' तिचा सर्वस्व झाला ! सहनशक्तीलासुद्धा काही मर्यादा असते.

**विवेक :** सहन करणं हे अमर्याद आहे मनीषा आज आपल्यावर अवलंबून थोडीच आहे ?

**विश्वजीत :** अवलंबून नसेल, पण या घरची आहे ना ? आम्ही काय आपल्या वडिलावर थोडेच अवलंबून होतो ? परंतु त्यांच्या परवानगीखेरीज बाहेर पाऊल टाकायची आमची हिम्मत नव्हती.

**दीप्ती :** पपा, त्यावेळी लोक चंद्रावर पोचले नव्हते किंवा टेरेलीनही वापरत नव्हते. त्यावेळी चुइंगम् कुठला असायला ? हे कॉम्प्यूटरचं युग आहे, पपा, 'कॉम्प्युटर' माणसापेक्षा अधिक कुशलतेनं काम करतो.

**(एकदम हाका मारत अशोक बाहेरून प्रवेश करतो. वय ६० वर्षे असेल. विश्वजीतसारखेच कपडे. चेहरा भोळाभाबडा आहे.)**

**अशोक :** भैय्या, भय्या कुठं आहेत ? अभिनंदन ! आपला दीपक मंत्री झाला. **(सर्व एकदम आनंदित होतात.)**

**विवेक :** खरंच काका ?

**दीप्ती :** मी आताच जाऊन भैय्याचं अभिनंदन करते. खरं म्हणजे मंत्री बनला हे बुद्धूपणच आहे. तरीही त्यानं काहीतरी करून दाखवलंय.

**करुणा :** मला किती आनंद झालाय म्हणून सांगू ? दिवसभर चर्चा करणं, अर्ज लिहिणं आणि हिप्पी बनणं. यापेक्षा हे खूप बरं.

**विश्वजीत** : त्यापेक्षा खूपच बरं. मलाही आनंद झालाय. तो कुठं आहे ? त्यानं इथं यायला हवं होतं.

**अशोक** : आता तर तो घरी येणारच नाही. मी एकट्यानंच पूजा केली, अगदी एकट्यानं. (**एकदम दीप्तीकडे पाहून**) अरे, मी पाहिलंच नाही. दीप्ती, अग तू तर एकदम हिप्पीणच दिसते आहेस. मलमलचा पांढरा कुरता, अर्ध्या बाह्यांचा लाल स्वेटर, काळा तंग पायजमा, पायात साखळ्या, कानात मोठ्या रिंगा. आणि हे विस्कटलेले केस !

**विवेक** : काका, आपण ज्याला विस्कटणं म्हणता ना, त्यालाच यांच्या भाषेत 'विंचरणं' असं म्हणतात आणि हा तंग पायजमा नव्हे, 'बेलबॉटम' आहे. पण, जाऊ देत या गोष्टी. मी आताच १०१ वा अर्ज लिहून तयार ठेवला आहे. तो आपण आपल्या शिफारसीसह दीपकभैय्याला द्या. आपल्याला माहीतच आहे की, आजकाल शिफारस नसेल तर काम होत नाही. यावेळी मला नोकरी मिळालीच पाहिजे.

**अशोक** : नोकरी मिळेल. जरूर मिळेल. आता मिळणार नाही तर कधी मिळणार ? पण असा आरडाओरडा करू नकोस काम करण्याचीही पद्धत असते एक.

**विश्वजीत** : तेच तर मी सांगतो. पण प्रत्येकवेळी मला ते बुझर्वा म्हणून गप्प बसवतात...

**करुणा** : पण मी म्हणते, तुम्हाला मनीषाची आठवणसुद्धा कशी नाही ? ती अजूनही आलेली नाही. ती इंदूबरोबर गेली असेल तर तिने तशी सूचना द्यायला हवी होती. ही मुलगी म्हणजे तर... (**फोनची घंटा वाजते.**)

**विवेक** : मम्मी, तू बोलायला आणि सूचना द्यायला. (**टेबलाजवळ जाऊन फोन उचलतो.**) हॅलो, विवेक बोलतोय. आपण होय ? कुठून बोलता आहात ? ताईसाहेब, आपल्यासाठी इथे कधीपासून तिष्ठत बसलो आहो बर कुठून ! बोलताहात आणि आवाज एवढा गंभीर का ? काय म्हणलीस, पप्पांना फोन देऊ. म्हणजे तू मला नाही सांगणार ? ठीक आहे. पाहून घेईन. बरं बाई, नाराज होऊ नकोस. लगेच देतो. (**विश्वजीतला**) पपा ! मनीषा आपल्याला बोलवते आहे. (**विश्वजीत जवळ येऊन फोन उचलतात.**)

**विश्वजीत** : हॅलो कोण मनीषाबेटी ? हां, हां. मी विश्वजीत बोलतोय. तू कुठं आहेस ? पूजेसाठी आम्ही तुझी वाट पहातो आहोत. हां, हां, सांग. काय ? (**एकदम चेहरा उतरतो**) काय म्हणालीस ? परत सांग. खरोखर ? तू घरी नाही येणार ? नाही, नाही, हे सगळं खोटं आहे...मी...मी म्हणतो...(**फोन हातातून गळून पडतो. ते धप्पदिशी कोचावर बसतात. पडद्याआड तीव्र संगीत सुरू होतं. सर्व त्यांना घेरून उभे रहातात.**)

**करुणा** : काय झालं ? मनीषा काय म्हणाली ? बोलत का नाही ? माझ्याकडे असे काय पहाता आहात ?

**विश्वजीत** : (जड आवाजात) मनीषानं लग्न केलं.

**करुणा** : लग्नं केलं ? कुणाशी ?

**विश्वजीत** : तुला सगळं माहीत आहे.

**करुणा** : (हरवल्यासारखी) म्हणजे, मनीषानं असदशी लग्न केलं तर ?

**विवेक** : दीदीनं लग्न केलं ! आम्हाला न सांगता ! मी हा चालला.

**दीप्ती** : (उत्साहाने) वा, छान ! छान केलं. दीदी झिंदाबाद. मनीषादीदी झिंदाबाद. मी आता जाऊन दीदीचं अभिनंदन करते.

**अशोक** : गप्प बस. हा असद कोण ?

**करुणा** : लेक्चरर् आहे. ज्या कॉलेजात मनीषा शिकवते तिथंच आहे.

**अशोक** : मनीषा त्याच्याशी लग्न करणार आहे हे तुम्हाला माहीत होतं, वहिनी ?

**करुणा** : हो तिनं आपला निर्णय आम्हाला सांगितला होता. आम्ही खूप समजावलं पण ती मुळीच ऐकायला तयार नव्हती.

**विवेक** : ऐकण्याची काय गरज होती ? तिनं एका माणसाशीच लग्न केलंय. त्याला व्यक्तिमत्व आहे. तो सुंदर, सुदृढ, प्रतिभावान, लाघवी स्वभावाचा आहे आणि भरपूर कमवणारा आहे. एका भारतीयाला आपल्या मुलीसाठी आणखीन काय हवं असतं ?

**दीप्ती** : आणि तो मुसलमान असला तरी नुसता नावाचा ! तसा नमाजसुद्धा पढत नाही. देशाच्या नव्या पिढीनं या भेदभावाच्या भिंती फोडल्या पाहिजेत असं देशाचे नेते सांगत आले आहेत परंतु जेव्हा आम्ही या भिंती पाडायला पहातो त्यावेळी हेच नेते वडील बनून आम्हाला अडवतात. नेता आणि पिता एकाच माणसाचे दोन मुखवटे आहेत हं !

**विश्वजीत** : (जोराने) चूप बसा. तुम्ही दोघं फारच शेफारला आहात !

**अशोक** : काय, तुम्ही अजूनही हा विवाह थांबवू इच्छिता ? दीपकला सांगितलं तर कदाचित काही उपयोग होईल अखेर तो मंत्री आहे ना !

**करुणा** : नाही, आता कांही करण्याची आवश्यकता नाही. ती सज्ञान आहे. शिवाय कमावती आहे.

**विश्वजीत** : हो, आता काही उपयोग नाही त्याचा. मी मनीषाला मुकलो.

**करुणा** : तिलाही अधिकार होता. तिने आपला रस्ता शोधला आहे.

**दीप्ती** : पपा, मला सांगा. आपण पूजा करणार आहात की नाही ?

**विवेक** : का नाही करणार ? प्रत्येक वर्षी करत आलेत. या वर्षीही करतील.

स्वभावच बनला आहे ना तो ? त्याला काय करणार ? पण मी तर गायत्री मंत्राचा शुद्ध उच्चारदेखील विसरलो आहे आणि लक्षात ठेवण्यात काही तथ्यही नाही. निव्वळ ढोंग. जिथं अर्थ नाही तिथं ढोंगालाच भार वहावा लागतो.

विश्वजीत : (किंचाळून) चूप बस.

(पडद्यामागे तीव्र संगीत सुरू होते आणि रंगमंचावर एकदम अंधार पसरतो. परत प्रकाश पडतो त्यावेळी रंगमंचाची अवस्था पहिल्यासारखीच असते. विश्वजीत आणि करुणा कोचावर बसले आहेत. विश्वजीत अतिशय हळू–जसं काही स्वत:शीच बोलत असावेत अशा आवाजात–)

विश्वजीत : कसं आहे हे मन ! सारखी चिंता लागून राहिलीय ! कधी वाटतं, दूर कॅनडात असलेला विमल कसा असेल ? त्याचं काम ठीक चाललं असेन ना ? कधी इंदूबद्दल विचार करतो. तिच्या संसारात सर्व सुखी असतील ना ? लगेच शरदची आठवण येते. तो आपल्या तब्येतीची काळजी घेत असेल ना ? त्याची बायको त्याला पूर्ण सहकार्य देत असेल की नाही ? मनीषावर मी अजूनही नाराज आहे. तिनं 'असद 'शी लग्न करावं असं मला कधीच वाटत नव्हतं. तरीही मला सर्वात तिचीच जास्त काळजी वाटते. त्या नवख्या घरात तिला काय वाटत असेल ? ती दु:खी नसेल ना ? सर्वांनी सुखसमाधानात असावं असं मला वाटतं. माझ्या सर्व मुलांना सुखी पहावं ही माझी इच्छा, अगदी मनापासूनची ! पण मुलांना ही लाचारी वाटते, स्वार्थ वाटतो.

करुणा : बरोबरच आहे त्यांचं. नाहीतरी तुम्ही त्यांच्यासाठी काय केलंत ? प्रेम, आणि पैसा म्हणजे सर्व काही नव्हे. त्यांच्या भवितव्याचा तुम्ही कधी विचार केलात ? आज ते आपआपला मार्ग निवडताहेत तर तुम्हाला ते खटकायला लागलं.

विश्वजीत : त्यांच्या भवितव्याच्या दृष्टीने मी कधी विचारच केला नाही, हे खरं. पण त्यांना त्यांचा मार्ग निवडण्यात तरी मी कुठं अडथळा आणतो आहे ? तो मार्ग खरोखरच चांगला असेल का याचीच मला काळजी वाटते. आता ही दीप्तीच पहा ना. लहान अल्लड मुलगी आहे, अजिबात ऐकत नाही. तिचा पोषाख, तिचं वागणं पाहून मला भीती वाटते. एखादे दिवशी काही गडबड तर करून बसणार नाही ना ? आणि हा विवेक तर. . (अचानक दीप्ती आणि विवेक जोरजोरात भांडत आत येतात.)

दीप्ती : मी कुठं जाते आणि कुठं जात नाही याच्याशी तुला काय करायचं ? तू तुझ्या अर्जांची संख्या लक्षात ठेव म्हणजे झालं.

विवेक : मी पपांना सांगणार की तू सिगरेट ओढतेस.

दीप्ती : सांग.

विवेक : भीती नाही वाटत ?

**दीप्ती :** तुला कारण वाटते नाही का ? तू गुपचूप परदेशी जाण्याचं ठरवलं आहेस ते ? (बोलत–बोलत दोघेही कोचाजवळ येतात.)

**करुणा** : मी म्हणतेय, हे काय चाललंय ? तुम्ही दोघे पहावं तेव्हा भांडत असता. कुठून येताहात तुम्ही ? विवेक, दीपक काय म्हणाला ?

**विवेक** : मी दीपकभैय्याकडे जाणार नाही.

**करुणा** : का जाणार नाहीस ?

**विवेक** : तो नीट बोलत नाही. काकांचं बोलणं ऐकतच नाही. आपली खुर्ची कशी राहील या फक्त एकाच गोष्टीची त्याला काळजी लागली आहे.

**विश्वजीत** : म्हणजे, तुझा १०१ वा अर्जही फुकटच गेला हे का नाही सांगत ?

**विवेक** : जाऊ दे. मी आता अर्जंच करणार नाही.

**करुणा** : तर मग काय करणार ?

**विवेक** : मी विरोधक बनेन. सगळयांचा नाश करणाऱ्यांना मी सहकार्य देईन.

**विश्वजीत** : (उपहासाने) विध्वंस, विद्रोह, क्रांती ! हे शब्द बरे लक्षात ठेवलेत. या शब्दांचे अर्थ तरी माहीत आहेत काय ? क्रांती याचा अर्थ विध्वंस करणं असा नाही. याचा अर्थ आहे नवनिर्माण आणि त्याचं मूळ आहे कर्तव्य. देश आणि समाज याबाबत तुमची काही कर्तव्ये आहेत. त्यांना विसरून तुम्ही क्रांतीचं स्वप्न पाहू शकाल, क्रांती करू शकणार नाही.

**विवेक :** पपा, 'कर्तव्य' या विषयावर तुमची बरीच भाषणं पुष्कळदा ऐकली आहेत. कर्तव्याचा जप करत तुम्ही नेहमी आपला स्वार्थ साधत आला आहात. एकत्र कुटुंबात तो बांधून ठेवलाय. अजूनही तुम्हाला वाटतं की आम्ही तुमच्या कुबड्या बनून रहावं ? पण पप्पा, तो काळ गेला, आता ते शक्य नाही.

**विश्वजीत** : चार पुस्तकं वाचून लागला काय तोंडाला येईल ते बडबडायचं ! कर्तव्याला कुबडी म्हणायला लागलास ? काय रे ?

**विवेक** : कर्तव्याचा जो अर्थ तुम्ही आम्हाला सांगू इच्छिताहात, त्याचाच अर्थ तर कुबडी असा आहे. पण मी कुणाची कुबडी नाही बनणार. तुटेन पण वाकणार नाही, कुणाचा उपदेश ऐकणार नाही. सर्व काही तोडून–मोडून टाकीन. जाळीन...

**दीप्ती** : शाबास, विवेकभैय्या, शाबास ! झिंदाबाद !

**करुणा** : गप्प बस. बसल्या–बसल्या विचार करायचा आणि पुन्हा जोरजोराने भांडायचं याखेरीज काहीच शिल्लक नाही का करण्याजोगं ? कालपर्यंत तर दीपकभैय्याचे गुण गात होते–आज त्याच्याशी बोलायला तयार नाही.

**दीप्ती :** तुला माहीत नाही, मम्मी ! त्याची १५ दिवसांची सत्ता आज संपते आहे. त्याचं सरकार निश्चित कोसळणार आहे.

**विश्वजीत** : खरंच, मी सांगत नव्हतो की हे सरकार अनैतिक...

**विवेक** : अनैतिक, अनैतिक. त्यानी मला नोकरी दिली असती तरीदेखील काय त्यांना अनैतिक म्हणाला असता ?

**विश्वजीत** : मी सांगितलं नव्हतं ?

**विवेक** : पण ते अशोककाका आणि दीपकभैय्या समोर नाही. मी अर्ज दिल्यावरही नाही. आज जो यशस्वी असतो त्याचं सगळंच नैतिक असतं. म्हणूनच मी आता यशस्वी व्हायचं ठरवलं आहे. मी ५ वर्षे जगप्रवासाला चाललो आहे.

**विश्वजीत** : जगप्रवास ? आणि तो कशाकरिता ?

**विवेक** : आजच्या बदलत्या काळात नैतिकता म्हणजे काय ? कर्तव्य आणि हक्क यांची खरीखुरी व्याख्या काय असू शकेल ? आजही पूर्वीपासूनची नीतिमत्ता आणि आयुष्याच्या जीवनमूल्यांची कतव्यांशी सांगड घालता येईल का ? हे प्रश्न मी घरोघर जाऊन जगातील प्रत्येक व्यक्तीला विचारणार आहे. त्यानंतर एक पुस्तक लिहिणार आहे आणि आपल्याच भाषेत सांगायचं तर ईश्वराची इच्छा असेल तर नक्कीच काही करू शकेन

**करुणा** : करायचंच असेल तर या देशात काय तुटवडा आहे ? बाहेर जाऊनच सगळं केलं पाहिजे असं थोडंच आहे ?

**विवेक** : तसं नाही मम्मी ! बाहेर जाऊन बरंच काही करता येतं. आपल्या बिमलभैय्याचंच उदाहरण बघ ना...

**करुणा** : मला तुझ्याशी चर्चा करायची नाही. या सगळ्या गोष्टी समजून घेण्याइतकी बुद्धी मला नाही. परंतु...

**विवेक** : यात समजून घेण्यासारखं आहे काय मम्मी ! मी या घराच्या कोंडवाड्यातून बाहेर जाऊ इच्छितो मेंदूला सुन्न करणारी अशी कोंदट हवा या घरात आहे. मी माझं डोकं सुन्न करू इच्छित नाही. मला वेदनांनी गुदमरायला आवडत नाही. मला त्यातून बाहेर पडायचं आहे–

**विश्वजीत** : हा तुझा अंतिम निर्णय आहे, विवेक ?

**विवेक** : आज वर्तमानकाळाचा प्रत्येक क्षण भूतकाळात जमा होत असताना अंतिम काय आहे हे सांगणंच कठीण आहे पण परवा भल्या पहाटे मी माझ्या या महायात्रेला निघणार आहे

**विश्वजीत** : पण पैसा कुठून आणणार ?

**विवेक** : पप्पा मी ज्या संघटनेबरोबर जातो आहे तिथे एका पैशाचीही आवश्यकता नाही. पैसा हा व्यक्तींमधले संबंध कृत्रिम बनवतो हे नैतिक की अनैतिक असा विचार करायला भाग पाडतो. यासाठीच तुम्ही काहीही करायचं नाही. एवढंच काय,

मग्मी तू रडायचंही नाही. बरं, मी कपडे बदलून मनीषादीदीला भेटून येतो. ते लोकही कॅनडाला जाण्याच्या प्रयत्नात आहेत. (आत जातो.)

**विश्वजीत** : जा, सगळे जा ! मी काहीही करू शकत नाही. फक्त सर्वांना जाताना पाहू शकतो.

**दीप्ती** : त्यांना जाताना पाहायचं तुम्हाला दुःख होतंय पप्पा ? तुम्हाला हलकं-हलकं नाही वाटत ? चला, आपल्या डोक्यावरचं एक ओझं कमी झालं असं नाही वाटत तुम्हाला ?

**करुणा** : (उठत) मी म्हणते, आता हे थांबवणार की नाही ? तुम्हाला जेवायचं आहे की नाही ? चुलीकडेच कितीवेळ बसून राहू ?

**दीप्ती** : (हसत) तुला बसायाला आवडतं म्हणून तू बसून राहतेस. यालाच तू कर्तव्य आणि प्रेम म्हणतेस. आमच्या मते ही निव्वळ एक सवय आहे. याला लाचारी-देखील म्हणता येईल.

**करुणा** : तुझी ही मतं राहू देत. यामुळेच तर मनं तुटली गेली आहेत. पहावं तेव्हा भांडणं, चर्चा ! तुमच्या मनाला वाटेल तसे वागा. मी आता आणखी वाट पहात बसणार नाही. (आत जाते)

**दीप्ती** : वाट पहात बसणार नाही ? वाट पाहणं हेच तर तुझ्या नशीवात आहे. हे बघ, काकाही आले. (अशोकचा प्रवेश) या काका.

**विश्वजीत** : ये अशोक, बस.

**अशोक** : विवेक, जगप्रवासाला निघतोय, असं दीपक म्हणत होता.

**विश्वजीत** : मीही ऐकलं आहे ते.

**अशोक** : अडवणार नाहीस का ?

**विश्वजीत** : यापूर्वी कुणाला अडवू शकलोय ते त्याला अडवणार ? त्याना जातांना पाहणं एवढंच माझ्या नशिबात आहे. माझ्याच काय, सर्वांच्याच. तुझं दीपकपुढं काही चाललं का ?

**अशोक** : आजकाल कोण कुणाचं ऐकतो ? त्याला तरी कशाला दोष द्यायचा म्हणा ? त्याच्याही वर बरेच लोक आहेत. आणि जो सर्वात मुख्य आहे तोदेखील शिफारस करतो आहे. आता तर त्याचं सरकार गडगडलं आहे म्हणा.

**विश्वजीत** : काय म्हणता काय ? गडगडलं ?

**अशोक** : हो, सरकारचे काही लोक विरोधकांना जाऊन मिळाले. दीपक पण निराश होऊन परत आला. त्याला त्यांच्याबद्दल केवढी खात्री ! देशासाठी ते काही करतील...

**विश्वजीत :** (**एकदम हसत**) देशाचं नाव कशाला घेतोस ? हल्ली सगळेच देशाच्या दुःखाच्या नावावर हौतात्म्याचा जाम तोंडाला लावू लागले आहेत.

**दीप्ती :** (**अचानक उत्तेजित होऊन**) हे सगळं खोटं आहे देश आहेच कुठं ? देशाच्या आत आणखी एक देश निर्माण करून बसलोत आपण या आतल्या देशाचं नाव आहे स्वार्थ ! प्रांत, प्रदेश, धर्म आणि जाती अशा अनेक रूपांनी तो प्रगट होत असतो. वर्तमानपत्रात भ्रष्टाचाराच्या गोष्टी लिहिल्या जातात, बेवारशी धनाच्या गोष्टी छापल्या जातात. उघड-उघड गुंडगिरीच्या कथा लिहिल्या जातात खोटया दिलाशांनी रकानेच्या रकाने भरले जातात. विरोधकांना मारण्यासाठी खोटया सह्या-सुद्धा केल्या जातात. या सगळ्या गोष्टींची कोणत्याही देशभक्ताला खंत वाटत नाही.

**अशोक :** तर मग कशाची वाटते ? मी म्हणतो मग कशाची खंत वाटते ?

**दीप्ती :** ऐकायचं आहे ? ऐकावंच लागेल. ऐका तर-त्यांना फक्त एकाच गोष्टीची खंत आहे-नवीन पिढीला चांगलं नेतृत्व करणारा नेता मिळू नये ते हताश आणि निराश बनविल हे म्हातारे लोक मरणाच्या अखेरच्या क्षणापर्यन्त सत्तेवर असावेत. पण मी सांगते, माणसाला अंतरर्बाह्य नागवा करून सत्य जनतेपुढं ठेवण्याचा काळ आता फार दूर नाही आणि त्या नग्न प्रेतावर नवी संस्कृती उदयाला येईल.

(**करुणा घाईत येते**)

**करुणा :** ओरडून-ओरडून कुणाला उठवते आहेस ? मी म्हणते तू जेवणार तरी कधी ?

**दीप्ती :** आत्ता नाही.

**करुणा :** तर मग मी काय करू ?

**दीप्ती :** रामायणाच्या आरंभी नशीब पाहण्याचं कोष्टक आहे. त्यात सर्वांच्या-भवितव्याचा शोध घेत बस.

**अशोक :** भैय्या, तू आपल्या या मुलीला भलतच डोक्यावर चढवून ठेवलं आहेस बुवा.

**विश्वजीत :** मी ? मी कधी काही केलं आहे का ? काही करण्याच्या लायकीचा तरी आहे का मी ? (**विवेकचा प्रवेश**)

**विवेक :** बरं झालं, काका, आहेत. आपण आता दीपकभैय्याकडे काही बोलला नाहीत तरी चालेल. मी परवापासून जगप्रवासाला निघतो आहे. आणि बरं का पपा, आज रात्री मी मनीषादीदीच्या घरीच राहणार आहे.

**दीप्ती :** जरा थांब. मीही येते.

**विवेक :** चल, (**हसत करुणाला**) ममी, आशीर्वादाची गोष्ट काढणं म्हणजे निव्वळ मूर्खपण आहे. तरीही तुम्हा लोकांना खुश करण्यासाठी मी आशीर्वाद घ्यायला येणार आहे. चल दीप्ती.

दीप्ती : पपा, मी जाऊ ना ? माझी चांगली मम्मी ती ! जेवणही तिथंच घेईन, बरं का ?

(दोघेही जातात. क्षणभर सगळे स्तब्ध राहतात. मग लांब सुस्कारा सोडून विश्वजीत बोलतो—)

विश्वजीत : आता तूच सांग अशोक, मी यात कुठं आहे का ?

अशोक : आम्ही कुठंच असणार नाही. म्हणून काय झालं ?

करुणा : सगळे निघून गेले. आता तुम्ही तरी जेवून घ्या.

विश्वजीत : जेवण ? हं, तीही एक सवयच होऊन गेली आहे. ये अशोक, तू तरी ये. एकत्र बसून जेवल्याला खूप दिवस झाले.

अशोक : एकत्र बसून ? जशी काही पूर्वजन्माचीच गोष्ट आहे. असं वाटतंय—की हे सगळं आयुष्य निरर्थकच फुकट गेलं.

विश्वजीत : आणि हे लोक म्हणतात की जे निरर्थक आहे त्यातच अर्थ भरला आहे. त्यातच अर्थ शोधणं शक्य आहे.

अशोक : कुणास ठाऊक ! अर्थच चुकलेला असेल तर तो शोधणार कसा !

(बोलत—बोलत आत निघून जातात. रंगमंचावर अंधार पसरू लागतो. दोन क्षणानंतर जेव्हा परत प्रकाश पडतो त्यावेळी तिथं सर्व लावलेलं दिसतं. मधला मुलगा शरद, मोठी मुलगी इंदू, मधली मुलगी मनीषा आणि छोटी दीप्ती ही जेवणाच्या टेबलाजवळ बसून चहा पीत—पीत गप्पा मारताहेत. सर्व आधुनिक आहे. दीप्तीच्या हिप्पी फॅशनमध्ये किंचित बदल आहे.)

दीप्ती : एक युगानंतर आज आपण एकत्र आलो आहोत. काय रे शरददादा, आपण मागल्या वेळी कधी एकत्र आलो होतो ?

शरद : लक्षात ठेवायला वेळ कुणाला आहे ? एक वेळा धावत पळत आलो होतो, पण तू नव्हतीस.

इंदू : मीही इथं फार थोड्या वेळा आले. घराच्या कामाचा पसारा पडला आहे ना ? हं, ममी कुठं गेली ?

दीप्ती : जाते कुठं ? शेजारीच आहे. पपांची फार काळजी करते आहे. म्हणून तर आपणा सर्वांना बोलावलं आहे. ती बघ, आलीच.

(करुणाचा प्रवेश)

शरद : नमस्ते ममी.

इंदू : नमस्ते ममी.

मनीषा : नमस्ते ममी.

करुणा : (बसत) नमस्ते. तुम्ही सगळे आलात तर ! वेळ कसा काय मिळाला ?

शरद : वेळ कुठं आहे ? पण तू बोलावलंस तेव्हा यावंच लागलं काय झालंय ?

इंदू : तू फार गंभीर दिसते आहेस.

मनीषा : दीप्ती म्हणत होती की तू पपांमुळे फार काळजीत पडली आहेस.

करुणा : दीप्तीचं बरोबर आहे. मी आज तुम्हा सर्वांना पपांच्या विषयीच बोलण्यासाठी बोलावलं आहे. दिवसेंदिवस त्यांची तब्येत बिघडते आहे. एकदम सुन्न झालेत. आयुष्यात काही रसच शिल्लक राहिलेला नाही असं त्यांच्या मनानं घेतलं आहे. त्यांचा कुणावर जराही राग नाही. माझ्यावरही नाही. मी बोललेच तर बोलतात. नाहीतर शून्यांत दृष्टी लावून बघत बसतात आणि मग बडबडतात. सध्या तर त्यात एका नवीन गोष्टीची भर पडली आहे.

शरद : काय झालंय ममी ?

करुणा : फार वाईट गोष्ट आहे. ते शिव्या देऊ लागलेत.

इंदू : काय म्हणतेस काय ममी ! ते तुला शिव्या देतात ?

मनीषा : मला नाही असं वाटत, मी त्यांच्या इच्छेविरुद्ध वागले आहे. अजूनही ते 'असद'ला आपला मानू शकले नाहीत तरीही जेव्हा कधी भेटतात तेव्हा तसं आम्हाला जराही भासू देत नाहीत.

शरद : कसेही असले तरी त्यांनी कधी कुणाला शिवी नाही दिली.

दीप्ती : खरं म्हणजे ते माझ्यावर अतिशय नाराज आहेत, पण मलाही त्यांनी कधी शिवी दिली नाही.

करुणा : मी म्हणते, नेहमी तुम्ही आपलंच तुणतुणं वाजवणार आहात का ? सगळ नीट ऐकल्याशिवायच आपली मतं द्यायला लागलेत. मी असं कुठं म्हटलंय की ते दुसऱ्यांना शिव्या देतात. (गंभीर होऊन) खरं म्हणजे त्यांना मला शिव्या देता आल्या असत्या. मला जराही वाईट वाटलं नसतं. परंतु ते स्वतःलाच शिव्या देतात. दूषणं देतात, रडतात.

इंदू : नवीनच ऐकतोय हे ! ज्यांचे दुसऱ्यावर काही चालत नाही तेच आपल्या नशिबाला दोष देत बसतात.

शरद : ते आता अगदी खालच्या पातळीवर गेले आहेत असं दिसतंय. अतिशय निराशावादी बनले आहेत ते. असे लोक कधी कधी वेडेही होतात.

करुणा : हेच तर म्हणतेय मी. तुम्ही त्यांचा विचार का नाही करत ? तुम्ही नेहमीच आपल्या मनासारखं तेवढं केलंत. आम्ही कुणालाच अडवू शकलो नाही. विमल कॅनडात आहे. कधी कधी पैसे पाठवतो आणि जबाबदारीतून मुक्त होतो. कोण

जाणे कसल्या प्रश्नाचं उत्तर विचारत विवेक फिरतो आहे ? कधी कुणाच्या प्रश्नाचं उत्तर मिळालं आहे का ? जाउ दे. आता या दीप्तीचंच पहा ना. काय रूप बनवलंय स्वत:चं. सिगरेटसुद्धा ओढते. उशीरापर्यंत मित्रांबरोबर भटकते आणि आता म्हणतेय की होस्टेलवर जाऊन राहीन.

**दीप्ती** : मग तू मला समजून घेण्याचा प्रयत्न का नाही करत ? तू माझ्यावर प्रेम करतेस, माया करतेस पण मला समजून घेण्याचा प्रयत्न मात्र करत नाहीस. मी तर असं म्हणेन की एखाद्याला समजून घेणं याचाच अर्थ प्रेम करणं आहे. होस्टेलमध्ये राहणं माझ्यासारखीला सोयीस्कर आहे हा विचार तू का नाही करीत ? डॉक्टरी शिक्षण घेणं सोपं नाही. मित्रांबरोबर फिरते पण उनाडक्या तर करत नाही ना ? सांस्कृतिक कार्यक्रमांत भाग घेते आणि उशीरा आल्यानं तुला त्रास होईल असा विचार करून कधी कधी नितीनबरोबर निघून जाते. मी आणि नितीननं लग्न करायचं ठरवलं आहे. मी हे सगळं तुझ्या भल्यासाठीच करते आहे. तरीही तू नाराजच होणार असशील तर मला त्याची काळजी नाही.

**करुणा** : काळजी करायला कोण सांगतंय ? काळजीचं कारणच काय ? खर्चाचे पैसे मिळताहेत.

**दीप्ती** : (जोराने) पुन्हा तेच, पैसा, पैसा ! तुम्हाला द्यायचे नसतील तर देऊ नका. करीन मी माझी व्यवस्था. शिकणार नाही. पण या घरात येणार नाही. या कोंदटलेल्या घरात पहावं तेव्हा आपलं रातकिड्यांचा किर्र आवाज ! माझा जीव कसा अगदी गुदमरून जातो इथं !

**करुणा** : तुला जायचंच असेल तर खुशाल जा. कोण अडवणार आहे ? पण असं ओरडू नकोस. या घरात आम्हीही दिवस काढले आहेत. परक्याची मुलगी होते चाळीस–चाळीस लोकांत वावरले आहे.

**दीप्ती** : ते ४० लोक कुठं गेले याचा विचार कधी केला आहेस का ममी ? ते का गेले ?

**करुणा** : मी सगळं काही पाहिलं आहे आणि सगळ्यांचा विचार केला आहे. जाऊ देत त्या गोष्टी. या वेळी मला तुमच्या पपांची काळजी आहे. आज सकाळी ते फार लवकर निघाले होते. अजूनही आलेले नाहीत. तुम्ही त्यांना शोधा. शेवटी तुमची सुद्धा काही जबाबदारी आहेच. मला फार भीती वाटतेय.

**मनीषा** : मम् ! नुकतीच तीन–चार मिनिटांपूर्वी मी असदबरोबर रेल्वे स्टेशनवरून येत असताना त्यांना पाहिलं होतं.

**करुणा** : कुठं पाहिलंस ?

**मनीषा** : पुलाच्या पलीकडे. रेल्वेजवळ उभे होते.

**शरद** : रेल्वे रुळाजवळ ?

**इंदू** : तिथं ते कशाला गेले होते ?

**दीप्ती** : ते तिकडे फिरायला तर कधीच जात नाहीत.

**करुणा** : त्याच भीतीनं माझा जीव घाबरलाय. तुम्ही जा, जा लवकर. ते कुठं आहेत ते पहा.

**मनीषा** : ममी, इतकं घाबरण्याचं कारण नाही. मी चालत्या गाडीतून त्यांना हाक मारली होती. तिथे आली की गाडी किती हळू जाते हे तुला माहीतच आहे. त्यामुळे त्यांनी दचकून माझ्याकडे पाहिलं आणि ते हसले.

**शरद** : बरोबर आहे, ममी. पपा येतील. काही काळजी करायला नको.

**करुणा** : काळजी करायची की नाही ते मी बघेन. सरळ सरळ सांगा ना तुम्हाला जायचं नाही म्हणून !

**शरद** : तू उगाचच नाराज होतेस ममी. जायला कोणी नाही म्हणतो का ? पण प्रश्न वेळेचा आहे. मला पेट्रोलपंप मिळणार आहे हे तुला माहीतच आहे. त्यासाठी पैसा देणाऱ्याची व्यवस्था करतोय. परंतु जोपर्यंत वरच्या माणसांची शिफारस मिळत नाही तोपर्यंत काहीही होत नाही. आज त्या वरच्या माणसाशी मला चर्चा करायची आहे. दीपकभैय्यानं मला ८ वाजता बोलावलं आहे. आता सव्वासात झालेत. (उठतो)

**करुणा** : तर मग तू काय शोधणार ? जा बाबा. जा, वरच्यांशी चर्चा कर बरं !

**इंदू** : मलाही जायचं आहे ममी.

**करुणा** : तुला आता कुठे जायचं आहे.

**इंदू** : आम्ही घर बांधतोय हे माहीत आहे ना तुला ? आणि घर बांधणं म्हणजे काही साधी गोष्ट नाही ! गव्हर्नमेन्टकडून कर्ज काढलंय, विमा कंपनीकडून कर्ज घेतलंय पण अजूनही कटकटी काही संपलेल्या नाहीत. खरंच सांगतेय, ममी, आमचं दोघांचं जेवणाखाण्याकडेसुद्धा लक्ष नाही. कुणालातरी एकाला तिकडे रहावंच लागतं. नाही राहिलो तर सामान पळवलं जातं अग त्या दिवशी लोखंडी सळया गेल्या. काल सिमेंटच्या १० गोण्या नाहीशा झाल्या. आता सांग, दोन माणसं कुठेकुठे म्हणून लक्ष ठेवणार ? अच्छा, ममी मी जाऊ ? मजुरांचा हिशोबसुद्धा करायचा आहे. (जाते)

**करुणा** : मी म्हणतेय आपली आई म्हातारी झाली आहे याचा तुम्ही कुणी कधी विचार तरी केला आहे का ? जेवण बनवताना तिचे हात आता थरथरतात.

**मनीषा** : जेवण बनविण्याची व्यवस्था होईलही पण पपांच काय करशील ? त्यांना तर तुझ्या हातचंच जेवण लागतं.

**करुणा** : म्हणूनच तर मी कुणाला काही सांगत नाही. परंतु त्यांना शोधायला मी आता कुठं जाऊ ?

**दीप्ती** : कुठंच जाऊ नकोस. तू उगीचच त्रास करून घेतेस.. पापा स्वतःच येतील बघ. मम, मनीषा दीदीबरोबर जावं की काय याचा मी विचार करते आहें.

**करुणा** : तुला आताच जायचं आहे ? याच वेळी ?

**दीप्ती** : होय, ममी. पण तू जराही घाबरू नकोस हं ! परवा मी परत येईन. माझा वाढदिवस आहे ना ? परवाच्या दिवशी मी सज्ञान होईन म्हणजे स्वतंत्र. ओहो ! स्वतंत्र होणं ही किती छान गोष्ट आहे नाही ? घाबरू नकोस ममी, मला माझी जबाबदारी समजते. होस्टेलमध्ये दुसऱ्या कुणाची भीती नसते. असलीच तर स्वत:चीच. आणि जो स्वत:लाच घाबरतो तो आपली जबाबदारी समजून असतो. मला बंधनं तोडायची आहेत. ही व्यवस्था मोडून-तोडून टाकायची आहे. पण आयुष्य नव्हे बरं ! ते मला फार आवडतं.

**(त्याचवेळी शरद आणि विश्वजीत रंगमंचावर प्रवेश करतात)** हे बघ ममी, पपा आले. अगदी चांगले आहेत. म्हणजे असं की शरीरावर कुठे जखम नाही की चेहरा त्रासलेला नाही.

**शरद** : घे, सांभाळ ममी. तू उगीचच इतकी घाबरलीस ? पपा स्वत:च येत होते. बरं, मी आता जातो. पैसा देणारा भेटला नाही तर पेट्रोलपंप हातचा जाईल. **(जातो)**

**विश्वजीत** : हा, हा, जा. तुम्ही सर्व जा. तुम्ही कसे इथं थांबू शकणार ? या थांबलेल्या आयुष्यात ! तुम्ही इकडे आलातच कसे याचंच आश्चर्य वाटतंय मला !

**करुणा** : आणि मी म्हणते, तुम्मी सकाळपासून होता कुठं ? **(चहा नाश्ता देते)**

**मनीषा** : पपा, तुम्ही चार तासांपूर्वी रेल्वे रुळाजवळ उभे होता ना ?

**करुणा** : तुम्ही तिथं कशासाठी गेला होता ?

**विश्वजीत** : **(शांतपणे चहा पीत)** तुम्ही जे समजत होता तेच करायला गेलो होतो.

**मनीषा** : म्हणजे आत्महत्त्या ? नाही, असं होणार नाही. हे खोटं आहे.

**विश्वजीत** : तुम्ही जर या गोष्टीचा विचार करू शकता तर ती घटना न व्हायला काय झालं ? पण जाऊ देत त्या गोष्टी. **(एकदम कुठेतरी हरवल्यासारखे)** मनीषा बेटी, तू मला 'पपा' म्हणून हाक मारलीस ना, त्यावेळी मला वाटलं त्या एका शब्दाने सगळं आसमंत भरून गेलं आहे. मी विचार केला, आत्महत्त्या म्हणजे मरणच आणि मरण हे अटळ आहे. तेव्हा आत्महत्त्या करणं हा मूर्खपणाच आहे. जीव कशाला द्यायचा ? शेवटच्या क्षणापर्यंत तो वाचवला पाहिजे. जे होणार आहे ते पहाण्यासाठी. आपल्याला स्वत:ला प्रेक्षक होऊ द्यायचं नाही हे कुठलं शहाणपण ? म्हणून मी परत आलो.

करुणा : फार चांगलं केलंत हो ! वाट पाहून पाहून मला तर वेडच लागायची पाळी आली होती.

मनीषा : ममी, पपा तुम्ही गंमत करताहेत. ते आत्महत्या करायला गेले नव्हते. बरं, पपा, मी आता निघते.

दीप्ती : दीदी, मी पण येते, पपा, विसरू नका हं. परवाच्या दिवशी माझा वाढदिवस आहे. मी सज्ञान होणार.

विश्वजीत : म्हणजे तुम्ही आता सज्ञान होणार तर ! सर्व काही करायला स्वतंत्र! अच्छा, तुलाही सज्ञान होताना पाहीन. तसं पाहिलं तर तुम्ही कधी अज्ञान असता आणि कधी सज्ञान होता याचा मला पत्ताच नसतो ! खरं तर मी स्वतःच अज्ञान आहे की सज्ञान आहे हे माझं मलाच ठाऊक नाही.

(सगळे हसतात. मनीषा आणि दीप्ती दोघी मिळून निघून जातात.) (काही क्षण विश्वजीत आणि मनीषा गप्प बसतात. नंतर करुणा बोलते.)

करुणा : काय हो ? तुम्ही खरोखरच आत्महत्या करायला गेला होता की काय ?

विश्वजीत : अगोदर तू माझ्या एका प्रश्नाचं उत्तर दे.

करुणा : कोणत्या ?

विश्वजीत : मी मरतही नाही आणि जगतही नाही. आत्महत्या काय यापेक्षा वेगळी असते ?

करुणा : म्हणूनच मी म्हणते, की तुम्हीही आपण स्वतंत्र आहोत असं का मानत नाही ? मुलांच्या जबाबदारीतून मुक्त ! स्वतंत्र होणं किती चांगलं आहे.

विश्वजीत : चांगलं आहे. पण ही विवशता ? तिचं काय ? स्वभावाची विवशता मुलांवर प्रेम करण्याची विवशता, त्यांचा बाप असल्याची विवशता. (हसतो) बाप असल्याची विवशता ! ते सगळे दूर गेले तरी पुन्हा परत येतील अशी आशा बाळगण्याची विवशता. (हसत रहातो, करुणा संशयाने त्यांच्याकडे पहाते, परंतु हसणं थांबत नाही. ते हसणं चालू असतानाच हळूहळू पडदा पडतो.)

## पात्रे

राय तारानाथ
हेमलता : त्यांची कन्या
बीरेन
आया
चेतराम
लोचन
बालेश्वर उर्फ बी. पी. सिन्हा
करमचंद बरेठा
काही आवाज

## (दृश्य पहिले)

**(उत्तर भारतातील एक गाव. एका खानदानी घराण्याच्या घराभोवतीची बाग. बाहेरून घराचा थोडासा भाग दिसतो. घरात जायला डाव्या बाजूने आणि बाहेर यायला उजव्या बाजूने रस्ता आहे. वेळ—चैत्र पौर्णिमेची संध्याकाळ. संध्याकाळ संपता संपताच चांदण्यांचे साम्राज्य पसरले आहे. एका विशिष्ट स्थळाकडे बोट दाखवीत राय तारानाथ हेमलतेबरोबर येतात.)**

**राय तारानाथ :** यां इथंच तुझी आई पूजा झाल्यावर तुळशीला पाणी घालायला येई आणि मी...

**हेमलता :** तुम्ही तर नास्तिकच होता ना, पपा ?

**राय तारानाथ :** अग, तुझ्या आईला चिडविण्यापुरता. पण तिची श्रद्धा मात्र अढळ होती ...आणि तेव्हा मी बागेच्या एखाद्या कोपऱ्यात...बहुधा तोच असावा...तो दगड दिसतो ना ?

**हेमलता :** मला आठवतंय की,

**राय तारानाथ :** काय आठवतंय ?

**हेमलता :** त्या दगडावर बसून तुम्ही मला ताऱ्यांच्या कथा सांगत होतात. **(थांबून आठवल्यासारखे करीत)** पपा, कलकत्त्यात ताऱ्यांनी भरलेलं आकाश जणू काही माझ्यां मनाच्या कोपऱ्यात गुपचूप पडून असे. पण इथं **(स्निग्ध स्वर)** गावी येताच आजच्या या चैत्र पौर्णिमेच्या चांदण्यासारखं ते फुललंय.

**राय तारानाथ :** आकाश पण फुललंय आणि तुझं मनसुद्धा, बेटी ! **(हसतात. थोडे थांबून)** किती वाजले ? **(हळूच)** गाडीची तर वेळ झालीच असेल नाही ?

**हेमलता :** तुम्ही पण पपा असले आहात ! **(रुसून)** तुम्हाला वाटतं की मला जसं काही चांदणं आवडतच नाही; फक्त...

**राय तारानाथ :** **(तिचं बोलणं पुरं करीत)** बीरेनच्या प्रतीक्षेच्या वेळीच ते फुलतं. **(हसत)** पण त्यात काय बिघडलं म्हणा ? बीरेन फार चांगला मुलगा आहे, म्हणूनच तर इथं यायचं आमंत्रण दिलं त्याला ! पाहू या गावाचं सौंदर्य त्याला आवडतं की नाही ते.

**हेमलता :** जसा काही जन्मल्यापासून शहरातच वाढलाय तो !

**राय तारानाथ :** तसंच समज. सांगत नव्हता का तो की लहानपणी वडील वारल्या-वर बरेलीला गेला आणि त्यानंतर लखनौ आणि मग कलकत्ता.

**हेमलता :** मलासुद्धा तुम्ही लहानपणीच कलकत्त्याला घेऊन गेलात आणि आता पहिल्यांदाच गावी आणता आहात.

**राय तारानाथ :** मी तुला आणलं बेटी की तू मला ?

**हेमलता :** पपा, इथं येताच मी इथली होऊन गेले. न जाणे किती युगांचं नातं जुळलं. (**प्रसन्न आवाजात**) हे आपलं घर, जुना वाडा, हिच्या भिंतीत पडलेल्या या भेगा म्हणजे हसऱ्या चेहऱ्यावरच्या रेषा आहेत. ही दूरवर पसरलेली शेतं. त्यांच्या-वरून दबल्या पावलांनी धावता धावता हवासुद्धा स्वत:ला ओवाळून टाकते. आणि हे चांदणं हे जितकं हसतंय तितकंच काहीतरी लपवतंयसुद्धा ! (**तन्मय होऊन**) कलकत्त्यात चैत्रातलं चांदणं आणि ईदीचा चंद्र यात काहीच फरक नसतो. पण इथं ? झोपड्यांवर, बांबूच्या बेटात, शेतमळ्यावर अवर्णनीय अमर्यादित अशी चांदण्याची दौलतच उधळलीय जणू. अहाहा पपा ! (**अपरिमित सुखानुभवामुळं स्तब्ध**)

(**पडद्यात – " हेमबेबी, चहा तयार आहे ! "**)

**राय तारानाथ :** चहा ! इतक्या रात्री ?

**हेमलता :** आयाचा हट्ट ! म्हणते कशी, थंडी आहे, थोडा चहा घे. (**घराकडं वळून**) इथंच आण, आया, बागेत ! आणि दोन बैठकासुद्धा !

**राय तारानाथ :** (**आठवणीच्या सागरात बुडू लागतात**) मनात येतं–जर तुझी आई तुझ्यासारखी बोलू किंवा लिहू शकली असती तर तीसुद्धा कवी किंवा तुझ्या-सारखी आर्टिस्ट झाली असती.

**हेमलता :** आईला बोलता आलं असतं तर तिनं तुम्हाला कलकत्त्याला जाऊ दिलं नसतं.

**राय तारानाथ :** अडवलं होतं तिनं. दोन–चार अश्रू पण गाळले होते. पण हेम, मी गेलो नसतो असं तुला खरंच वाटतं का ? कसा गेलो नसतो ? संपूर्ण करियरचा प्रश्न होता. जमीनदारी त्या काळी भरपूर होती. पण शेवटी तिनं मलाही आपल्या-बरोबर बुडवलंच असतं की.

**हेमलता :** या गावात एखादं हायकोर्ट असतं तर किती छान झालं असतं ! इथंच तुम्ही वकिली केली असती आणि इथंच जज्ज झाला असता.

**राय तारानाथ :** वा ! छानंच झालं असतं बेटी ! मग इथं एखादं हॉस्पिटलही हवं होतं जिथं तुझ्या आईच्या दीर्घ आजारावर इलाज करता आला असता, आणि इथंच एखादं कॉलेज आणि हायस्कूलही हवं होतं, जिथं तुझं शिक्षण झालं असतं आणि इथंच ती सिनेमा थिएटर...

(**आयाचा प्रवेश. हातात ट्रे. स्वत:च्या नादात बोलते.**)

**आया :** मी हेच म्हणत होते साहेब ! हेमाताईंचं मनं या खेड्यात कसं लागणार ? सिनेमा नाही, थेटर नाही, क्लब नाही. (**मागे बघून ओरडत**) अरे चेत्या ! कुठं घेऊन गेलास टेबल ? गावंढळ माणूस, अक्कल पण बेतास बात. (**चेतराम एका**

हातात लहानसं टेबल आणि दुसऱ्या हातात बैठक घेऊन येतो) तिथं ठेव . . . हां ठिक. (टेबलावर चहाचा ट्रे ठेवते. चहा बनवीत) तुमच्यासाठी पण बनवू साहेब ?

**राय तारानाथ** : (काहीसे विमनस्कपणे—बैठकीवर बसत) माझ्या...साठी...

**आया** : (चेतरामाला उभा पाहून) अरे, इथं उभा काय राहिलास ? धावत जाऊन दुसरी बैठक आण ना.

**चेतराम** : आता आणतो ! (जातो)

**आया** : घ्या ताईसाहेब, गरम कपडे घातले नाहीत, निदान गरम चहा तरी प्या (कप हातात देते)

**हेमलता** : तुला तर आया असं वाटतं की आम्ही बर्फाच्या शिखरावरच बसलो आहोत.

**आया** : तसं नव्हे हेमाताई, खेड्यातली हवा शहरात रहाणाऱ्या लोकांना चंडी-सारखी भासते, चंडी सारखी !

**हेमलता** : आया तू सुद्धा खेड्यातलीच आहेस की !

**आया** : आतापर्यंत तीन चतुर्थांश आयुष्य तर गेलं तुमच्याबरोबर. (चहाचा कप रायसाहेबांच्या पुढं करीत) घ्या साहेब (रायसाहेबांना पाहून घाबरून) अरे !

**राय तारानाथ** : का, काय झालं ? (कप घेतात)

**आया** : तुम्ही पण साहेब कमाल करता. इथं उघड्यावर तुम्ही असेच बसला आहात ! (घराकडे पळते)

**हेमलता** : कुठं चाललीस आया ?

**आया** : (घाईघाईने) ड्रेसिंग गाऊन आणायला... सायबांचा बेरा कलकत्त्याहून येता तर असं कशाला घडलं असतं ?

**राय तारानाथ** : वा ! वा ! गुड ओल्ड आया ! (चहा पीत) तिला वाटतं की सगळं जग म्हणजे निष्पाप मुलांचा घोळका आहे आणि ती एकटीच आई आहे.

**हेमलता** : पपा, खरोखरंच तिला खेडं आवडत नाही का हो ? मला नाही खरं वाटत. पण— (चेतराम बैठक घेऊन आला आहे) इथं ठेव, टेबलाजवळ.

**राय तारानाथ** : मला ह्या जुन्या बैठका खूप आवडतात. कंबर अगदी अँगलमध्ये बसते. (चेतरामला थांबवून) ए, तुझं नाव काय ?

**चेतराम** : चेतराम साहेब !

**राय तारानाथ** : भोई आहेस ?

**चेतराम** : आदिवासी आहे.

**राय तारानाथ** : आदिवासींची घाणेरडी वस्ती इथंच कुठंतरी जवळपास होती. बापाचं नाव काय ?

**चेतराम :** कमतूराम ! ... आता घाण नाहीये सरकार !

**राय तारानाथ :** म्हणजे कमतूचा का मुलगा आहेस तू ?

**हेमलता :** अं ! घाणेरडी वस्ती गेली कुठं ?

**(आयाचा प्रवेश)**

**आया :** घ्या साहेब ड्रेसिंग गाऊन. जर बसायचंच आहे इथं उघड्यावर... अरे, तू इथंच उभा आहेस चेतू ?

**राय तारानाथ :** (**ड्रेसिंग गाऊन घालून**) आया तुला माहीत आहे का हा त्या कमतूचा मुलगा आहे... तो पंधरा वर्षांपूर्वी इथं...

**आया :** होय साहेब, मी तर त्या कमतूलाच बोलावलं होतं पण त्यानं मुलालाच पाठवून दिलं. बरं जाऊं द्या, माहितीतला मुलगा आहे. चोरीबिरी केलीन् तर पकडायला कठीण नाही...

**हेमलता :** तू तर आया अशी आहेस ! ...

**आया :** ताईसाहेब आता हे खेडूत तसे साधे सरळ नाही राहिले. तुम्हा आम्हाला सहज बनवतील. चेतू, चहाचा ट्रे घेऊन लवकर ये. पलंग–बिलंग नीट करायचे आहेत. (**जाता जाता**) बघते जाऊन आचाऱ्यानं जेवण तरी बनवलं आहे की नाही ते. (**जाते**)

**राय तारानाथ :** डियर ओल्ड आया ! (**चहाचा घोट घेत**)

**हेमलता :** चेतराम !

**चेतराम :** काय ताईसाहेब !

**हेमलता :** आदिवासी वस्तीत आता घाण का नाही ?

**चेतराम :** वस्तीच वाहून गेली, साहेब !

**राय तारानाथ :** वाहून गेली ?

**चेतराम :** गेल्या वर्षी खूप मोठा पूर आला. आमची तर वस्तीच नाहीशी झाली. चाळीस घरं होती. माझ्या आज्याकडं आठ गुंठ्याचं शेत होतं, सोन्यासारखं. त्यांनी कसंबसं सावकाराकडून सोडवलं होतं. ते पण वाहून गेलं. आणि कान्हू काकांच्या चार बकऱ्या होत्या ! सगळं पाण्यात...

**राय तारानाथ :** सरकारी मदत मिळाली ?

**चेतराम :** बोलणी तर चालू आहेत... पण आता आम्ही सगळे डोंगराच्या पायथ्याशी गेलो आहोत. नवीन वस्ती वसत आहे.

**राय तारानाथ :** वा ! वा ! मोठे धीराचे आहात तुम्ही. परंतु ती तर नापीक जमीन आहे. शेती कशी होणार ?

**चेतराम :** कठीण तर आहेच सरकार पण पाळीपाळीनं दहा–दहाजण मिळून काम

करतो. एक बांध बांधला गेला तरी काम होईल!

**राय तारानाथ** : तुमच्या हिम्मतीची कमाल आहे!

**हेमलता** : पण एकंदरीत कठीणच. रोजंच खाणंपिणं कसं मिळत असेल या लोकांना?

**राय तारानाथ** : असंच, नोकरी–मजुरी जेव्हा मिळेल तेव्हा.

**चेतराम** : ते तर खरं आहे साहेब! पण आता सगळे बांबूचं काम करू लागले आहेत. बाजारात विकल्या जातात त्या वस्तू. याहीपेक्षा सुंदर बैठका बनू लागल्या आहेत.

**राय तारानाथ** : अस्सं? आणा बुवा आमच्यासाठी एखादा सेट.

**चेतराम** : जरूर आणीन साहेब! आजोबा तर रात्रंदिवस यातच दंग असतात. मी पण रंगीबेरंगी टोपल्या बनवायला शिकलो आहे. लोचनभाईला खूप आवडतात. शहरात खूप खपतील म्हणतात...

**हेमलता** : तुला भाऊसुद्धा आहेत?

**चेतराम** : (हसतो) नाही हो ताईसाहेब लोचनभाई? लोचनभाई तर सगळ्यांचेच भाऊ आहेत! म्हणतात ना–

**राय तारानाथ** : विश्वबंधू आहेत.

(पडद्यातून आया : 'चेतू, ए चेतू!')

**चेतराम** : चहा घेऊन जाऊ साहेब?

**राय तारानाथ** : हो! हेम तू घेणार का आणखी?

**हेमलता** : ऊहूं नको! घेऊन जा.

(चेतराम घेऊन जातो. रायसाहेब ड्रेसिंग गाऊनच्या खिशात हात घालून फिरू लागतात.)

**राय तारानाथ** : असं आहे एकूण या लोकांचं जीवन. गरीबसुद्धा आणि घाणेरडे-सुद्धा. त्यावेळी तर नाक बंद केल्याशिवाय त्या वस्तीत जाणंच शक्य नव्हतं. याचा बाप कष्टाळू होता. तसे काम करण्यात हे लोक पटाईत आहेत पण आहेत मोठे बेरड!

**हेमलता** : पपा, तुम्हाला आठवतं? आमच्या आर्ट मास्तरांनी 'शेतकऱ्याचो सायंकाळ' नावाचं चित्र बनवलं होतं ते? खांद्यावर नांगर, पुढं बैल, थकलेला शेतकरी, संध्याकाळच्या मनमोहक सौंदर्यातही अलिप्त!

**राय तारानाथ** : पाचशे रुपये किंमत ठेवली होती त्यांनी त्यांची?

**हेमलता** : पपा, तुमच्या लक्षात आलं, या चेतरामाचा चेहराही त्या शेतकऱ्या-सारखाच आहे...मास्तर म्हणत होते की खेड्यातल्या जीवनात आणि दृश्यात असंख्य मास्टर–पीसेसची बीजं विखुरलेली आहेत. एकेका चेहऱ्यात युगायुगाचं दुःख साठवलं

आहे. एकेका झलकेत युगायुगांचा गहिरेपणा, अमृता शेरगिल...

**राय तारानाथ** : अमृता शेरगिल. अग, तिच्या चित्रात सदैव शोकभावनाच व्यक्त होत असते.

**हेमलता** : तो तर एकेकाचा अॅटिटयूड असतो. एकेकाचं वैशिष्टय असतं ! पण पपा, एवढं तरी मानाल की नाही की शेरगिलच्या रंगात भारताच्या गावातल्या मातीची झलक असते. पपा, मला वाटतंय की इथं आल्यावर माझ्या कुंचल्याला जणू नवीन दृष्टीच मिळालीय. किती किती चित्रं काढता येतील मला इथं ? पिकलेल्या गव्हाच्या शेतातली आश्चर्यचकित कृणकबाला. रंगीबेरंगी बांबूच्या टोपल्या बनविणारा या चेतरामाचा बाप ! सकाळच्या प्रहरी धुतलेल्या गायीचं दूध काढणारा गवळी.

**राय तारानाथ** : आणि हे चांदणं ! (हसतो) पण हेम, ते चित्र तयार झालं की नाही ?

**हेमलता** : कोणतं ?

**राय तारानाथ** : अग तेच...खास चित्र !

**हेमलता** : पपा, तुम्ही पण असले आहात ! (लाजून) पण बीरेननी सतत पंधरा मिनिटांचीसुद्धा सिटिंग्ज् दिली नाहीत. इकडून तिकडून उड्या मारीत फिरत होते !

**राय तारानाथ** : या वेळी पण वाटतंय–कुठं तरी उड्या मारीत असले पाहिजेत रावसाहेब !

**हेमलता** : तुम्ही उगीचंच टांगा पाठवलात. ज्याच्या पायावरचं नक्षत्र पडलंय...

(अचानक पाठीमागून बीरेन बाहेर येतो.)

**बीरेन** : नक्षत्र कुठं पडलंय ? तू टांगा पाठवायला विसरलीस तर नाहीना ?

**हेमलता** : बीरेन !

**राय तारानाथ** : बीरेन ? अरे ! तुला स्टेशनवर टांगा नाही का दिसला ?

**बीरेन** : नमस्कार पपा ! नाही बुवा मला टांगा नाही दिसला. कदाचित...

**राय तारानाथ** : कमाल आहे त्या टांगेवाल्याची ! रस्ता तर एकच आहे.

**बीरेन** : काहीच बिघडलं नाही. माझं पण एक काम झालं.

**राय तारानाथ** : सामान कुठाय तुझं ?

**हेमलता** : चेतू ! (हाक मारीत) आया, चेतूला पाठव सामान...

**बीरेन** : सामान तर स्टेशनवर चौधरी जंगबहाद्दूरांच्या ताब्यात देऊन आलोय.

**राय तारानाथ** : म्हणजे तुला पण भेटले वाटतं चौधरी जंगबहाद्दूर !

**हेमलता** : तेच ना पपा, जे प्रत्येक गाडीवर कुणा ना कुणा येणाऱ्याला न्यायला येतात ?

**बीरेन :** किंवा कुणा न जाणाऱ्याला पोचवायला. पण हाही आगळा छंद आहे नाही ? कारण नसतानाही प्रत्येक गाडीला वेळेवर स्टेशनवर जायचं.

**राय तारानाथ :** रोज दोनच तर गाड्या येतात या लहानग्या स्टेशनवर. पण चौधरींच्यामुळं या सुन्या सुन्या स्टेशनलाही शोभा आलीय.

**बीरेन :** हे मात्र खरं हं. जोपर्यंत ते भेटले नव्हते तोपर्यंत असंच वाटत होतं की मी पॅसिफिक महासागरातल्या बेटावर हरवलोय !

**हेमलता :** इथं चौरंगीच्या वर्दळीची अपेक्षा करणं चुकीचं आहे बीरेन !

**बीरेन :** (**मोठ्यांदा हसतो**) बेकनने काय म्हटलंय आठवतंय ? 'जर ओळख नसेल तर गर्दीतही चेहरे मुकी चित्रं वाटतात आणि गप्पागोष्टी घंटेसारख्या.' पण तुला कुणी सांगितल की मला एकाकीपणा आवडत नाही म्हणून. मी तर चौधरी-साहेबाच्या हातावर तुरी देऊन पळालो.

**राय तारानाथ :** बहुधा त्यांनी तुला सर्व हकिगत सांगायला सुरुवात केली असावी.

**बीरेन :** हो ना, म्हणत होते की ते वर्षातून एकदाच, फक्त एकदाच कलकत्त्याच्या रेसमध्ये पैसे लावायला जातात. हे पण सांगितलं की गव्हर्नर साहेबांनी ज्या डिनरला बोलावलं होतं त्याचं निमंत्रण अजूनही त्यांच्याकडं आहे. आणि या गावात जितक्या वेळा कलेक्टर आले आहेत त्या सर्व तारखा, दिवस त्यांना आठवतात.

**हेमलता :** कमाल आहे !

**राय तारानाथ :** खरंय बुवा, चौधरींची स्मरणशक्ती विलक्षण आहे.

**बीरेन :** ते नेहमी आठवणींच्या समुद्रातच डुंबत असावेत. म्हणून स्टेशनवर त्यांनी सामानाची जबाबदारी घेताच मी सुटकेचा निश्वास सोडला. मुख्य रस्ता सोडून शेताडीतून वस्तीकडं निघालो.

(**आयाचा प्रवेश**)

**आया :** बीरेनसाहेब, पहिल्यांदा चहा घेणार की एकदम जेवणाचीच व्यवस्था...

**बीरेन :** हॅलो आया, कशी आहेस ?

**आया :** मी तर मजेत आहे. पण तुम्ही आल्यामुळं आमच्या हेमाताईचं मन तरी लागेल–नाही तर...

**हेमलता :** नाहीतर काय ? मला तर कलकत्त्याच्या वर्दळीपेक्षा इथलं एकांत संगीतच आवडतं.

**राय तारानाथ :** आया, हेमची कोडी तुला नाही समजायची.

**बीरेन :** पण आया, आता तर मी इथं खूप धमाल करणार आहे.

**आया :** देवानं तो दिवसही लवकर दाखवावा ! मी तर...

**हेमलता :** गप्प बस बघू आया.

**राय तारानाथ :** (मोठ्यांदा हसत) हा, हा, हा !!!

**बीरेन :** मला दुसरंच म्हणायचं होतं–मी म्हणत होतो की मी या गावाचा काया-पालट करीन. हे गाव माझी वाट पहातंय–जसं जसं...

**हेमलता :** जशा वीणेच्या तारा उस्तादांच्या बोटांची वाट पहातात. (किंचित हसून) वाहवा !

**राय तारानाथ :** (हसत) हा, हा, हा. बीरेन आहे की नाही माझी मुलगी अपूर्वच, नाही का ?

**बीरेन :** परंतु वीणेच्या तारेत ती मस्ती कुठली की जी एक नवं जग निर्माण करण्यात मिळते ?

**हेमलता :** (उपहासानं) कोलंबस !

**राय तारानाथ :** नव्या जगाची निर्मिती ? हे तर मोठं मनोरंजक वाटतंय, बीरेन. तुझा विचार काय ? सांग पाहू.

**बीरेन :** ज्या रस्त्यानं–शॉर्ट कटनं–मी आलो. त्याला लागून थोडी जमीन आहे, उंच–सखल. ती पाहून मी खूष झालो आणि मी ठरवलं...

**आया :** बीरेनसाहेब–

**बीरेन :** की अगदी कशी आयडियल आहे ती जागा. जणू काही त्यासाठीच बनली आहे.

**राय तारानाथ :** कशासाठी ?

**आया :** साहेब बीरेन साहेबांच्या गप्पा म्हणजे श्रावण्यातल्या झडी. पण मलाही खूप काम पडलंय.

**हेमलता :** (चिडवीत) त्यांना खायला देऊ नकोस आया !

**बीरेन :** (त्याच तंद्रीत) मी सांगू का पपा, यापेक्षा सुंदर जागा ..

**राय तारानाथ :** थांब हं बीरेन, हा मी आलोच ! प्रथम आयाचा हुकूम पाळा. हेम, यांना खोली दाखव, गरम पाण्याची व्यवस्था असेलच. सगळी तयारी झाली, जेवणही तयार झालं की मला कळव, आया.

**आया :** पण या दिवसात जास्त वेळ बाहेर राहिलं तर...

**राय तारानाथ :** अगदी हा आलोच ! चौधरी आले तर त्यांच्याशीही दोन गोष्टी करीन.

**बीरेन :** (जाता जाता) पण पपाजी नीट लक्षात घ्या. ग्रामोद्धार समितीसाठी डोंगराच्या पायथ्याशी असलेल्या जमिनीसारखी उत्तम जागा कुठंच मिळणार नाही. मी त्या लोकांशी... (जातो)

**राय तारानाथ :** ग्रामोद्धार समिती ! विचार तर चांगला आहे. एकेकाळी

मीसुद्धा . . . (**समोर पाहून**) कोण ? चेतू ! अरे तू इथं का उभा आहेस ?

**चेतराम** : सरकार. . . (**थांबतो**)

**राय तारानाथ** : काय गरम पाणी तयार नाही केलंस ?

**चेतराम** : केलं साहेब ! खोली पण स्वच्छ केली. . .

**राय तारानाथ** : ठीक आहे.

**चेतराम** : साहेब (**संकोचानं थांबतो**)

**राय तारानाथ** : काय म्हणणं आहे चेतू ?

**चेतराम** : साहेब, तीच डोंगराच्या पायथ्याची जागा !

**राय तारानाथ** : कुठली जागा ?

**चेतराम** : ते नवे साहेब घ्यायची म्हणत होते ती. . .

**राय तारानाथ** : हां हां बीरेन ! जिथं ग्रामोद्धार समिती व्हायची आहे ती जमीन.

**चेतराम** : पण साहेब तिथं तर आम्ही आमची नवी वस्ती वसवतोय. आठ–दहा बांबूच्या झोपड्या तयार झाल्या की झालं काम.

**राय तारानाथ** : अरे तुम्हा लोकांचं काय ! जिथं बसाल तिथं वस्ती होईल तयार. पण गावाच्या उद्धारासाठी जे काम होईल. . . (**घोड्याच्या टापांचा आणि टांग्याचा आवाज**) अरे हे काय ? टांगा आला वाटतं. पहा बरं, बीरेनभाऊंच सामान उतरवून घे. (**चेतराम बाहेर जातो. टांगा थांबल्याचा आवाज.**) चौधरी साहेब आहेत का ?

**बालेश्वर** : (**बाहेरूनच बोलत येतो**) चौधरी साहेबांनीच मला पाठवलंय सामान घेऊन. माझं नाव बालेश्वर बी. पी. सिन्हा ! आणि हे आहेत करमचंद बरंठा. (**करमचंद बरंठा नमस्कार करतो**) हे बच्चूभाऊंचे चुलत भाऊ. मी चौधरीसाहेबांचा पुतण्या.

**राय तारानाथ** : कुठं आहेत चौधरीसाहेब ?

**बालेश्वर** : टांग्यातून आल्यामुळं त्यांचा फिरण्याचा कोटा पुरा झाला नाही म्हणून फिरायला गेले आहेत.

**राय तारानाथ** : (**हसत**) छान !

**करमचंद** : आम्हाला वाटलं की सामान पण पोचवावं आणि आपलं दर्शन पण घ्यावं.

**बालेश्वर** : खरं म्हणाल तर खेड्यात तसं काही लाईफच नाही.

**करमचंद** : शहर सोडलंय तेव्हापासून वाटतं की कैदी झालो आहोत. ट्रांसपोर्टेशन फॉर लाईफ !

**राय तारानाथ** : काय करीत होतात शहरात ?

**बालेश्वर :** करमचंद तर इंटरमिडियटपर्यंत शिकून थांबला आणि मी...

**करमचंद :** खरं म्हणजे परीक्षेचे पेपरच विचित्र काढले होते कुणी !

**बालेश्वर :** मी तर बी. ए. करीत होतो आणि एका ऑफिसात हिशेबनीसाच्या नोकरीसाठी अर्ज पण केला होता पण वशिला कमी पडल्यामुळं—

**राय तारानाथ :** हिशेबतपासनीस ? तुमच्याकडं तर कित्येक बिघे शेती आहे.

**बालेश्वर :** शिकल्यासवरल्यावरही शेती ! 'शिकतो फारसी विकतो तेल !'

**करमचंद :** पुन्हा शहरातल्या जीवनाची गोष्टच वेगळी. खायला हॉटेल, फिरायला मोटार करमणुकीसाठी सिनेमा.

**राय तारानाथ :** शहरात कुठं रहात होतात ?

**बालेश्वर :** शहरात रहाण्याचं काय ? चार बोटांचा कोपराही पुरेसा आहे.

**करमचंद :** शहरातल्या सडका इथल्या दिवाणखान्यापेक्षा काही कमी नाहीत. ती वर्दळ, ती रंगत.

**राय तारानाथ :** पण हे मात्र तुमचं सगळं चुकीचं आहे. मी आपल्या लहानपणीचे आणि तारुण्याचे सुंदर दिवस इथंच घालवले आहेत.

**बालेश्वर :** तेव्हाची गोष्ट वेगळी असेल जज्जसाहेब.

**करमचंद :** आणि शिवाय त्या लहान वयात शहरातल्या मोहक जीवनाची गावच्या जीवनाशी तुलना करण्याची संधी तरी कुठं असणार ?

**राय तारानाथ :** मोहक ? ते जाऊ द्या अलीकडचा काय कार्यक्रम ?

**करमचंद :** गळ्यात पडलं ढोलकं, लागला वाजवायला साधू ! वाटलं काही सुशिक्षित लोकांचा क्लब काढावा.

**बालेश्वर :** तेसुद्धा करू देत नाहीत लोक.

**राय तारानाथ :** कोणते लोक ?

**करमचंद :** या गावातलं पॉलिटिक्स तुम्हाला नाही ठाऊक ?

**राय तारानाथ :** इथं पण पॉलिटिक्स आहे वाटतं ?

**बालेश्वर :** भयंकर ! खरं म्हणजे मला आणि करमचंदाला व्यवस्थित चालणारा-चाय क्लब. एक प्रेसिडेन्ट, दोन व्हाईस प्रेसिडेंट, एक सेक्रेटरी, दोन जॉइंट सेक्रेटरी, पाच कमिटी मेंबर.

**करमचंद :** खरोखरंच ! हे पहा (कागद काढून रायसाहेबांना दाखवतो.) असा लेटरपेपर छापण्याचा बेत आहे. वरती क्लबचं नाव आणि इथ समासात सगळ्या पदाधिकाऱ्यांची नाव आणि...

**बालेश्वर :** पण ठाकुरांच्या वस्तीत दोन माणसं आहेत—धरमसिंह आणि किशन कुमार सिंह—म्हणतात कसे की दोन व्हाईस प्रेसिडेंट त्यांचे असावेत आणि कमिटीत

तीन माणसंसुद्धा त्यांची. मी सांगितलं की जॉइंट सेक्रेटरी आणि दोन कमिटीचे मेंबर घ्या.

राय तारानाथ : ते पण शिकलेसवरलेले असतील.

करमचंद : आहेत ना मॅट्रिकपर्यंत.

राय तारानाथ : मग ?

करमचंद : स्वत:ला लॉर्ड समजतात. म्हणतात क्लब त्यांच्याच मोहल्ल्यात असायला हवा.

बालेश्वर : तुम्हीच सांगा आम्ही असताना ठाकुरांच्या वस्तीत क्लब कसा उघडता येईल ?

करमचंद : तुम्हीच न्याय करा जज्जसाहेब !

राय तारानाथ : त्याविषयी तुम्ही बीरेनशी बोला. हा पहा बीरेन आलाच.

बीरेन :(हेमच्या बरोबर येत)पपा, ग्रामोद्धार समितीचं बोलणं मी पुरं नाही केलं.

राय तारानाथ : बीरेन, ते तू या लोकांना समजावून सांग. हे आहेत बालेश्वर उर्फ बी. पी. सिन्हा आणि हे आहेत करमचंद बरेठा गावातले सुशिक्षित तरुण ! यांना क्लब उघडायचाय. मी आता निघतो. उशीर होतोय. हेम बेटी, बीरेनला उशीर करू देऊ नकोस (जातात).

बीरेन : असं ! असं ! गावात तुम्हाला क्लब स्थापन करायचाय होय !

बालेश्वर : हा पहा, आमचा लेटरपेपर आणि नियमावलीचा मसुदा.. त्याचं असं आहे ..

बीरेन : चला, माझ्या बैठकीत. तिथं सावकाशीनं बोलणी करता येतील इकडून या. मी आलोच.

(बालेश्वर आणि करमचंद जातात.)

हेमलता : मी इथंच थांबते. लवकर आटपा नाही तर ठाऊक आहे ना, आया अशी तासंपट्टी करील की...

बीरेन : तू पण चल ना ? किती सुंदर आहे माझी योजना. ऐकलीस तर खुष होऊन जाशील.

हेमलता : बैठकीत येऊ ? अहं ! हे चांदणं पाहिलंत ! (बाहेरून सांघिक गीतांचा आवाज.) आणि हे गाणं ऐकलंत, चांदणंच बोलतंय जणू काही.

बीरेन : (जाता जाता चिडवीत) मला तर कुणाचं तरी चंद्रासारखं मुख दिसतंय आणि ऐकू येतेय फक्त आपल्याच हृदयाची धडधड ? (हात हलवीत) टा ! टा ! (जातो)

हेमलता : (गोड हसत) खोटारडे कुठले !

(सांघिक गीताचा आवाज जवळ येतो. स्त्री-पुरुष दोहोंचा आवाज)

चांदणं विखुरलंय मी काय करू रामा ।
गंगा माझी माय यमुना माझी बहीण
चंद्र सूर्य दोघे भाऊ
मी काय करू रामा । चांदणं विखुरलंय...
सासु माझी राणी, सासरे माझे राजा
दीर माझा राजकुमार मी काय करू रामा
चांदण विखुरलंय मी काय करू रामा ।

(गाणं चालू असताना चेतराम पटकन येतो आणि बाहेर निघून जातो.)

हेमलता : कोण चेतू ? कुठं जातोस ?

चेतराम : ते गाणं...

हेमलता : खूप छान आहे.

चेतराम : माझ्याच वस्तीवरचे लोक आहेत. प्रत्येक पौर्णिमेच्या रात्री रस्त्या-रस्त्यावरून गात फिरतात.

हेमलता : इकडेच येतायत ?

चेतराम : ते पहा, समोरच्या रस्त्यावरून चाललेत. आणि तो पहा, त्यांच्यात लोचनभाई पण आहे.

हेमलता : कुठाय ?

चेतराम : कुर्ता घातलेला तो पहा. मी जातो ताईसाहेब. ते लोक मला बोलावतायत. (जातो)

(गाण्याचा आवाज जवळ येऊन दूर जातो "मी काय करू रामा...")

हेमलता : (हळू आवाजात) "चांदणं विखुरलंय मी काय करू रामा" वाहवा ! किती मधुर वेदना आहे ही !

आया : हेमताई, हेमताई ! या थंडीत किती वेळ बाहेर राहणार ?

हेमलता : (मोठ्याने) आले मी, आलेच (हळू आवाजात) चांदणं आणि मी ! मी आणि वीरेन ! पण हे गाणं आणि तो...तो लोचन ! (विचार करीत जाते)

## (दृश्य दुसरे)

**(तेच स्थळ. पंधरा दिवसानंतर. सकाळची वेळ. बाहेरून रायसाहेब आणि एका माणसाच्या बोलण्याचा स्पष्ट आवाज येतो आणि नंतर थोड्याच वेळात मोठमोठ्यांदा हसत रायसाहेब प्रवेश करतात.)**

**राय तारानाथ** : हा, हा, हा !!! वाहवा, वाहवा !! ऐकलं बेटी हेम ? हेम अग, हेम !

**हेमलता** : **(पडद्यातून)** आले पपा !

**राय तारानाथ** : हा ! हा ! हा !!

**(हेमचा प्रवेश. हातात एक मोठंसं चित्र आणि ब्रश)**

**हेमलता** : काय झालं पपा ?

**राय तारानाथ** : हेम, आपले चौधरीसाहेब म्हणजे अवलिया आहेत. आताच तर मला फाटकापर्यंत सोडून गेले. सकाळी भटकताना जर यांची सोबत नसेल तर मी या खेड्यात मुका आणि बहिरा होईन.

**हेमलता** : तुम्ही तर आज त्यांच्या घरापर्यंत जाणार होतात.

**राय तारानाथ** : थोडा वेळ त्यांच्या बैठकीत **(घरी)** बसावं म्हणूनच गेलो होतो, पण ते बाहेरूनच म्हणाले, "तिथंच थांबा."

**हेमलता** : कमाल आहे !

**राय तारानाथ** : म्हणतात कसे, "प्रथम मला वरती जाऊ द्या. मग कार्ड पाठवा तेव्हाच बैठकीत येणं शक्य आहे ! नियम आहे ना !"

**हेमलता** : **(हसते)** हे काय इंग्रजासारखं वागणं ?

**राय तारानाथ** : पुढं तर ऐक ! त्यांच्या घरात त्यांच्या खाजगी खोलीच्या बाहेर बेल लावलेली आहे. कुणालाही आत जायचं असेल तर बेल वाजवावी लागते. बेल न वाजवता कुणी आत आलं तर चौधरीसाहेब त्याच्याशी बोलतसुद्धा नाहीत. अगदी स्वतःची बायको असली तरीसुद्धा !

**हेमलता** : मला वाटतं मनुस्मृतीसारखी शिष्टाचार संहिता चौधरीसाहेब आपल्यामागं ठेवून जातील.

**राय तारानाथ** : पण माणूस मनाचा निर्मळ आहे. अगदी खऱ्या हिऱ्यासारखा आहे. दुसऱ्याच्या एका पैशालासुद्धा हात लावीत नाही.

**हेमलता** : तेव्हाच वीरेननं त्यांना ग्रामोद्धार समितीचा ऑडिटर बनवलंय.

**राय तारानाथ** : बीरेनला सांग चौधरीसाहेब हिशेबाच्या बाबतीत फार कडक आहेत. म्हणत होते की त्यांचा पुतण्या बालेश्वर या संस्थेत असल्यामुळं पै पैवर ते कडक नजर ठेवणार आहेत.

**हेमलता** : बालेश्वर मला आवडत नाही. भांडखोर माणूस आहे.

**राय तारानाथ** : भांडण तर गावच्या रक्तातच आहे.

**हेमलता** : पूर्वीसुद्धा असंच होतं का पपा ?

**राय तारानाथ** : होतं, पण इतका हट्टीपणा नव्हता. मी असं नाही म्हणत की पूर्वी वाघ आणि शेळी एका घाटावर पाणी पीत होते. परंतु...परंतु पूर्वी शिकलेले तरुण गावात कमी होते. आणि...

**हेमलता** : शिकलेले नव्हेत, अर्धवट. टागोर म्हणतात ना–"हाफ–बेक्ड कल्चर!" पण पपा, बीरेनचा वादळी उत्साह आणि त्यांची तीक्ष्ण बुद्धी खरोखरच गावाचा कायापालट करणार का ?

**राय तारानाथ** : तुला काय वाटतं ?

**हेमलता** : त्या दिवशी बीरेन म्हणत होता, गावात क्रांतीची, एका नव्या दृष्टि-कोणाची, एका नव्या मानसिक बैठकीची आवश्यकता आहे.

**राय तारानाथ** : बीरेन छान बोलतो ! त्याची जादू आहे.

**हेमलता** : शेकडो माणसं मुग्ध होतात.

**राय तारानाथ** : त्या दुसऱ्या पार्टीचं काय झालं ? ग्राम सुधारणा समितीत ती सामील झाली की नाही ?

**हेमलता** : अजून तरी नाही. काल रात्री खूप वादविवाद झाला. बीरेन खूप उशीरा आला. माहीत नाही काय झालं ते !

**राय तारानाथ** : नाही बेटी, मी तर बीरेनला आधीच सांगितलं मी येऊ शकणार नाही म्हणून. मला...

**(बीरेनचा प्रवेश, हातात कागद. शर्टाची बटणं लावीत)**

**बीरेन** : पण पपा, चौधरीसाहेब तर येणार आहेत.

**राय तारानाथ** : त्यांना अगदी योग्य जागी बसवा हं. अगदी नियमानुसार.

**बीरेन** : **(हसत)** त्यांची योग्य ती बडदास्त ठेवण्यात येईल. पपा, तुम्ही तिथं येणार नसाल तर हा माझा भाषणाचा ड्राफ्ट पहा. **(कागद देतो)**

**राय तारानाथ** : तू तर तयारी न करताही बोलतोस. **(कागद वाचू लागतात)**

**बीरेन** : हो ते खरं आहे, पण आज तर ग्रामसुधारणा समितीची संपूर्ण योजनाच गावाच्या समोर ठेवायची आहे...वाचा ना !

**राय तारानाथ** : **(वाचीत)** मोठी जोरदार स्कीम आहे !

**वीरेन :** हो, पुढे पहा (हेमलतेला) आणि हेम, समितीच्या भवनात लावायची चित्रं पुरी केलीस ?

**हेमलता :** एक तर जवळजवळ तयारच आहे.

**वीरेन :** हे का ?...छान चमकदार रंग आहेत, नाचाचं दृश्य फारच सुंदर आहे... छान ! पण...हे...या कोपऱ्यात अंधारात ही कोणती माणसं आहेत ?...

**हेमलता :** तुला कोण वाटतात ?

**वीरेन :** (थांबून विचार करीत) ...निर्वासित...भटकणाऱ्या प्राण्यांसारखे !...

**राय तारानाथ :** (वाचीत) वीरेन तुमच्या ग्रामसुधारणा समितीत बौद्धिक कसरत भरपूर आहे...ग्रंथालय, भाषण, अभ्यास मंडळ...

**वीरेन :** (चित्र बाजूला ठेवीत) तसंच तर आहे पपा ! शेवटी गाव-जागृती म्हणजे तरी काय ? आपल्या गरजा आणि समस्यांच्यावर विचार करण्याची क्षमता ! खेड्यातल्या मूक व्यथेला वाणीची आवश्यकता आहे. गरज आहे अशा निवडक नवयुवकांची जे भूमीच्या कुचंबणेला आकाशाच्या गडगडाटाचं रूप देऊ शकतील, जे रूढीविरुद्ध आवाज उठवतील, जे आर्थिक प्रश्नांवर डोकेफोड करू शकतील. मी समितीच्या ग्रंथालयात मार्क्स, लेनिन, स्पेन्सर, रसेल इत्यादींच्या ग्रंथांचा अभ्यास करायला लावणार आहे. एक नवा प्रकाश, एक नवीन मानसिक मंथन इंटलेक्चुअल फरमेंट.

**राय तारानाथ :** छान, छान आहे ! चर्चा तर खूप होईल. परंतु खेड्यातली गरिबी आणि घाण पाहून मन अगदी उदास होते.

**वीरेन :** (जोशात) तुम्ही अगदी योग्यच समस्या काढलीत दारिद्र्य आणि घाण ! पपा ही गरिबी आणि घाण पाहिली की माझं मन क्रोधाग्नीनं जळायला लागते. घरदार नसलेले ते आबालवृद्ध, ती भुकेलेली भिकाऱ्यांची टोळी, फाटकी 'लक्तरं' नेसलेल्या त्या बायका-या सर्वांच्या आठवणीनंसुद्धा दयेचा पूर लोटतो. परंतु दयेच्या पुढल्या क्रोधाच्या वादळाची आवश्यकता आहे. असं वादळ की ज्याला केव्हाही थांबणं माहीतच नाही. हे वादळ सारखं चालू रहावं असा प्रयत्न करणाऱ्या माणसांची जरुरी आहे—अशी माणसं की जी क्रोध वा दया यांच्या आहारी न जाता वादळाचा राग छेडत राहतील. वकिलाप्रमाणं जोशाने वादविवाद चालू ठेवतील पण अशीलापासून तटस्थ असतील.

**हेमलता :** (उपहासाने) सरोवरांतील कमळाप्रमाणं !

**वीरेन :** (त्याच आवेशात) होय. अशा लोकांचीच आवश्यकता आहे की जे या गरिबीत व घाणीत न अकडता त्यात रुतलेल्या असहाय्य दुनियेच्या इच्छा समाजासमोर हुषारीने मांडू शकतील व त्यांना आव्हानाचं रूप देऊ शकतील.' (थांबून—

भाषणबाजीवरून थोडा खाली उतरतो.) हो पण मला गेलच पाहिजे. पपा प्रथम तेथे जाऊन समितीच्या काही अडचणी सोडवायच्या आहेत. म्हणजे समारंभाच्या वेळी झगडे व्हायला नकोत...तू थोड्या वेळानं येशील नं हेमी तोपर्यंत हे चित्र चांगलं व्यवस्थित करून ठेव. बरं आहे. मी जातो. (जातो. काही क्षण शांतता)

राय तारानाथ : हीच जादू आहे हं या बीरेनची.

हेमलता : ही जादू डोक्यात भिनून बोलू लागते.

राय तारानाथ : कधी कधी मला तर शहर म्हणजे एक गुंतागुंतच वाटते. कितीतरी वर्षांनी येतो आहे...जणू चष्मा शहरातच विसरून आलोय...आणि हा बीरेन आला काय आणि गावाला जिंकून गेला काय !

हेमलता : कुणास ठाऊक पपा. त्यांनी गांवाला जिंकले की...

(चेतरामचा प्रवेश)

चेतराम : साहेब, नाश्ता तयार आहे.

राय तारानाथ : (येत आहेत) बरं आहे चेतू ! येतोच. (जाता जाता चित्रावर दृष्टी जाते) हेम ! हे चित्र तर चांगलं बनलंय.

हेमलता : थोडसं फिनिशिंग करायचं आहे.

राय तारानाथ : नाचणाऱ्यांच्या टोळीत मोठं 'लाईफ' आहे. रंगाचं सुद्धा, गतीचं सुद्धा. पण... हे कोपऱ्यात कोण लोक उभे आहेत ?

हेमलता : आपल्याला कोण वाटतात बरं ?

राय तारानाथ : (विचार करीत) जणू... जणू काही सुकलेले उदास वृक्षच. ज्यांना धरतीकडून अन्नच मिळत नाही.

हेमलता : पपा, तुम्ही सुद्धा कवीच आहात.

राय तारानाथ : (हसतात) तुझाच बाप आहे न ?... बरं मी चलतो. (जातात)

हेमलता : (विचारमग्न) सुकलेले उदास वृक्ष ! ... की भटकणारे निर्वासित प्राणी ?... नाही... आणखीच काही (चेतरामला) चेतू. जरा ते स्टूल आण. इथंच बसून जरा ठीकठाक करते.

चेतराम : (स्टूल ठेवून) हे घ्या. रंग सुद्धा इथंच ठेवू ?

हेमलता : दे. माझ्याकडे दे, आता तुला माझ्या चित्रं काढण्याच्या लहरीची चांगलीच सवय झाली असेल. (रंग तयार करत.)

चेतराम : होय बाईसाहेब !

हेमलता : हे बघ. थोड्या वेळानं हे चित्र घेऊन तुला माझ्याबरोबर यायचं आहे.

चेतराम : कुठं ?

हेमलता : बीरेनबाबूंच्या समितीचा समारंभ होतोय नं ? त्या पहाडीच्या

पायथ्याशी.

**चेतराम :** (**संकोचाने**) ताईसाहेब, मी नाही येणार तिथं.

**हेमलता :** का बरं ?

**चेतराम :** ताई साहेब, आम्ही गरीब आदिवासी तिथं वस्ती करणार होतो बांबूची रोपं लावणार होतो. मेहनत करून टोपल्या बनवणार होतो. घरं बांधणार होतो बांध झाला असता तर शेतवाडी सुद्धा...

**हेमलता :** (**चित्र काढता काढता**) पण ग्रामोद्धार समिती तुमच्याच अडचणी दूर करणार आहे की.

**चेतराम :** कुणास ठाऊक ताईसाहेब ! समितीत खूप वेळपर्यंत वादविवाद तर होतात. पण...

**हेमलता :** आणि बीरेनबाबूंच्या मनात तुमच्यासारख्या विषयी केवढी दया आहे !

**चेतराम :** (**कोणत्यातरी अज्ञात प्रेरणेनं**) आम्हाला दया नको कुणाची.

**हेमलता :** (**चकित होऊन त्याच्याकडे पहात**) दया नको ? चेतू ? हे तुला कुणी रे सांगितलं ?

**चेतराम :** (**किंचित गोंधळून**) ताईसाहेब आमचे लोचनभैया म्हणतात—

(**सडकेवरून संमिश्र स्वरात घोषणांचे आवाज**)

"ग्रामोद्धार समिती जिंदाबाद"
बी. पी. सिन्हा जिंदाबाद !
विद्रोह्यांचा नाश होवो !
ग्रामोद्धार समिती जिंदाबाद !

(**आवाज दूर होत जातो**)

**हेमलता :** चेतू हे सर्व काय चाललं आहे रे ? (**उभी राहून पहाते.**)

**चेतराम :** समारंभाकडे जात आहेत. बालेश्वरबाबूच्या पार्टीचे लोक आहेत. करमचंद बाबू यांच्यापासून अलग झालेत. आणि ते ठाकुर पार्टीला जाऊन मिळालेत.

**हेमलता :** म्हणजे ? शेवटी काल रात्री झगडा संपला नाहीच का ?

**चेतराम :** कुणास ठाऊक... पहा नं ! दुसऱ्या पार्टीचे लोकही चालले आहेत ! आता झगडा न होवो म्हणजे मिळवली.

(**सडकेवर दुसऱ्या पार्टीचे लोक घोषणा देतात**)

करमचंदांचा विजय असो.
करमचंदांचा विजय असो.
ग्रामोद्धार समिती आमची आहे.
ग्राम जागृती जिंदाबाद

स्वार्थी सिन्हा मुर्दाबाद !

(आवाज दूर जातो. . .)

**हेमलता** : (चिंतातुर स्वरात) चेतू, अरे या लोकांकडे तर लाठ्या दिसताहेत रे !

**चेतराम** : हो पहिल्या गटाकडेही लाठ्या होत्याच की.

(पडद्याआडून हाका मारीत आया प्रवेश करते.)

**आया** : चेतू, अरे चेत्या, जरा बघ तर बाहेर काय गोंधळ आहे तो ?

**चेतूराम** : बालेश्वर बाबू आणि करमचंद दोघांचे गट बीरेनबाबूंच्या समारंभाला गेले आहेत. . .

**हेमलता** : लाठ्या काठ्यांनी अगदी सज्ज होऊन !

**आया** : आणि चेत्या, तू इथंच उभा ? अरे धावत जाऊन पहारेकऱ्याला पोलीस ठाण्यावर खबर देऊन यायला सांग लवकर. लाठी चाललीच तर प्रथम बीरेनबाबू घेरले जातील . . जा, धावत जा आधी . . .

(चेतू जातो . . .)

**हेमलता** : मीही जाते आया. तिकडे बीरेन एकटेच आहेत.

**आया** : नाही ताईसाहेब. तुम्हाला मुळीच जाऊ देणार नाही मी. (चेतरामला हाक मारीत) चेतू, अरे येताना समारंभाच्या ठिकाणी डोकावून पहा काय प्रकार आहे तो (हेमलताला) बीरेन बाबूंनी कुठलं हे विकतचं दुखणं घेतलं कुणास ठाऊक.

**हेमलता** : त्यांचं म्हणणं सगळे ऐकतील असं वाटतं.

**आया** : ताईसायब. तुम्हाला या गांवंढळांच्या भानगडी काय असतात हे मुळीच माहीत नाही. भल्या भल्या माणसांचा निभाव लागत नाही इथं. आपलं कलकत्ता फार बरं होतं यापेक्षा...

**हेमलता** : आया, प्रत्येक गोष्टीत तू आपला कलकत्त्याचा जप करत असतेस...

**आया** : मग ? खरं तेच म्हणतेय् मी. तुम्हाला इथं येऊन फक्त पंधरा दिवस कुठं झाले आहेत. पहाता नं मोठे सरकार कसे कंटाळून गेले आहेत ! चौधरी आहेत म्हणून ठीक. नाही तर एक दिवस काढणं त्याना कठीण झालं असतं. आणि तुम्ही तर...

**हेमलता** : मला छान वाटत्य की इथं. किती स्केचेस् बनवली आहेत मी !

**आया** : अहो, चित्रं तर तुम्ही कलकत्त्यालाही काढली नसतीत का ? यांच्या पेक्षाही अधिक आणि उत्तम !

**हेमलता** : आया तू तर अगदी उलटंच बोलतेस बघ शेवटी आम्ही या गावचीच लेकरं आहोत. ही धरित्री आपली आई आहे. पुन्हा इथं येऊन आम्हाला रहायचंय्. हिच्या मांडीवर बागडायचंय.

**आया** : ताईसाहेब, तुम्हाला काही समजावून सांगावं एवढी हुषार मी नक्कीच नाही. पण एवढंच सांगते– उपटलेल्या मुळांना हवा लागली की त्यांना पुन्हा जमिनीत रोपणं कठीण असत. त्यांची फुलं बंगल्यातल्या फुलदाणीत शोभतील.

**हेमलता** : (**चकित होऊन आयाकडे पहात राहते**) आया तुझं बोलणं–तुझं बोलणं मोठं भयंकर आहे बघ. (**पडद्यांतून आवाज... हां इकडून या, या इकडून. सांभाळून... चेतू तू इकडून हात पकड. हं आता चला तिकडून.**)

**आया** : अं ? कोण येतंय ? (**बाहेर पहात**) अरे बापरे ! बीरेनबाबूंना पकडून आणताहेत ही माणसं ! जखमी झाले की काय ? ओ हो आई ग ! (**धावत बाहेर जाते**).

**हेमलता** : ( **घाबरून**) बीरेन ऽ ! बीरेन ऽ ऽ! (**बंगल्याकडे पहात**) पपा ऽ! पपा ऽ ऽ!! इकडे या. (**पडद्यात... काय झालं ?** ) बीरेन जखमी झालेत. अग आई ग ऽ ऽ!

(**चेतराम आणि आणखी एक माणूस बेशुद्ध बीरेनला लाठयांच्या स्ट्रेचरवरून सांभाळून आणतात. तो अनोळखी माणूस यावेळीही शांतचित्त वाटतो. पोषाख चेतराम सारखाच.**)

**आया** : (**घाबरलेली**) अरे चेतू, हे तर बेशुद्ध आहेत. अरे देवा ! (**स्ट्रेचर जमिनी· वर ठेवतात**).

**अनोळखी माणूस** : हं. घाबरण्याचं काही कारण नाही.

**हेमलता** : (**स्ट्रेचरवर वाकून**) बीरेन, बीरेन ऽ ऽ (**राय तारानाथ गडबडीने प्रवेश करतात**).

**राय तारानाथ** : काय झालं ? अरे ? हा तर बेशुद्ध आहे. चेतू काय झालं तरी काय ?

**चेतराम** : साहेब दोन्ही गटात मारामारी सुरू झाली. बीरेन बाबू मध्ये पडले. बरं तर बरं, लोचनभैयानी जिवावर उदार होऊन बीरेनबाबूंना वाचवलं ! नाही तर आज...

**लोचन** : यांना ताबडतोब आत न्या बरं ! पट्टी बांधावी लागेल.

**हेमलता** : बीरेन ऽ ! ए बीरेन ऽ ऽ! बीरेन !

**राय तारानाथ** : आया, चेतू, याना ताबडतोब आत घेऊन जा. चेतू संभाळून ने हं. हेम, माझ्या कपाटात वरच्या कप्प्यात लोशन आहे बघ. हं लवकर...

(**बीरेनला उचलून आया, चेतराम आणि हेमलता आत जातत.**)

**राय तारानाथ** : हा लोचन कोण आहे ?

**तो माणूस** : माझंच नाव लोचन आहे.

**राय तारानाथ** : आपण फार मोठा पराक्रम केला आहात. हे दहा रुपये घ्या. धावत जाऊन ठाण्याजवळ डॉक्टर आहेत त्यांना घेऊन या बरं !

**लोचन** : रुपये राहू द्यात. मी येताना डॉक्टरना बोलवलंय केव्हाच. येतच असतील–

**राय तारानाथ** : **(संकोचाने)** हो... हो **(जातात)**

**(कमरेला बांधलेला कपडा फाडून लोचन आपल्या हातावरच्या वहात्या जखमेवर पट्टी बांधतो. चित्र सरळ करतो.–लक्षपूर्वक पहातो. इतक्यात हेमलता येते.)**

**हेमलता** : तुमचंच नाव लोचन ना ?

**लोचन** : हो.

**हेमलता** : आम्ही तुमचे फार फार आभारी आहोत. तुम्ही बीरेनचे प्राण वाचवलेत **(आनंदाने)** ते शुद्धीवर आलेत.

**लोचन** : **(स्पष्टपणे)** हे पहा मी प्राण वाचवले असं काही म्हणता येणार नाही.

**हेमलता** : अरे ? तुमच्या दंडावर तर जबर जखम दिसते आहे !

**लोचन** : ज्या आदिवासींची जमीन हिरावून घेऊन बीरेनभाई ग्रामोद्धार समिती भवन बनवीत आहेत त्या गरीब आदिवासींनीच त्यांचा जीव वाचवला. समितीचे क्रांतिकारी तरुण लाठ्या चालवू लागले तेव्हा हे आदिवासी माझ्याबरोबर पुढे झाले. **(उपहासाने हसत)** आणि त्यामुळेच क्रांतीचा हा दीपक वाचला !

**हेमलता** : **(संकोचाने)** तुम्ही सुशिक्षित दिसता !

**लोचन** : सुशिक्षित ? **(हसत)** म्हटलं तर आहे, म्हटलं तर नाही. बरंय् निघतो मी. . . हे चित्र तुम्हीच काढलंत ना ?

**हेमलता** : हो. का ? त्यात काही उणीव दिसते का ?

**लोचन** : छे. छे. तुम्ही आमच्या नाचाची गती रेषात आणि रंगात छान पकडली आहे. आणि

**हेमलता** : आणि काय ?

**लोचन** : ती कोपऱ्यात उभी सावलीत हरवलेली माणसं. . .

**हेमलता** : त्यांच काय ?

**लोचन** : **(स्पष्टपणे)** जणू आपल्याच शृंखलांनी बद्ध झालेले कैदी !

**हेमलता** : कैदी ? कैदी का म्हणता ?

**लोचन** : ते पुन्हा कधी तरी सांगेन बरंय् नमस्ते.

**हेमलता** : **(आश्चर्याने पहाते. मग चित्र उचलून घराकडे नेऊ लागते)** कैदी ? आपल्याच शृंखलांनी बद्ध झालेले कैदी !

## (दृश्य तिसरे)

(स्थळ तेच. एक आठवडा लोटल्यावर. नोकर घरातून सामान आणताना दिस- तात. कधी आया, चेतराम यांचा आवाज. कधी इतर लोकांचा)

"तो बिछाना दोघांनी पकडा."

"जरा संभाळून चला रे बाबांनो."

"बॉक्स मध्ये- कांच सामान आहे."

"हं. लवकर. उचला पाय भराभर."

"ही टोपली दुसऱ्या हातानं पकडा."

(आया घाईघाईने घरातून येते. बाहेरून चेतराम येतो.)

आया : सगळं सामान ठेवलंस ना चेतू ?

चेतराम : होय आया फक्त मोठया साहेबांची अटॅची राहिली आहे. ते आले की झालंच सगळं.

आया : साहेब कुठे गेले आहेत ?

चेतराम : चौधरींचा निरोप घ्यायला. त्यांनाही खूप मोठी जखम झाली आहे असं ऐकलंय.

आया : आता आपल्याला करायचंय् काय ? कलकत्याला आम्ही गेलो की सुटका झाली असे समजू.

चेतराम : सुटका ?

आया : तू मूर्ख आहेस चेतू. चल कलकत्याला. मजेत राहशील. मोठया वैभवात लोळशील. सुखी होशील.

चेतराम : गाव सोडून ? छे. अहो, नोकरीच करायची तर ती गावातच करीन की,

आया : अरे शहरात नोकरी नाही केलीस तरी रिक्शा चालवून दीड दोनशे रुपये महिन्याला मिळवशील.

चेतराम : दीड-दोनशे ?

आया : मग ! आणि शिवाय रोज सिनेमा काय, हॉटेल काय, चहा काय ! झगमगणारे रस्ते, महाल-मोठया थाटात राहशील बाबा.

चेतराम : (विरक्त चेहरा) दुसऱ्याचं खायचं. भाडयानं रहायचं, भाषा सुद्धा दुसऱ्याचीच बोलायची ! छे . . .

आया : मर्जी बाबा तुझी. भोग तर मग खेडयांतली संकट.

चेतराम : लोचनभैया तर म्हणत होते . . .,

**आया** : होय रे लोचनभैय्याच्या वकिला, पुरे कर लोचनपुराण. जा आत जाऊन पहा बीरेनभाई तयार झाले असतील तर त्यांना आधार देऊन घेऊन ये. हेमताई तयार झाल्या. न ?

**चेतराम** : पहातो.

**आया** : (जाता जाता) सामान पहा नीट ठेवलंय् की नाही. गावातले हे गावंढळ लोक. (बाहेर जाते.) (**थोड्याच वेळात राय तारानाथ आणि लोचन गप्पा मारीत येतात.**)

**राय तारानाथ** : लोचन भैया. मी काही इथं राहू शकत नाही आता. बरं झालं आम्ही जाताना तुम्ही आलात. वीरेनने तर तुम्हाला पाहिलंच नाही. जाताना त्या दिवशी तुम्ही केलेल्या उपकाराबद्दल . . .

**लोचन** : मला वाटलं होतं तुम्ही लोक रहाल इथं ..

**राय तारानाथ** : रहाल इथं ? इथंच दिवस घालवावेत म्हणून आम्ही आलो होतो. पण एकाच महिन्यात चांगलच कळून चुकलं की आम्ही किती निर्वासित आहोत इथं. पूर्वीच जग बदललं आणि ज्या समाजात रहायला आलो तोही स्वप्नासारखा ठरला. चौधरी हा त्या स्वप्नातला एक तुकडा. आता त्यांनाच भेटून आलो. त्या दिवशीच्या भांडणांत बालेश्वरनं त्यांच्या शरीरावरच वार केला असं नव्हे तर त्यांच्या हृदयाचेही तुकडे तुकडे केले.

**लोचन** : बालेश्वर म्हणजे काही गावची नवी पिढी नव्हे.

**राय तारानाथ** : (**निराशेनं**) कुणास ठाऊक नवी की जुनी मला आपलं वाटतं— रयतेच्या सुखदुःखांत मदत करणारा जमीनदार. पूर्वजांचे अनुभव जतन करून ठेवणारे वृद्ध. बेफिकिरीनं हसणारे व वयोवृद्धांचा आदर करणारे तरुण. . . हे जग झपाट्यानं नष्ट होतं आहे. मी या गावात राहून काय करू ? शहर...

**लोचन** : शहराची ओढ लागलीय् तुम्हाला, रायसाहेब.

**राय तारानाथ** : (**विवशतेने**) कदाचित तुमचं म्हणणं खरंही असेल. शहरच मला ओढत असेल

**लोचन** : आणि आपण निरुपाय होऊन ओढले जात आहात.

**राय तारानाथ** : (**दुःखी चेहऱ्यानं**) निरुपायानं ! . . .निरुपायानं ! असं नका बोलू लोचन. आम्ही जात आहोत. . . कारण—

**(चेतरामचा आधार घेत बीरेन येतो. बरोबर हेमलता आहे.)**

**बीरेन** : पपा, आता तुमच्या मुळेच खोळंबलोय्.

**राय तारानाथ** : (**सुटकेच्या आविर्भावात**) कोण ? बीरेन, हेम ? अरे तयार झालात का तुम्ही ? मग मीही घेऊन येतो माझी अटॅची . . चेतू तू चल माझ्याबरोबर

**(घराकडे जातात बरोबर चेतराम)**

**लोचन** : **(हेमलताला)** नमस्कार.

**हेमलता** : कोण ? . . ओहो तुम्ही ? बीरेन हे लोचन. यांनीच त्या दिवशी तुला वाचवलं.

**बीरेन** : ओहो ! त्या दिवशी तुम्हाला नीट पाहिलं नव्हतं. पण **(लक्षपूर्वक पहात)** तुम्ही ओळखीचे वाटता.

**लोचन** : **(हसत)** हं. जरा जोरात प्रयत्न करा—कदाचित् ओळखालही.

**बीरेन** : **(विचार करीत)** तुम्ही . . . तो . . . पण छे. तो तर कुठल्याशा मोठ्या घराण्यातला मुलगा होता.

**हेमलता** : कोण ?

**बीरेन** : माझा कॉलेजमधला एक मित्र एल् एस्. परमार. तुमचा चेहरा त्याच्या सारखाच....

**लोचन** : **(हसत)** एल्. एस्. परमार—लोचनसिंह परमार.

**बीरेन** : **(आश्चर्यानं)** आं ? परमार परमार ?

**लोचन** : **(स्थिर आवाजात)** हो, मीच तो परमार-

**हेमलता** : बीरेन हे तुमच्या कॉलेजातले तुमचे वर्गमित्र आहेत ?

**बीरेन** : **(लोचनचा हात पकडून)** खरं नाही वाटत...इतक्या दिवसांनी या खेडवळ वेशात आदिवासी लोकांत तुला पाहिन असं वाटल नव्हतं. कॉलेज सोडून तर तू असा गायब होऊन राहिला होतास.

**लोचन** : **(थोडेसे हसत)** एक दिवस मी तुम्हाला सोडलं होतं...आता तुम्ही मला सोडून जाता आहात.

**बीरेन** : लोचन मी जातोय्. कारण आपले कोसळलेले आदर्श माझ्यानं पहावात नाहीत.

**लोचन** : आदर्श ? असे कोणते तुझे आदर्श कोसळलेत या गावात ?

**बीरेन** : क्रांतीचा आदर्श परमार. मी एक गोष्ट विसरलो होतो. मध्ययुगीन खेड्यातली ही ओसाड भूमी क्रांतीसाठी अजून तयार झाली नाही. क्रांतीसाठी आवश्यक आहे शहर आणि त्यातल्या कारखान्यांतली जागृत उत्साही भूमी.

**लोचन** : **(तीव्र दृष्टीने)** बीरेन तू पळतोय्स बघ.

**बीरेन** : मी लाठीमाराला नाही भीत लोचन.

**लोचन** : तू लाठ्यांना घाबरून पळतोस असं माझं म्हणणं नाही. तू पळतोय्स नटबाजी, अंधविश्वास भांडणं, तंटे यांच्या चिखलाला घाबरून, तुम्ही हे सर्व एका झटीत पार करू पहात होता. **(गंभीर आव्हानात्मक सुरात)** तू पाठ दाखवतोयस

बीरेन...

**बीरेन** : (हट्टाने) मी पाठ दाखवतोय् ? छे छे हे चुकीचं आहे. मी जातो... आम्ही जातो...कारण...

**(घाईने आया येते)**

**आया** : हेमताई, बीरेन बाबू. तुम्हाला निघायचं नाही का ? मोठे साहेब कुठं गेलेत ? तुम्ही पण कमालच करता सगळे !!

**(राय साहेबांचा प्रवेश–बरोबर चेतराम अटॅची घेऊन)**

**राय तारानाथ** : हा काय मी आलोच चला. बीरेन तू चेतूचा आधार घेऊन पुढे चल. पहिल्यांदा तुला बसायचंय्.

**बीरेन** : बरंय् परमार मी निघतो. पुन्हा कधी तरी...

**लोचन** : पुन्हा कधी तरी ? (हळूच हसत) पुन्हा कधी तरी ?

**(आया अटॅची घेते. चेतूच्या आधारानं बीरेन बाहेर जातो. मागून आया.)**

**राय तारानाथ** : बरंय् लोचन मी पण निघतो. तुझं म्हणणं खरं असण्याची शक्यता आहे...

**लोचन** : मी तुम्हाला थांबवू शकलो असतो तर किती बरं झालं असतं ?

**राय तारानाथ** : हेम, तुझं चित्र तिथं कोपऱ्यातच राहील हं ?

**हेमलता** : ते आणते मी पपा. तुम्ही दोघे स्टेशनवर जा. सगळेच काही एका खेपेस जाऊ शकणार नाहीत. माझ्यासाठी टांगा पुन्हा पाठवून द्या.

**राय तारानाथ** : ठीक आहे. अच्छा लोचनसिंह. मजेत रहा बरं. **(जातात)**.

**लोचन** : हेमलताजी तुम्हीही जाणारच ?

**हेमलता** : नाइलाज आहे.

**लोचन** : मला ठाऊक आहे. बीरेनचा मोह !

**हेमलता** : तसंच नाही काही. बीरेनला मी इथं ठेवून घेऊ शकले असते पण . . .

**लोचन** : पण काय ?

**हेमलता** : (**सत्याच्या आकलनामुळे उजळलेला चेहरा**) एक गोष्ट अशी आहे लोचन, जी पपांनाही कळली नाही. बीरेनलाही समजली नाही. पण मला थोडी थोडी समजते आहे. पपा या गावी परतले. ते प्रतिष्ठा आणि विश्रांती लाभावी म्हणून. बीरेनला बनवायचं होतं हे गाव एक क्रांतीचं केंद्र. आणि मी... मी गावच्या मोहक सृष्टीच कल्पनेचे मोहक महाल उभे करायला उतावीळ झाले होते.

**लोचन** : महाल नष्ट होण्यासाठीच बनत असतात हेमाताई.

**हेमलता** : हे मला कळलं आहे. आम्ही तिघेही समजू शकलो नाही ते हे की आमची मुळं तुटली आहेत. गावच्या दृष्टीनं आम्ही परके झालो आहोत. (**भावना-**

वेगानं) तुम्ही सुद्धा ही द्विधा मन:स्थिती, ही गुंतागुंत, ही पीडा यांनी विद्ध झाला नाहीत का? एका बाजूला गांव, दुसऱ्या बाजूला नागर शिक्षा दीक्षा आणि संस्कृतीची जबरदस्त पकड. ओह् ! किती भयंकर आहे ही दरी ! आमचं शरीर, आमचं मन, आमचं व्यक्तित्व सर्वच कसं दुभंगून गेलय्. सांगा तुम्ही हे दुभंगलेपण कसं संपवायचं? धरणीचा स्पर्श तिचा गंध कसा काय भोगू शकणार आहोत आम्ही? सांगा...सांगा न...!

**लोचन :** आपल्या प्रश्नांची उत्तरं माझ्याकडे आहेत हेमलताबाई. (**कुदळ हातात घेऊन–उंचाऊन**) हे पहा.

**हेमलता :** कुदळ ?

**लोचन :** हो... ही कुदळ आणि हे कष्ट करणारे हात. हाच तो जादूचा मंत्र आहे ज्यानं तो तुरुंग फोडण्याचा मी प्रयत्न केला आहे.

**हेमलता :** तोडू शकलात ?

**लोचन :** प्रयत्न चालू आहे.

**हेमलता :** हिम्मत तर संपली नाही ना ?

**लोचन :** संपते... कधी तरी... त्या वेळी मानसचक्षूंसमोर पसरतो...

**हेमलता :** अंधार ?

**लोचन :** नाही. अंधार नाही. अंधार पसरलाच तर एखादा दिवा तरी लावता येईल. अंधार नाही पण मृगजळाचा प्रकाश एकापाठोपाठ एक...चमकणारे थर आणि चहू बाजूला वाळवंट–जिथं पहाल, जिथवर पहाल–एकच दृश्य. तेच निमंत्रण चमकणाऱ्या थरांचं निमंत्रण. लवलवणाऱ्या जिभांचं आवाहन...

**हेमलता :** (**आश्चर्यानं**) लोचनबाबू. .!

**लोचन :** (**त्याच आवेगात**) त्या जिभा जणू सांगतात. तुम्ही जे कोणी होतात, ते होतात कधीकाळी. आता आम्ही आहोत आणि तुम्ही आहात...जो मातीचा दिवा तुम्ही लावू पहात होता तो तोडून टाका. जिच्या प्रकाशात लखलखाटाचा भुलावा दिसावा. ती शक्तीच मुळी त्या तेलात नाही. आम्ही तुम्हाला चकवे देणार ..मनमोहक चकवे, पुऱ्या न होणाऱ्या इच्छांचे मखमली चकवे, अर्धमृत इच्छांचा मीना बाजार मीना बाजार ! व्हॅनिटी फेअर ! व्हॅनिटी फेअर !

**हेमलता :** थांबा लोचन !

**लोचन :** घाबरलात ?

**हेमलता :** नाही !

**लोचन :** मग.. मग थांबाल इथे ? इथली घाण आणि संघर्ष यांच्या खाली

असलेल्या धरतीचा गंध आणि स्वर्ग अनुभवण्यासाठी ? सांगा नं . . म्हणानं 'थांबते' म्हणून !

**हेमलता** : नाही लोचन.

**लोचन** : **(दूर होत)** मला माहीत होतं हेमलताबाई.

**हेमलता** : नुसतं 'हेम' म्हणा नं !

**लोचन** : नाही हेमलताबाई. तो अधिकार बीरेनबाबूंचा तो नाही मी. बळकावणार.

**हेमलता** : त्याशिवाय ही तुम्ही मला जवळचे आहात लोचनबाबू.

**लोचन** : वा. छान. ओठांवर हसू, कपाळावर आठ्या, होकार पण आणि नकार पण.

**हेमलता** : नकार ! फक्त नकार ! अशासाठी की काही क्षणापूर्वी मला वाटलं होतं की आमचीच मुळं उखडली आहेत . . . गावाच्या दृष्टीनं मी परकी झालेय्. आणि धरतीच्या अमृताचा घोट तुम्ही घेतला आहात. पण . . . पण असं नाही. धरतीचा गंध आणि स्पर्श याची पहचान असूनसुद्धा ज्या अगदी आतल्या झाऱ्याचं पाणी तुम्ही ओढून घेत आहात, ते परकेच आहेत. गावाच्या धरतीचे स्वच्छंद पुत्र तुम्हाला काही म्हणता यायचं नाही. उलट तुम्ही सुद्धा माझ्यासारखेच आहात . . . कैदी . . . कैदी ! !

**लोचन** : **(विद्ध)** हेम !

**हेमलता** : घाव बसला नं ? मला माहीत होतंच. पण शृंखला ओढल्या की दुःख व्हायचंच आणि तरी सुद्धा शृंखला खणखणवणं आवश्यक आहे. ढोंगाचा पडदा खसखसा हलवलाच पाहिजे.

**लोचन** : ढोंग ? . . . कोणतं ढोंग ? हेमलता...हेम हे तू काय म्हणते आहेस ?

**हेमलता** : जे तुम्हाला तुमच्या अस्तित्व केंद्रापासून दूर नेऊ पहातं आहे, आपल्या सच्च्या स्वरूपापासून दूर नेऊ पहातंय्. ते ढोंग...तुमचं बोलणे घाबरवणारं नव्हतं . . . त्यांत तुमच्या व्यथांची कथा मला ऐकू आली. त्यात तुमच्या विवशतेचा उच्छ्‌वास मला जाणवला. तुमच्या जखडलेल्या आत्म्याची हाक त्यात होती. तुमच्या एकाकी अस्तित्वाचा थरकाप त्यात होता.

**लोचन** : थांब हेम . . . पुरे कर. . . इतक्या निर्दयपणानं त्या गाठी हाताळू नकोस.

**हेमलता** : **(लोचनच्या खांद्यावर हात ठेवून-तरलपणे)** तुमच्या या द्विधेत, या व्यथेत मला आपलेपणा जाणवला लोचन.

**लोचन** : **(दुःखी स्वरात)** तुला माहीत नाही हेम, मी किती तप केलंय त्या

दुर्बलतेवर मात करण्यासाठी ! फावडं आणि नांगर चालवून, कुदळीच्या श्रमांत स्वतला: बुडवून घेऊन, धरतीचं रहस्य पुन: मिळवण्याच्या आतुर इच्छेनं किती मन:पूर्वक मी आपले संस्कार धुवून टाकण्याचा प्रयत्न केला.

**हेमलता :** मला कळलंय ते. आणि म्हणूनच तुम्ही बाहेरच्या भिंती तोडू शकलात...आणि हा तुरुग ज्या तऱ्हेनं मला घेरून आहे, तसा तो तुम्हाला नाही. आणि तरी सुद्धा लोचन, तरी सुद्धा आपण दोघे कैदीच आहोत मी आपली कला, कुटुंब आणि आरामाची कैदी आहे. तुम्ही आपल्या सूक्ष्म, गहन विचारांचे, आपल्या कल्पनांचे, संस्कारांचे कैदी आहात...आणि आम्हा दोघांनाही कदाचित कैदी म्हणूनच जगायचं आहे.

**लोचन** : का ? आम्ही कैदी का रहावं ? का ? का ??

**हेमलता** : आपल्याला कैदी म्हणूनच रहावं लागेल कारण आपल्या प्रामाणिक-पणाची ती मागणी आहे. **(थोडं थांबून)** मी जाते लोचन ! ...हे चित्र इथंच ठेऊन जाते. तुमच्यासाठी.

**लोचन** : मला माझ्या असहायतेची जाणीव देण्यासाठी ?

**हेमलता** : तसंच समजा हवं तर. पण जेव्हा कधी ठिणगीची आच असह्य होईल तेव्हा कलकत्त्याला अवश्य या...ठिणगी दाबून ठेवणं बरं नाही **(जाते)**

**(लोचन काही सांगण्यासाठी हात उंचावतो पण पुन: थांबतो. चित्र दोन्ही हातांनी पकडतो. छातीपासून दूर धरून त्याच्याकडे टक लावून पहातो.)**

**लोचन** : **(काही वेळ टक लावून पाहिल्यावर)** मी ती आग सहन करीन त्या ठिणगीला ज्वाला बनायला लावीन—ती मला होरपळून टाकील टाकू द्या.

**(चेतरामचा प्रवेश. लोचनला तो दिसत नाही.)**

चित्रांतल्या कैद्यांनो ! तुम्ही असे कायमचे बांधल्यासारखे का उभे आहात ? अशासाठी...

**चेतराम** : लोचन भैय्या !

**लोचन** : अशासाठी की ग्रामीण नर्तकांनी नाचावं, हसावं, खावं प्यावं ? चित्रातल्या कैद्यांनो ! तुमच्या आगीनं लोकांच्या वाटेतील झाडझुडं, काटेकुटे भस्म होऊन जावेत पण तुमच्या शृंखला मात्र यांच्या डोईवर ओझी बनून राहू नयेत...आणि आणि... उद्दिष्ट पूर्ण झाल्यावर छताचं ओझं नसलेल्या नको असलेल्या भिंतीप्रमाणं कोसळून आपोआप कोसळून जावं...! मी कोसळून जावे—मी...मीच तर !

**चेतराम : (पुढे येऊन)** लोचन भैय्या, तुम्ही चित्राबरोबर गप्पा मारता आहात !

**लोचन : (वळून चित्राकडे पाहात)** चेतराम ! **(थांबून)** विश्वास ठेव चेतराम मी गुडघे टेकणार नाही. **(चेतरामचे खांदे पकडीत)** या शृंखलांची मला रक्तबंबाळ

केलं, रस्त्यातल्या काटयांनी माझ्या तळमासांची चाळण केली तरी. .हे होऊ शकणार नाही. . .जोपर्यंत तुमच्या पुढे पडत असलेल्या पावलांसाठी मी माझं अस्तित्व बळी द्यायला तयार आहे तो पर्यंत हे होणं नाही. नाही. मी शरणागती पत्करणार नाही.

**चेतराम : (अतीव करुणेनं भारून)** लोचनभैया, आपल्या जमिनीवर नाही का चलायचं ?

**लोचन : (जणू झोपेतून जागा झाल्यासारखा)** अं ? . . .

**चेतराम :** पुष्कळ कामं आहेत भैया आता ती पायथ्याची जमीन परत मिळाली आहे ना ? . . .

**लोचन : (खोल आवाजात)** बरोबर आहे. चला खोदणं सुरू करू या.

**चेतराम : (भरलेल्या आवाजात)** कदाचित–कदाचित तुम्हाला आराम करायला हवाय् भैया,

**लोचन :** आराम ? नाही चेतराम ! चला. मला माझ्या घामाच्या आरशांत कधीच नष्ट न होणारी छाया पहायची आहे. **(कुदळ घेतो)** चला. **(अंधार)**

**(पडदा पडतो)**

## पात्रे

पहिली व्यक्ती
दुसरी व्यक्ती (तरुण)
बेयरा

(स्थळ–कॉफी हाऊस)

(कॉफी हाऊसमधली एक खोली. एक टेबल आणि एकच खुर्ची. पडद्याआड तीन व्यक्तींची आपआपसात बोलाचाली. पायजमा, कुडता घातलेली ३५ वर्षांची एक व्यक्ती लगबगीने येते आणि धावत जाऊन खुर्चीवर बसते. त्या व्यक्तीच्या मागोमाग २५ वर्षे वयाची शर्ट–पॅन्ट घातलेली दुसरी एक व्यक्ती येते. तिला पाहताच पहिली व्यक्ती आपले कागदपत्र भराभर टेबलावर ठेवते.)

**पहिली व्यक्ती** : (अधिकाराने) बेयरा...!

**बेयरा** : (येतो) जी साब ..बोला...काय हुकूम आहे !

**पहिली व्यक्ती** : एक कॉफी, तीन ग्लास पाणी...एक कॉफी...तीन पाणी... एक कॉफी, तीन पाणी...!

(बेयरा देखील हेच शब्द पुन्हा उच्चारतो. तो त्या व्यक्तीला पुढे बोलूच देत नाही. एक कॉफी, तीन पाणी...म्हणत जातो)

**पहिली व्यक्ती** : मी इथं रोज बसतो. १३ वर्ष झाली. माझी बसण्याची जागा हीच ! ही गोष्ट जिथं सगळ्या जगाला माहिती आहे तिथं एखाद्याला माहीत नसली तर त्याला मी काय करणार ?

**दुसरी व्यक्ती** : तुम्ही खोटं बोलता आहात. गेले सहा दिवस मी इथं रोज बसतो आहे. इथं एकच खुर्ची असे. मी इथं बसून तिची वाट पहात असे. ती येई आणि मग आम्ही समोरासमोर बसून गप्पा मारीत असू.

(पहिली व्यक्ती टेबलावर आपले लिहिण्याचे साहित्य लावून ठेवू लागते)

**पहिली व्यक्ती** : मी इथं बसून माझं काम करतो ..

**दुसरी व्यक्ती** : मीसुद्धा माझ्या कामासाठीच इथं आलो आहे...

**पहिली व्यक्ती** : गप्पा मारणं म्हणजे काही काम करणं नव्हे.

**दुसरी व्यक्ती** : इथं बसून लिहिणं–वाचणं म्हणजेसुद्धा काही काम करणं नव्हे.

**पहिली व्यक्ती** : तुम्ही अजून वाचन करता ?

**दुसरी व्यक्ती** : तुम्हाला काय त्याचं ?

**पहिली व्यक्ती** : आपल्या देशाचा इतिहास वाचला आहे कधी ?

(दुसरी व्यक्ती सिगरेट शिलगावते आणि रागारागाने एका बाजूला पहात राहते.)

**पहिली व्यक्ती** : गंमतच आहे ! आजकालचे तरुण आपल्या देशाच्या इतिहासाचं

नाव काढल्याबरोबर सिगारेट फुंकायला लागतात. आमच्या वेळी असं नव्हतं आम्ही इतिहास जगलोय, भोगला आहे. आणि इतिहासाचे महान अध्याय घडवले आहेत. आम्ही स्वातंत्र्य संग्राम ..

**दुसरी व्यक्ती** : (**मध्येच थांबवून**) गप्प बसा हो ! हे सगळं ऐकवण्यासाठीच इथं रोज येता वाटतं ?

**पहिली व्यक्ती** : (**उठून**) आणि तुम्ही काय इथं राग काढण्यासाठी येता होय ? (**थांबून**) मला एक सिगारेट देणार का ? (**घेऊन**) बापरे, केवढी स्ट्रॉंग सिगरेट ओढता हो ? आमच्या वेळो अशी सिगारेट ओढायची पद्धत नव्हती. आम्ही या वयात सत्याग्रही होतो. आमच्या समोर एक महान ध्येय होतं .काही अस काही ध्येय होतं, जे प्रत्येक वेळी आम्हाला इस्पायर करत असे. (**असं म्हणत टेबलाला टेकून उभा राहतो, सिगरेट ओढतो आणि धूर सोडून त्याकडे पहात बोलू लागतो.**)

**पहिली व्यक्ती** : धुराची अनेक वलय आहेत पहा कशी वेगवेगळी होत हवेत पसरून विरून जाताहेत हा परिसर जणू एक मोठी पाल आहे आणि ही सारी वलयं ती जिभेनं चाटत चालली आहे.

**दुसरी व्यक्ती** : (**सिगरेट विझवीत**) कशाला उगाच आल्या आल्या बोअर करताहात ?

**पहिली व्यक्ती** : आम्ही त्यावेळी सिगारेट ओढत नव्हतो. कॉफीचे नावसुद्धा ऐकलं नव्हतं. पहिल्यांदा नाव ऐकलं ते १९४४ मध्ये–आमच्या सुराजी गुरूंनी तेरा दिवसाचं उपोषण सोडलं होतं–आत्मशुद्धीचं उपोषण–गोऱ्या कलेक्टरनं त्यावेळी त्यांना आपल्या हातांनी कॉफी पाजली होती.

(**बेयरा येतो**)

**बेयरा** : एक कॉफी...तीन ग्लास पाणी...

**पहिली व्यक्ती** : कमाल आहे या लोकांची...यांना कोण समजावणार...यांना कोण सांगणार...या लोकांना एवढा निष्कारण राग येतो...

**दुसरी व्यक्ती** : गप्प बसा...हो !

(**या ओरडण्यानं सारं वातावरण जणू झणाणून जातं आणि क्षणभर स्तब्ध होतं.**)

**दुसरी व्यक्ती** : इथं आणखीन एक खुर्ची होती.

**पहिली व्यक्ती** : होती ! ...म्हणजे ही इतिहासकालीन गोष्ट झाली–आणि पूर्वी काय नव्हतं ते सांगा !

**दुसरी व्यक्ती** : इथली ती खुर्ची कुठं आहे ?

**बेयरा** : आत आहे आणि त्यावर एक सज्जन गृहस्थ बसले आहेत.

**दुसरी व्यक्ती** : पण ती खुर्ची इथली होती.

**बेयरा** : साहेब, त्या खुर्चीवर एक सज्जन गृहस्थ बसले आहेत.

**दुसरी व्यक्ती** : त्या सज्जन गृहस्थाला सांग...

**बेयरा** : त्यांना कमी ऐकू येतं साहेब.

**दुसरी व्यक्ती** : तर मग मी लिहून देतो...

**बेयरा** : त्यांना कमी दिसतं साहेब.

**(पहिली व्यक्ती कॉफी पिऊ लागते )**

**पहिली व्यक्ती** : खरं म्हणजे त्या सज्जन गृहस्थाला आपण ओळखत नाही. त्यामुळेच आपल्याला एवढा राग ! मी त्यांना गेली २५ वर्षं ओळखतो...

**दुसरी व्यक्ती** : मग आपण त्यांच्याजवळच जाऊन का नाही बसत ?

**पहिली व्यक्ती** : हीच विनती मी तुम्हाला करू इच्छितो आहे. . .आपण त्या सज्जन गृहस्थांना ओळखत नाही. हेच त सुराजी गुरू. ते इथं घडीघडी कॉफी पितात. आणि त्यांच्याभोवती नेहमीच घोळका असतो.

**दुसरी व्यक्ती** मला त्यांच्याबद्दलची काहीही माहिती नको आहे.

**पहिली व्यक्ती** : त्यांचीही हीच इच्छा आहे.

**दुसरी व्यक्ती** : ही माझी इच्छा आहे.

**पहिली व्यक्ती** : हीच त्यांची इच्छा आहे.

**दुसरी व्यक्ती** : मला कुणाचीच पर्वा नाही.

**पहिली व्यक्ती** : त्यांनाही कुणाचीच पर्वा नाही.

**दुसरी व्यक्ती** : मी पाहतो आहे. . .

**पहिली व्यक्ती** : तो आम्हाला पाहतो आहे.

**दुसरी व्यक्ती** : त्याला जबरदस्तीनं उठवून मी खुर्ची घेऊन येतो. ती खुर्ची इथली आहे मी गेले सहा दिवस सतत त्या खुर्चीत बसत आलो आहे.

**बेयरा** : (**थांबवून**) साहेब, ते सज्जन गृहस्थ इथे गेली २० वर्षं सतत त्या खुर्चीवर बसत आले आहेत.

**दुसरी व्यक्ती** : गेले सहा दिवस आम्ही इथं बसतो आहोत. इथं ती बसत असे...मी इथं बसत असे.

**बेयरा** : खरं आहे आपलं. ते सहा दिवस इथं नव्हते.

**पहिली व्यक्ती** : (**त्याने आतापर्यंत कॉफी संपवली आहे.**) अरे भाई, गेले सहा दिवस मी हॉस्पिटलमध्ये मेडिकल चेकअपसाठी राहिलो होतो. मला ब्लडप्रेशरचा त्रास आहे. सकाळपासून दुपारपर्यन्त 'लो' आणि दुपारपासून मध्यरात्रीपर्यन्त 'हाय्'. मला झोप येत नाही. अशा वेळी मी योगिक क्रियेने माझं ब्लड प्रेशर बदलतो. सकाळपासून दुपारपर्यंत 'हाय्' आणि दुपारनंतर 'लो' आणि मग मी झोपतो.

**दुसरी व्यक्ती :** आपली ही बडबड बंद करा. . .मला इथं बसून तिच्याशी बोलायचं आहे.

**पहिली व्यक्ती :** बेयरा, हा साहेब काय करतो आहे ?

**बेयरा :** साहेब आपल्या 'गर्लफ्रेंड'ची वाट पाहतो आहे, साहेब गर्लफ्रेंड...

**दुसरी व्यक्ती :** (रागाने) मला इथं बसायचं आहे. चला, दूर व्हा...सोडा पाहू...

**(दोन्ही व्यक्तींमध्ये खुर्चीसाठी भांडण, बेयरा धावत येतो आणि टेबलावरची कपबशी, ग्लासेस, प्लेट्स् उचलून पळत निघून जातो. टेबल आडवं झालं आहे. अजूनही खुर्ची पहिल्या व्यक्तीच्या हातात आहे. दुसरी व्यक्ती जखमी होऊन खाली पडली आहे. हातात दोन ग्लास पाणी घेऊन बेयरा येतो.)**

**बेयरा :** त्या सद्गृहस्थानं आपणा दोघांना थंड पाणी पाजायला सांगितलं आहे. ज्याला फार लागलं आहे त्यानं थोडं थांबून प्यायचं आणि ज्याला फारसं लागलेलं नाही त्यानं लगेच प्यायचं !

**(पहिली व्यक्ती पाणी पिते.)**

**पहिली व्यक्ती :** आपल्याकडे सिगारेट असेल...

**(दुसरी व्यक्ती सिगारेटचं पाकीट त्याच्या तोंडावर फेकते. तो ते घेऊन सिगारेट तोंडात धरतो.)**

**पहिली व्यक्ती :** (उठून खुर्चीवर डावा पाय ठेवत) मी स्वातंत्र्य संग्रामात लढलो आहे. देश स्वतंत्र करण्यात माझा वाटा आहे, हात आहे, पार्ट आहे. 'इन्किलाब झिंदाबाद'च्या घोषणेनं त्यावेळी माझ्या नसानसात रक्त सळसळलं आहे. 'भारत छोडो' या एका घोषणेसाठी आम्ही बलिदान केलं आहे...

**(बेयरा हळूहळू टाळी वाजवतो.)**

**दुसरी व्यक्ती :** मी इथं तुमच्यासाठी आलो नव्हतो. आणि तुमच्यासारखी बेअकली माणसं इथं असतात हे जर मला पूर्वी माहीत असतं तर मी बहुधा इथं मुळीच आलो नसतो. मी काही तुमच्यासारखा स्वातंत्र्य लढ्यात लढलो नाही. पण त्याला काय युद्ध म्हणतात ? तुम्ही बलिदान केलंत...जिथं युद्धच नाही तिथं बलिदान कसलं ?

**पहिली व्यक्ती :** अरे...स्वातंत्र्याचा लढा आणखीन कसा असतो ?...अरे...रे...रे वा–रे वा ! माझ्या पठ्ठ्या...

**दुसरी व्यक्ती :** जिथं मुळापासून लढलं जातं तेच खरं स्वातंत्र्य युद्ध...खालून वरपर्यन्त...वरून खाली नव्हे ! ज्यामुळं मूलभूत परिवर्तन होत असतं.. सुधारणा नव्हे ! 'ट्रान्सफर ऑफ पॉवर' नव्हे ! ताकदीचं एक नवं जग, जी ताकद स्वतंत्र देशातून निर्माण होत असते.

**पहिली व्यक्ती :** अरे...रे...रे...अरे...बेयरा, यांना कॉफी पाज...

**दुसरी व्यक्ती** : माझी थट्टा चालवलीत तर डोकं फोडून टाकीन...

**पहिली व्यक्ती** : खरं म्हणजे अजून तुम्हाला अनुभव नाही. तुमच्यात इतका उत्साह आहे...हे खरोखरच कौतुकास्पद आहे. मला याची मोठी कदर आहे.

**दुसरी व्यक्ती** : मला पेट्रोनाईज करण्याचा प्रयत्न करू नका. तुमच्यासारख्यांनी आमची आयुष्यं बरबाद केली आहेत.

**पहिली व्यक्ती** : काय म्हणालात...काय...थांबा...थांबा...जरा मलाही समजून घेऊ द्या ..खरं म्हणजे मी हायस्कूलचं शिक्षणही पुरं करू शकलो नाही. १९४२ मध्ये नववीत होतो...त्याचवेळी स्वातंत्र्य लढ्यात उडी घेतली...

**दुसरी व्यक्ती** : खरोखरच स्वत: उडी घेतलीत की कुणी मागून धक्का मारला आणि .

**पहिली व्यक्ती** : जरा समजू दे... समजू दे. खरंच चांगला विषय आहे हा. पहा ना त्यात कॉफी-हाऊस सारखी किती उत्तम जागा ! तुमचं म्हणणं असं आहे की मी आपल्या आयुष्याचा सत्यानाश केला ! अर्थात मी म्हणेन, त्या सज्जन पुरुषानं माझं आयुष्य बरबाद केलं.. हा फारच चांगला निष्कर्ष आहे.. या विषयावर एक १०० रुपये देणारी जोरदार कथा लिहिता येईल.

**(कागदावर भराभर नोटस् घेऊ लागतो. दुसरी व्यक्ती तो कागद हिसकावून घेऊन फाडते.)**

**दुसरी व्यक्ती** : फक्त निष्कर्ष शोधण्यात तुमच्या काळानं स्वत:ला धन्य मानलं ! परिणामी सुभाष बोसना देशाबाहेर काढलं आणि 'अरविंद'ना योगी बनवलं !

**पहिली व्यक्ती** : हे सगळं मला लिहू दे नाहीतर मी विसरून जाईन.

**(मध्येच बेयरा धावत आत जातो आणि तसाच बाहेर येतो.)**

**बेयरा** : त्या सज्जन गृहस्थांची आपल्याला नम्र विनंती आहे. आपण जरा मोठ्यानं बोलावं अशी. त्यामुळे आपलं भाषण ते ऐकू शकतील. त्यांनी आपल्यासाठी काजू बरोबरच क्रीम कॉफीचीही ऑर्डर दिली आहे.

**दुसरी व्यक्ती** : ती ऑर्डर त्यांच्याच तोंडावर फेक, जा.

**बेयरा** : ते खरोखरच सज्जन गृहस्थ आहेत. त्यांना जराही राग येत नाही.

**दुसरी व्यक्ती** : पण मला राग येतो ना.. जाऊन सांग त्यांना !

**बेयरा** : त्यांना सर्व काही माहीत आहे. सर्वांच्या कल्याणासाठी ते नेहमीच चिंतन करत असतात.

**दुसरी व्यक्ती** : तू गप्प बसतोस की नाही ?

**बेयरा** : जोपर्यन्त ते इथं बसून राहतील तोपर्यन्त इथं उभं राहणं ही माझी ड्यूटी आहे.

**दुसरी व्यक्ती** : तर मग फक्त उभाच राहा.

**बेयरा** : माफ करा साहेब, 'बोलणं' हे सुद्धा माझ्या ड्यूटीतच आहे.

**(या मधल्या वेळात पहिला गृहस्थ आपल्या बॅगेतून आणखीन काही लेटरहेड्स्, पॅडपेपर्स, रिसीट बुक्स आणि शिक्का मारण्याचे पॅड काढतो. तसेच काही पत्रे पत्रिका, हॅंडबिलस् वगैरे काढतो.)**

**पहिली व्यक्ती** : **(एकदम एक हॅंडबील वाचतो)** स्त्री-पुरुष हो ! आमचं राष्ट्रीय चैतन्य दिवसेंदिवस उत्तरोत्तर क्षीण होत चाललेलं आहे. हा एक अतिशय चिंतेचा आणि दुःखाचा विषय आहे. वैयक्तिक आणि सामाजिक स्तरांवरती आपलं क्रमशः अधःपतन होत आहे. कुटुंब असो, घर असो, ऑफीस असो किंवा शिक्षण संस्था असोत, सार्वजनिक क्षेत्रांतसुद्धा ..सर्वत्र एक इंडिसिप्लिन... इंडिसिप्लिन... इंडिसिप्लिनचे भाषांतर तुम्ही कसे कराल ?

**दुसरी व्यक्ती** : माझं टाळकं !

**पहिली व्यक्ती** : आपलं टाळकं...ए बेयरा...इंडिसिप्लिनचं मराठीत भाषांतर कसं करायचं हे त्या सज्जन पुरुषाला जाऊन विचार.

**(तो चटकन जाऊन येतो)**

**बेयरा** : ते म्हणतात--ही इंडिसिप्लिनच चालू देत. त्यांना ती फार आवडते आहे. त्यामुळे त्यांची करमणूक होते आहे.

**पहिली व्यक्ती** : **(वाचत)** तर हां, सगळीकडेच एक इंडिसिप्लिन बोकाळली आहे. यासाठी अत्यंत आवश्यकता कशाची असेल तर आम्ही जागोजागी, ठिकठिकाणी... **(एकदम दुसऱ्या व्यक्तीकडे पाहतो)** काय हो ? आपण आपले कान का बंद करून घेतलेत ? ही जाहिरात कशी वाटली आपल्याला ? ही मीच तयार केली आहे. हे पहा, मला आता खूप कामं करायची आहेत. सकाळी-सकाळीच घरातून मी एवढ्याच-साठी लवकर निघतो आणि इथं येऊन बसतो.

**दुसरी व्यक्ती** : आपल्याही आधी मी आलो आहे.

**पहिली व्यक्ती** : मित्रा, असा नाराज होऊ नकोस. आपल्या दोघांची पीडा सार-खीच आहे. आपण दोघे सहप्रवासी आहोत, संकटांत एकमेकाला साथ देणारे !

**दुसरी व्यक्ती** : तुमच्याशी बोलण्याची मला मुळीच इच्छा नाही.

**पहिली व्यक्ती** : असं बोलू नकोस. बोलणं हेच आमचं जीवन आहे. आम्ही नेहमी कामात व्यग्र तरी असतो किंवा रिकामे तरी असतो आणि हे रिकामपण भरून काढण्यासाठी तर आम्ही इथं येतो. असा गप्प बसू नकोस. ही शांतता मला खायला उठते. बोल...बोल बाबा...काहीतरी बोल...तू फार छान बोलतोस.

**(दुसऱ्या व्यक्तीला प्रेमाने स्पर्श करतो. तो लक्ष देत नाही.)**

**पहिली व्यक्ती :** अरे मित्रा, मला खूप काम करायचं आहे. इतकं काम की तुला कल्पनाच करता येणार नाही. अशाच प्रकारच्या अजून पाच जाहिराती मला लिहायच्या आहेत. तीन जाहिरातींची प्रुफं तपासयाची आहे, दोघांची 'प्रिंट ऑर्डर' द्यायची आहे. ही सगळी पॅडस् ठेवली आहेत ना, त्या साऱ्या महत्त्वाच्या संस्था आहेत. मी काहींचा मंत्री आहे, काहींचा अध्यक्ष आहे, काहींचा कोषाध्यक्ष तर काहींचा संचालक आहे. किती पत्रे लिहायची आहेत त्याचा पत्ताच लागत नाही. ही पहा, माझी आजची डायरी, या इतक्या लोकांना मला स्वत: भेटायला जायचं आहे इतक्या ठिकाणी लोक स्वत: मला भेटायला येणार आहेत. इतक्या लोकांच्या मला दुसऱ्यांशी भेटी घालून द्यायच्या आहेत... मी किती गुंतलेला आहे आणि माझ्यावर किती जबाबदारी आहे ते माझ्या बेयराळा विचार, इथं रोज येणारी पहिली व्यक्ती म्हणजे मीच असतो आणि रात्री १०–१० ला इथून जाणारी शेवटची व्यक्तीही मीच असतो .. पहिली आणि शेवटची...

**(खुर्चीवर बसून पॅडवर लिहिण्यात गर्क आहे.)**

**पहिली व्यक्ती :** (**लिहिताना एकदम**) काय म्हणत होतास?... लढा .. खालून सुरू... खालून म्हणजे ?

**दुसरी व्यक्ती :** (**अतिशय चिडलेला**) बुटांच्या लाथांनी.

**पहिली व्यक्ती :** (**लिहित**) बुटांच्या लाथांनी.(**परत थांबतो**) खालून वर... आणि वरून खाली. . . या दोन्हीत काही फरक आहे काय ?

**दुसरी व्यक्ती :** यातला फरक शोधून काढायला तुम्हाला शीर्षासन घालावं लागेल.

**पहिली व्यक्ती :** खरंच .. तरीच महापुरुष रोज सकाळी शीर्षासन घालत असत. नक्कीच यात काही रहस्य असलं पाहिजे. मी लगेच करतो.

**(शीर्षासन घालण्याचा प्रयत्न करतो. सारखा पडतो. बेयरा वरचे दोन्ही पाय धरतो.)**

**पहिली व्यक्ती :** (**घाबरून**) अरे बाप रे ! सगळी दुनिया उलटी दिसायला लागली. वरचं खाली आणि खालचं वर !

**दुसरी व्यक्ती :** आणि मध्ये काय दिसतंय ?

**पहिली व्यक्ती :** (**त्रासलेला**) शून्य . . फक्त शून्य ! सोड, सोड मला ! सोड.

**(घाबरून उभा राहतो, श्वासोच्छ्वास मोठ्याने होतो आहे.)**

**पहिली व्यक्ती :** फालतू गोष्टी आहेत या. मला यांच्याशी काहीही कर्तव्य नाही. मला खूप कामं करायची आहेत. मी तुझ्यासारखा मोकळा नाही. अजूनही माझ्या जीवनाचं एक ध्येय आहे.. मला अजूनही फार आशा आहे. प्लीज, जरा सिगारेट.

**(तोंडात पेन्सिल धरतो आणि ती सिगरेट समजून ओढतो आणि लिहू लागतो.)**

**दुसरी व्यक्ती** : (**बेयराला**) आज कॉफी हाऊसमध्ये ही एवढी चोपट गर्दी कशी काय ?

**बेयरा** : यातले निम्मे लोक तर रोजचेच आहेत, साहेब. बाकीचे नवे आहेत. उद्या-पासून तेही बसू लागतील. साहेब, . . आज कार्यालय, शाळा—कॉलेजे यांचा स्ट्राईक आहे साहेब.

**दुसरी व्यक्ती** : इथं येऊन भेटण्याचं आम्ही कालचं ठरवलं होतं. ती आलीच तर कुठं बसेल ? तुला समजल पाहिजे ती मामुली मुलगी नाही.

**बेयरा** : साहेब, ती बाहेर रस्त्यावर येऊन उभी राहिली असेल.

**दुसरी व्यक्ती** : ती कुणाची पर्वा करत नाही. ती कुणाला घाबरत नाही.

**बेयरा** : साहेब, ती कॉफी हाऊसमध्ये शिरण्याचा प्रयत्न करीत असेल.

**दुसरी व्यक्ती** : तिला कुणीच अडवू शकणार नाही.

**पहिली व्यक्ती** : (**ओरडतो**) डोन्ट डिस्टर्ब ! दिसत नाही, मी यावेळी किती कामात आहे तो ?

**बेयरा** : पण आत ते सज्जन पुरुष तसेच बसले आहेत . . . मला त्यांच्यासाठी तरी बोललं पाहिजे, ही नोकरी मला त्यांच्यामुळेच मिळाली आहे.

**दुसरी व्यक्ती** : ती या बाजूने येईल.

**बेयरा** : नाही, त्या हॉलमधून येईल.

**दुसरी व्यक्ती** : का ?

**बेयरा** : इथं ते सज्जन गृहस्थ बसलेले आहेत.

**दुसरी व्यक्ती** : कुठं बसलेत कोण आहेत ते ? काय आहे ? कशाकरिता ?

**बेयरा** : (**अडवून**) नाही, नाही साहेब, आपल्याला तिकडं जाता येणार नाही.

**दुसरी व्यक्ती** : (**आवेशाने**) जास्त बोलशील तर उचलून फेकून देईन.

**बेयरा** : साहेब, मारामारी करायला तिकडे मोठा हॉल आहे.

**(दुसरी व्यक्ती डाव्या दरवाज्यावर उभी राहून हॉलकडे पहाते आहे. हॉलमध्ये भांडण चाललंय. मारामारी. एक प्लेट दुसऱ्या व्यक्तीच्या पोटावर बसते. तो किंचाळतो)**

**दुसरी व्यक्ती** : (**व्यथित आवाजात**) हाय, मेलो. (**बेयराला**) नालायक ! तू हा दरवाजा बंद का नाही ठेवत ?

**बेयरा** : साहेब, तुम्हा लोकांचंच तर कॉफी हाऊस आहे हे.

**दुसरी व्यक्ती** : काही कारण नसताना एवढी जखम झाली त्याचं काय ?

**(तो दरवाजा बंद करायला जातो बेयरा त्याला अडवतो.)**

**बेयरा** : साहेब, मी सांगतो. हा दरवाजा असाच उघडा राहणार.

**दुसरी व्यक्ती :** (**रागाने**) मूर्खा, नालायका !

**पहिली व्यक्ती :** अहाहा ! माझी ही तिसरी जाहिरात पुरी झाली. (**वाचू लागतो**) पाळलेल्या कुत्र्यांचे अद्वितीय भव्य प्रदर्शन. या... या... ही अपूर्व संधी गमावू नका. मोठ्या संख्येनं या. आपल्या पाळलेल्या कुत्र्यांना बरोबर घेऊन या...

**दुसरी व्यक्ती :** आता हा दरवाजा बंद होणार की नाही ?

**पहिली व्यक्ती :** रामलीला मैदानात जवळजवळ दीड हजार कुत्रे येतील अशी आशा आहे. (**वाचत**) कुत्रा, माणसाच्या जवळ आलेलं पहिलं जनावर ! हजारो वर्षांपासून हे दोन्ही जीव एकमेकांबरोबर राहात आले आहेत. दोघांनी आपल्या समान गुणांनी एकमेकाला आकर्षित केलं आहे. आमच्या सांस्कृतिक जीवनात कुत्र्याला फार महत्त्वाचं स्थान आहे. चंद्रलोकावर उतरणारा पहिला जीव म्हणजे कुत्राच असेल ! कुत्रा हा प्राणी एक धार्मिक प्राणी आहे. तो भुंकतोही आणि शेपूटही हलवतो.

**पहिली व्यक्ती :** (**जसं काही कुत्र्याला बोलावल्यासारखे**) जा, एक कप कॉफी आण.

**बेयरा :** माफ करा, साहेब ! मी कुत्रा नव्हे.

(**बेयरा जातो.**)

**दुसरी व्यक्ती :** एका जाहिरातीचे तुम्हाला किती पैसे मिळतात हो ?

**पहिली व्यक्ती :** जाहिरातीचा विषय काय आहे याच्यावर ते अवलंबून असतं.

**दुसरी व्यक्ती :** 'कुत्रा' हाच विषय घ्या.

**पहिली व्यक्ती :** याचं पेमेंट सगळ्यात जास्त आहे... उदाहरणार्थ या कॉफी हाऊसमध्ये एक आठवडा येण्याजाण्याचा सगळा खर्च...

(**बेयरा येतो**)

(**दुसरी व्यक्ती दरवाज्यात उभी राहून त्या सज्जन पुरुषाला पाहते.**)

**बेयरा :** हं, साहेब ! तिथं उभं राहून आपण त्याना बेलाशक न्याहाळा. –काय हवं ते करा.

**दुसरी व्यक्ती :** (**तिरस्काराने**) शी... शी... डोसा कसा कुत्र्यासारखा मचमच खातो आहे आणि भोवताली गोळा झालेल्या लोकांशी वटवट चालवली आहे नुसती. त्या बोलण्याला काही ताळतंत्र ?

**बेयरा :** साहेब, जरा हळू. ते सज्जन गृहस्थ यावेळी प्रेस कॉन्फरन्स घेत आहेत.

**दुसरी व्यक्ती :** असं मच-मच खात प्रेस कॉन्फरन्स ?

**बेयरा :** होय साहेब, 'फूड प्रॉब्लेम'वर प्रेस कॉन्फरन्स !

**दुसरी व्यक्ती :** तो इतक्या घाणेरड्या पद्धतीने खात खात बोलतो आहे की यापुढे मी कधी डोसा म्हणून खाणार नाही.

**बेयरा** : इन्किलाब झिंदाबाद !

**पहिली व्यक्ती : (लिहिणं एकदम थांबवून)** काय म्हणालास, परत बोल,... काय म्हणालास, परत बोल !

**बेयरा** : हं, काय बोललो आठवत नाही. काय म्हणालो ते... आता मी काय बोललो बरं . हं, काय बोललो होतो ?

**दुसरी व्यक्ती : (दरवाज्यावर)** चालता हो इथून, नीच !

**(पडद्याआड लोकांचे हसणे)**

**पहिली व्यक्ती : (बेयरा बरोबर विचार करीत)** तू आता काहीतरी बोललास ! दोन शब्द होते. सुंदर शब्द. तू हात उंचावून बोललास... तुझे ओठ कापत होते... तुझ्या डोळ्यात चमक होती.

**बेयरा** : खरं म्हणजे ते मी रात्री पिक्चरमध्ये पाहिलं होतं, साहेब, हे दोन शब्द बोलून हिरो हिरॉइनबरोबर गाणं म्हणायला लागला तेव्हा.

**पहिली व्यक्ती** : तं गाणं कोणतं होतं ? ... सांग, म्हणजे मग तो शब्द मला आठवेल.

**बेयरा** : काहीसं अशा प्रकारचं होतं . . . तन डोले रे मन डोले रे...!

**पहिली व्यक्ती : (विचारात गढला आहे)** पुढे–यापुढे काय आहे ?

**बेयरा** : साहेब, मला लाज वाटते.

**पहिली व्यक्ती : (जसे काही एखादे स्वप्न पाहतो आहे)** १९४२ चे ते दिवस... आम्ही लोक आमच्या पुढाऱ्याबरोबर एका मिरवणुकीतून चाललो होतो तोच शब्द पुढे... तोच शब्द मागे . तोच मागे पुढे... सगळ्या आसमंतात तोच शब्द. कोणता बरं होता तो शब्द... अगदी आताच तो शब्द तुझ्या तोंडातून निघाला होता... बोल... आठव .. त्या शब्दाची मला अतिशय गरज आहे... मला आता लिहायचं आहे आणि त्यात त्या शब्दाचा उपयोग करायचा आहे.

**दुसरी व्यक्ती** : त्याच्या टेबलावर बरीच पुस्तके आहेत. त्या पुस्तकात कदाचित तो शब्द असेल.

**बेयरा** : नाही साहेब, ती पुस्तकं ज्योतिष आणि हस्तसामुद्रिकावरची आहेत.

**दुसरी व्यक्ती : (आवेशाने)** त्याचं टेबल उलथून टाक. कदाचित त्याच्याखाली ते पुस्तक मिळेल . कदाचित त्यात तो शब्द असेल.

**पहिली व्यक्ती** : तुम्हीही तो शब्द विसरलात ?

**दुसरी व्यक्ती** : मला आतापर्यंत लक्षात होता. . . मी इथे येऊन उभा राहिलो त्यामागच्या शेवटच्या सेकंदापर्यंत. . . पण त्याला पाहिल्याबरोबर मी सगळं विसरून गेलो...सर्वांमध्ये बसून असं एकट्याने अधाशासारखं खाणं . . . आणि खात असतानाच

ते बोलणं. (थांबून) मला त्याच्याकडे एक मिनिट जाऊ दे...मी त्याचं टेबल उलटून टाकेन...त्याला जमिनीवर पाडून त्याची खुर्ची हिसकावून घेईन...

**बेयरा** : साहेब, असं होणार नाही.

**पहिली व्यक्ती** : काय बोललास ?...हे होणार नाही ?...

**बेयरा** : होय साहेब, त्या सज्जन गृहस्थाकडं हा सज्जन गृहस्थ जाऊ शकणार नाही.

**दुसरी व्यक्ती** : (ओरडतो) माझं नाव सज्जन नाही...हे विशेषण मला तिरस्करणीय वाटतं.

**बेयरा** : बरं बरं ! मी जोपर्यन्त इथे आहे तोपर्यन्त हे साहेब त्या सज्जन गृहस्थाकडे जाऊ शकणार नाहीत.

**दुसरी व्यक्ती** : मी तुझं डोकं फोडीन.

**बेयरा** : व्हेरी सॉरी सर !

**दुसरी व्यक्ती** : मी इथंच मुडदा पाडीन.

**बेयरा** : साहेब, त्या सज्जन पुरुषाला हेच हवं आहे.

**पहिली व्यक्ती** : तरीच त्याने तुला मध्ये उभं केलं आहे...मध्ये हे शून्य आहे लोकांनी इकडे दगड मारायला हरकत नाही...हा सगळीकडे गोंगाट चालू आहे. लोकांनी मारामारी करून इथं आपला राग भस्म करून टाकावा ? वड्याचं तेल वांग्यावर काढावं ? अँटी...अँटी...अँटी...

(**बेयरा वळून दुसऱ्या व्यक्तीच्या जागी उभा राहतो. दुसरी व्यक्ती पहिल्या व्यक्तीबरोबर उभी राहते.**)

**दुसरी व्यक्ती** : मला वाटतं हा त्याचाच माणूस असावा.

**पहिली व्यक्ती** : म्हणून तर त्याला इथं बेयराची नोकरी मिळाली.

**दुसरी व्यक्ती** : हा आपल्या बाजूला वळणार नाही का ?

**पहिली व्यक्ती** : मला कधी अशी गरज वाटलीच नाही. मी कधी असा विचारही केलेला नाही.

**दुसरी व्यक्ती** : आज आपल्या दोघांना गरज आहे. तो शब्द तुम्हाला लिखाणात वापरावयाचा आहे आणि त्या शब्दावर मला त्याच्याशी काही बोलायचं आहे. तो इथं येऊन पोचण्यापूर्वी तो शब्द मला आठवला पाहिजे.

**पहिली व्यक्ती** : तुमच्या त्या 'गर्लफ्रेंड'चं नाव काय ?

**दुसरी व्यक्ती** : धिस् इज् इररेलेव्हंट.

**पहिली व्यक्ती** : तर मग रेलेव्हंट काय ?

**दुसरी व्यक्ती** : तो शब्द ! ती त्या शब्दाच प्रतीक आहे.

**पहिली व्यक्ती** : ओहो, वंडरफुल ! तर मग इथं बसण्याची तिची व्यवस्था करायलाच हवी.

**(बेयरा आत जाऊन उरलेल्या, उष्टया वस्तू प्लेटमध्ये घेऊन येतो.)**

**पहिली व्यक्ती** : बेयरा, कुठूनही एका खुर्चीची व्यवस्था करावीच लागेल.

**बेयरा** : इम्पॉसिबल साहेब, बाहेर गर्दी वाढते आहे.

**पहिली व्यक्ती** : कुठं चाललास ?

**बेयरा** : देशात अन्नधान्याचा तुटवडा असल्याने खाण्याच्या वस्तू फेकू नयेत अशी त्या सज्जन पुरुषाची आज्ञा आहे. बाहेर भिकाऱ्यांची गर्दी झाली आहे.

**(डाव्या बाजूने जातो त्याचवेळी डाव्या बाजूला आरडाओरडा होतो. बेयरा त्याच पावली धावत येतो.)**

**बेयरा** : बापरे ! केवढी गर्दी !

**पहिली व्यक्ती** : इथून जात का नाहीस ?

**बेयरा** : आता इथून जायला मनाई आहे.

**दुसरी व्यक्ती** : का ?

**बेयरा** : आता इथूनच हे उष्टे भिकाऱ्यांकडे फेकले पाहिजे. या देशातील भिकाऱ्यांची गंमत पहा-खातील तर सँडविचेस्‌चे उष्टे तुकडेच खातील. (**फेकतो**) घ्या. अरे...रे...रे भांडता का रे साल्यांनो ! आपापसात भांडून काय होणार ? हा घ्या हॉट डॉग '...सगळं इंम्पोर्टेड आहे...अरे. भांडू नका...झगडू नका...सज्जन पुरुष अजून आत बसलेला आहे...आज बराच माल निघणार आहे (**फेकतो**) हे घ्या 'हॅम्बर्गर' हेच आहे आता स्वदेशी...

**पहिली व्यक्ती** : (**एकदम**) काय म्हणालास ? तू आता काय बरं बोललास ?

**बेयरा** : दातात पकडून ठेवलं आहे...नाहीतर त्या शब्दाप्रमाणे हेही विसरेन... स्वदेशी...स्वदेशी...म्हणजे इम्पोर्टेड ..

**पहिली व्यक्ती** : आम्ही त्यावेळी विदेशी मालाची होळी केली होती. (**दुसऱ्या व्यक्तीला**) तू लिहित जा. मी बोलतो आहे...बोलत जाईन...थांबलो की सर्व काही विसरेन. स्वदेशी.. स्वदेशी...स्वदेश मन आहे, स्वदेश शरीर आहे, स्वदेश...पुढचं आठवत नाही आहे...स्वदेश नावाची एक-एक मुलगीदेखील होती.

**बेयरा** : स्वदेश-प्रसाद माझ्या वडिलांचं नाव होतं.

**पहिली व्यक्ती** : त्यावेळी भारतच स्वदेश होता.

**(दुसरी व्यक्ती भराभर लिहित आहे. पॅडचे कागद भरले जातात ते तो फाडून-फाडून खाली फेकतो. पहिली व्यक्ती गोळा करीत जाते. आवरत जाते.)**

**पहिली व्यक्ती** : आमच्या त्या स्वदेशात केवढे नेते होते त्यांनी किती किती म्हणून त्याग केला सगळा स्वदेश एका महान प्रेरणेने भारावून गेला होता...चारी बाजूंनी प्रकाश पसरत होता...अरे, तू लिहित का नाहीस ? सगळा सत्यानाश करून टाक-लास–हे एक संपादकीय होतं...आज संध्याकाळी मी ते २० रुपयाला विकलं असतं...

**दुसरी व्यक्ती** : (उठत) तुम्ही हे फक्त २० रुपयाला विकणार आणि हा देश ?

**पहिली व्यक्ती** : सावधान, आपल्या देशाच्या गौरवाखेरीज काहीही ऐकणं मला आवडणार नाही.

**दुसरी व्यक्ती** : या देशाची किंमत किती आहे याचा खराखुरा हिशोब केला गेला आहे. एवढंच नव्हे तर अर्धी रक्कम 'अॅडव्हान्स' म्हणून दिली गेली आहे.

**पहिली व्यक्ती** : तुझी 'गर्लफ्रेंड' अजूनपर्यंत आली नाही म्हणून तुझं डोकं एकदम आऊट तर नाही ना झालं ?

**दुसरी व्यक्ती** : आंतरराष्ट्रीय बाजारात याचा भाव उघड झाला आहे. सट्टेवाले शेअर मार्केटात ओरडताहेत.

**(पडद्याआड अनेक आवाजात 'आये राम', 'गये राम', 'आये राम', 'गये राम'.)**

**पहिली व्यक्ती** : (**किंचाळतो**) थांबा, बंद करा तो आवाज !

**(एक भयानक शांतता पसरली आहे.)**

**बेयरा** : साहेब, ती आत आली आहे.

**दुसरी व्यक्ती** : ती पहा आलीच.

**बेयरा** : गर्लफ्रेंड !

**दुसरी व्यक्ती** : मिनी

**(दुसरी व्यक्ती पळत जाते. दरवाजात थांबून पहाते )**

**दुसरी व्यक्ती** : (**हाक मारतो**) मिनी !

**बेयरा** : साहेब, जरा हळू आवाजात हाक मारा. सज्जन पुरुष तिच्याशी काही बोलतो आहे

**दुसरी व्यक्ती** : काय बडबडतोस ?...मिनी ..ऐक मिनी (**थांबून**) ओहो, तिच्या-करिता खुर्चीची व्यवस्था केलीच पाहिजे (**आवेशाने**) मी चाललो त्याला खुर्चीवरून धक्का देऊन माझ्या मैत्रिणीसाठी खुर्ची आणायला !

**(बेयरा पळत जाऊन पकडतो.)**

**बेयरा** : **पाय पकडून**) नाही, नाही साहेब. असं कराल तर फार मोठी चूक होईल चारी बाजूला गोंधळ माजेल.

**दुसरी व्यक्ती** : आता माझी सहनशक्ती संपली.

**पहिली व्यक्ती : (पळत येऊन रस्ता अडवतो)** होय, तो खरं सांगतो आहे, सज्जन गृहस्थाला हाकलू नकोस. नाहीतर भयानक आपत्ती ओढवेल. सगळीकडे 'केयॉस' होईल. ही सगळी व्यवस्थाच कोलमडून पडेल. आमचं इथं राहणं अशक्य होऊन जाईल.

**दुसरी व्यक्ती** : तू कोण आहेस ?

**पहिली व्यक्ती** : मी... मी... मी... मी... एक व्यक्ती आहे.

**दुसरी व्यक्ती** : तू कोणीतरी वेगळाच आहेस.

**पहिली व्यक्ती** : मी तुझ्याचसारखी एक व्यक्ती आहे. या देशाचा नागरिक आहे.

**दुसरी व्यक्ती** : नाही, तू इंग्रज आहेस. तोच इंग्रज-ज्याच्याशी तू लढलाही असशील याच जगावेगळ्या लढाईने ज्याच्याशी तू लढत होतास त्याच्या सारखं बनायला तुला भाग पाडलं. त्याच्या इच्छेनुसार लढायला तू तयार झालास याचाच अर्थ असा की तो शत्रू आश्चर्यकारक होत तुझ्या लढ्याचे सारे डावपेच त्याच्याच हातात होते.

**पहिली व्यक्ती** : तू पाहिलं होतंस ?

**दुसरी व्यक्ती** : पाहतो आहे ना.

**पहिली व्यक्ती** : अशक्य !

**दुसरी व्यक्ती** : जसा तू माझा भूतकाळ आहेस. . . तसा मी तुझा वर्तमानकाळ आहे. **(थांबतो)** इथला सगळा लढा व्यक्तिगत आहे. अगदी खाजगी पातळीवरचा. अती क्षुल्लक गोष्टीलादेखील भयंकर स्वरूप देण्याची आम्हाला सवय लागली आहे. आणि महान गोष्टीकडे पाठ फिरवण्याचा आम्हाला शापच आहे.

**बेयरा** : तरीच सर, तुम्ही त्या खुर्चीकरिता आज इतके अस्वस्थ आहात. उद्यापासून मी इथं दोन खुर्च्या ठेवत जाईन.

**पहिली व्यक्ती** : थांब, थांब. मला आठवू दे. . किती तरी कोडी उलगडल्यासारखी वाटताहेत. **(धावत जाऊन लिहू लागतो)** आम्ही ज्याच्याविरुद्ध लढतो. एक दिवस तेच बनून जातो... आणि. . . आणि काय म्हणालात ? **(एकदम)** अरे... मी किती लवकर सगळं विसरून जातो बरं मला वाटतं, माझं 'लिव्हर' ठीक नसावं.

**बेयरा** : साहेब, या वयात गहू खाऊ नये.

**पहिली व्यक्ती** : तो शब्द कोणता आहे, विचार कर बघू, तू काय म्हणाला होता ?

**बेयरा** : साहेब, तो सिनेमातला शब्द आहे... जयहिंद टॉकीजला ती फिल्म लागली आहे.

**पहिली व्यक्ती** : मला त्याची आता गरज आहे, या क्षणी, माझ्या लेखात वापरायचा आहे. ह्यांना गर्लफ्रेंडबरोबर त्या विषयावर चर्चा करायची आहे.

**दुसरी व्यक्ती** : तुम्ही लोक मला जाऊ का देत नाही ? मी त्या सज्जन पुरुषाला

खुर्चीवरून फेकून देईन ना तेव्हा तो शब्द आपोआप बाहेर पडेल.

**पहिली व्यक्ती** : (**विचार करीत**) खुर्ची उलटल्यानेच तो शब्द बाहेर पडणार असेल तर त्याचं मूळ ती खुर्चीच असली पाहिजे. (**लिहू लागतो**) हे सगळं रामायण तिच्यासाठी झालं. (**धावत जातो**) नाही, नाही. आपल्याला त्या सज्जन पुरुषाकडे जाता येणार नाही. कमीतकमी माणूस सरळ तरी आहे. त्याला मी इतके दिवस ओळखतो आहे. तू त्याला खुर्चीवरून खाली पाडण्याचा प्रयत्न केलास तर त्यानंतर इथं मारामारी, लूट, धाडी वगैरे भीषण प्रकार सुरू होतील आणि तू वाचू शकणार नाहीस.

**दुसरी व्यक्ती** : आठवा !... स्वातंत्र्य लढ्याचे ते दिवस... अगदी असंच त्यानेदेखील म्हटलं होतं, आम्ही सुवेज कालवा ओलांडू शकणार नाही की... (**दोघेही मूर्तीवत स्तब्ध होतात, जसं काही त्यांना कुणीतरी मूक बनवलं आहे.**)

**बेयरा** : (**घाबरून**) की...की ..की... (**एकदम धावतो**) यस सर !

(**उजव्या बाजूला जातो. दोन्ही व्यक्ती निःशब्दपणे बोलताहेत. पहिली व्यक्ती सत्याग्रहाचे प्रयत्न करत आहे आणि दुसरी व्यक्ती संतापाचा आवेश दाखवीत आहे. थोड्या वेळाने बेयरा येतो.**)

**बेयरा** : साहेब, ओ मिस्टर ! . . .अरे बाबांनो, आपण असे एकाएकी गप्प झालात म्हणून ते सज्जन गृहस्थ बेचैन आहेत. आपल्या गप्पा, आपला राग, आपले सगळे सगळे व्यवहार त्यांना फार आवडतात. त्यांची 'प्रेस कॉन्फरन्स संपली आहे. स्ट्राईकवाल्यांचं एक डेलिगेशन त्यांना भेटायला आलं आहे. तेही आता थोड्याच वेळात निघून जातील. आपण बोला, गप्पा मारा. अहो साहेब. . अहो साहेब . . . साहेब !

(**ते दोघेही बेयराला निःशब्दपणे विचारतात की त्यांच्या तोंडातून शब्द उमटत नाहीत की काय ?**)

**बेयरा** : अहो, आपल्याला बोलता येत नाही आहे, खरंच नाही, मला काहीच ऐकू येत नाही. . . काही नाही . . . कसलाच आवाज नाही. बरं, बरं . . . जरा जोरात हसा पाहू, कदाचित काही ऐकू येईल.

(**ते दोघेही हसतात पण निःशब्द**)

**बेयरा** : अरे खदखदा हसा . . .

(**दोघेही हसतात**)

**बेयरा** : (**वैतागतो**) नाही, काहीही नाही. कसलाच आवाज येत नाही. . . एक एक शब्दही नाही... काय म्हणालात ?... मी बहिरा आहे ? नाही हो, आपणच दोघे मुके झाला आहात. आपल्या तोंडून कसला आवाजच येत नाही तर मी काय ऐकणार. . पहा ना, उजव्या बाजूनं आवाज येतो आहे... माझी ऐकण्याची इच्छा

नसली तरीही ऐकावा लागतो आहे. (**कान लावून एकतो**) सज्जन पुरुषाने आताच आपल्या फ्रेंडला सांगितलं . . . ऐका, मोठ्या नोकरीविषयी. (**परत ऐकतो**) आहो, ती आपल्या फ्यूचर करियरविषयी बोलते आहे. (**कान लावून**) इंटरप्रिटर बनून त्यांच्याबरोबर परदेशी जाणार आहे.

**(दुसरी व्यक्ती एकसारखा प्रयत्न करता करता या क्षणी किंचाळतो.)**

**दुसरी व्यक्ती** : नाही, नाही, नाही !

**(पहिली व्यक्ती निःशब्द होत बोलते)**

**बेयरा** : आहो, मी बहिरा नाही त्याच्यावर आता विश्वास बसला ना ? मलाही वाटत होतं की तुम्ही मुके होणार नाही. (**एकदम कान लावून ऐकतो**) ओह, सज्जन पुरुष सांगतो आहे–आपण रोज डायरी लिहिली पाहिजे... (**परत ऐकतो**) आणि डायरी अशी असायला हवी की, तिच्या प्रत्येक पृष्ठावर कोणत्यातरी महापुरुषाचा धर्मसंदेश छापलेला असावा ! (**ऐकतो**) महापुरुष कोण ? जो आपल्या वैयक्तिक विश्वासाकरिता लाखो, कोटयावधी माणसांच्या जीवाची पर्वा करत नाही ! (**ऐकतो**) भावनाप्रधान व्यक्तीच महान होऊ शकते !

**(पहिली व्यक्तीही या क्षणाला बोलू लागते)**

**पहिली व्यक्ती** : नाही, नाही, नाही, त्याला काहीच माहीत नाही. तो सगळं विसरला आहे. तो आपल्या बेशुद्धावस्थेत झोपला आहे. अन्याय, अत्याचाराचे घडे काठोकाठ भरले आहेत. यापुढं लोक हे सहन करणार नाहीत ! प्रत्येक गोष्टीला काही मर्यादा असते. आता रात्र संपेल नवा सूर्य उगवेल. आपल्याच मधून कोणीतरी एक एकदम उठून उभा राहील... आणि... आणि... आणि... आणि.

**बेयरा** : आणि... आणि... आणि...!

**(तेच निःशब्द हसणं, आता तो स्वतः हसू लागतो. त्याचप्रकारचं निःशब्द बोलणं बोलतो आहे. बोलू शकत नाही याचं त्याला अतिशय दुःख होतं आहे. अभिनयाने सांगतोय की आपली नोकरी जाईल.)**

**पहिली व्यक्ती** : अरे तुला काय झालं ?

**दुसरी व्यक्ती** : बस्स. याला असाच मुका राहू दे. याच्याशी बोलू नका. तुझी नोकरी जाईल तर खरंच बरं होईल. तू त्याचा माणूस होतास ना. जा... जा, आता त्याच्याजवळ... आमच्याशी लगट करू नकोस . . . मला तुझ्याबद्दल जराही सहानुभूती नाही.

**(पहिल्या व्यक्तीच्या पायावर कोसळतो.)**

**पहिली व्यक्ती** : मलाही तुझ्याबद्दल जराही सहानुभूती नाही. (**एकदम थांबून**) **मला वाटतं, आम्हा दोघांतही सहानुभूती नाही. त्या दोघांनाही नाही... हा (बेयरा)**

महापुरुष आहे... आताच याच्यात काही चमकून गेलं. तो आपल्या मुक्या वाणीत काही सांगतो आहे... त्यानं आमच्यातली एक दुसऱ्याविषयीची जवळीक काढून टाकून आम्हाला वेगळं करून टाकलं आहे.

**दुसरी व्यक्ती** : हा सगळा फ्रॉड आहे. मी हे नष्ट केल्याखेरीज रहाणार नाही.

**(बेयरा या क्षणी खदखदून हसतो.)**

**बेयरा** : **(तसेच हसत)** तुम्ही दोघे. . **(पहिल्या व्यक्तीला)** तुम्हाला कोणीतरी महापुरुष हवा आहे. **(दुसऱ्या व्यक्तीला)** आणि तुम्हाला एक गर्लफ्रेंड हवी आहे... आणि मला तो सज्जनपुरुष...जिंदाबाद !

**(आत पळतो)**

**पहिली व्यक्ती** : जिंदाबाद...याच्या आधीचा शब्द कोणता बरं ?

**(घाईने पळत जातो. विचार करतो. दुसरी व्यक्ती त्याला कौतुकाने पाहते आहे. त्याचवेळी बेयरा येतो. त्याच्या हातात काही सामान आहे.)**

**बेयरा** : पहा...ऐका . सज्जन पुरुषानं आपणा दोघांना या भेटी दिल्या आहेत. आपण मोठे आहात, मोठेपणावर आपला विश्वास आहे म्हणून आपल्याला ही एका महापुरुषाची आत्मकथा भेट दिलेली आहे. **(पहिल्या व्यक्तीला भेट देतो)** आणि आपण फार उत्साही आहात. आपल्या बंडखोर वृत्तीने सज्जन पुरुष फारच प्रभावित झालेले आहेत. **(डबा उघडतो)** आपल्यासाठी त्यांनी हा मिनीसूट पाठवला आहे.

**दुसरी व्यक्ती** : मिनीसूट, ही काय बदमाषगिरी आहे ?

**बेयरा** : आपल्या गर्लफ्रेंडला त्या सज्जन पुरुषानं मिनीसाडी भेट दिली आहे.

**दुसरी व्यक्ती** : **(फेकतो)** घेऊन जा. त्याच्या डोक्यावर आदळ.

**बेयरा** : आपण एका मिनिटात हा मिनीसूट घालून तयार होऊन आलात तर आपल्याला आत जायला मिळेल असं त्या सज्जन पुरुषानं आपणास सांगितलं आहे.

**(दुसरी व्यक्ती तिरस्काराने मिनीसूट घालण्याचा प्रयत्न करतो)**

**बेयरा** : आपण या पुस्तकात तो शब्द शोधा. जर एका मिनिटात शोधलात तर आत जाऊ शकाल.

**(पहिली व्यक्ती पुस्तकात शब्द शोधते आहे. दुसरी व्यक्ती मिनीसूट घालते आहे.)**

**बेयरा** : लवकर, लवकर, ते एक मिनिट संपून जाईल.

**दुसरी व्यक्ती** : हा मला घालता येत नाही.

**पहिली व्यक्ती** : या पुस्तकात मला ते कुठं दिसत नाही.

**बेयरा** : लवकर आटपा...

**दुसरी व्यक्ती** : हा अंगावर चढवणे अशक्य आहे.

**पहिली व्यक्ती** : याची पानं कोरी आहेत.

**बेयरा :** जल्दी करा. ते एक मिनिट संपत आहे.

**पहिली व्यक्ती :** मला काही दृष्टीस पडतच नाही तर मी वाचू काय ?

**बेयरा :** शोधा...शोधा. आपण सूट घालण्याचा प्रयत्न करा.

**पहिली व्यक्ती :** इथं सगळं काही वैयक्तिक स्तरावर आहे वर-खाली... खाली-वर...जो ज्याचा विरोध करतो तो तोच होण्याची इच्छा धरतो.

**बेयरा :** लवकर, लवकर, वेळ संपते आहे.

**(बेयरा हेच बोलतो आहे. पहिली व्यक्ती आपलं बोलणं एका पातळीपर्यंत उचावून नेते नि तिघंही मूर्तिवत होतात.)**

**(पडदा पडतो.)**

पात्रे

उद्‌घोषक

गर्दीतील एक व्यक्ती

सत्ताधीश

वैज्ञानिक

गर्दी

सेना

(घटना काल : अनिश्चित भविष्य)

(एखाद्या खास राजाज्ञेच्या वेळी होणारा तुतारी, नगारा आदींचा आवाज स्टेजवर एक व्यक्ती मोठमोठ्याने म्हणत आहे...ऐका...हो ऐका...)

उद्घोषक : लोक हो
मनुराजपुत्रांनो
ऐका हो ऐका !
मी बोलत आहे
एका नगरीच्या चौकातून
मी बोलत आहे
भविष्याच्या अंधारात लपलेली
ही संस्कृतीची नगरी आहे
या नगरीच्या उंबरठ्यावर पोहोचेपर्यंत
इतिहासानं किती मार्ग आक्रमिला
संस्कृतीने किती वेळा कुशी बदलल्या
जिचा नकाशा वाळवंटातल्या वाळूवर
ताज्या रक्ताने काढला गेला;
जिच्या पायाखाली किती म्हणून
उघडे नागडे, भुकेकंगाल कोवळे जीव
गाडले गेले
तेव्हा कुठे ही नगरी साकार झाली होती !
मी त्याच स्वप्ननगरीच्या चौकातून
बोलत आहे ! ऐका !

(चौकात पुष्कळशा माणसांचा कोलाहल, भीतिग्रस्त आवाज, कधी कधी उद्वेगाचे स्वप्न धारण करणारं असं दबलेल्या आवाजातील बोलणं. मध्येच कुणाची तरी किंकाळी ऐकू येते; छोट्या मुलांचे आक्रोश, भिकाऱ्यांचा आर्तस्वर, शिवी-गाळी व शेवटी भीतीने दबलेल्या आवाजात विरून जाते.)

जाणं येणं धक्काबुक्की, आरडाओरडा

हा जो सारा कोलाहल तुम्ही ऐकत आहात ना
खरं म्हणजे शहराच्या रस्त्या-रस्त्यावर, गल्ली-बोळांत
ही गर्दी उसळली आहे,
आणि शहरात पाऊल टाकायला नाही आहे जागा;
गोंधळ वाढतच आहे !
कशासाठी बरं ही सारी माणसं लोटली आहेत
चौकाकडे;
चारी बाजूने गर्दी होत आहे
हजारो लहान-मोठे, स्त्री-पुरुष लगबगीनं
पावलं टाकीत येत आहेत !
अरे पण हे थोडे वेगळेच लोक दिसताहेत,
यांचे हात-पाय छोटे
डोकं आत दबलेलं
पोट मोठं, पुढे आलेलं
मांसाच्या तुकड्यांसारख्या दिसणाऱ्या दोन घाणेरड्या पापण्या लोंबताहेत
यांच्या चालीत रुबाब नाही
चिखलानं माखलेल्या बेडकासारख्या
उड्या मारत चालताहेत हे !
हे थवेच्या थवे येताहेत
किळसवाणे प्लेगाचे उंदीरच जणू
गल्लीबोळातून येत असावेत !

(कांचेच्या फरशीवर शेकडो उंदरांच्या पावलांचा आवाज)

कळत नाही का ही गर्दी वाढतच चालली आहे !
यांच्या बोलण्यावरून तर काहीच अर्थबोध होत नाही
यांची तर बोलीच बदलून गेली आहे !
म्हणतात शतकांपूर्वी या मानवांनी
घट्ट काळं रक्त प्राशन केलं होतं
कुजलेले मुडदे खाल्ले होते
तेव्हापासून यांच्या आवाजातच बदल झाला !

(गर्दीतून कासावीस होऊन हुंदके दिल्यासारखा आवाज. गुदमरलेल्या आवाजात जणू मंत्रमुग्ध शंकर महादेव सांगताहेत, 'काही गूढ असं भयंकर अरिष्ट कोसळणार आहे.' हेच वाक्य कदाचित ओठातून ओठाकडे ध्वनी-प्रतिध्वनीप्रमाणे वर्तुळाकार

लाटांबाटे पसरत चालले असावे.)

तरीदेखील जे काही कानापर्यंत पोहोचत आहे
त्यावरून असं वाटू लागलं आहे
आज शहरात काहीतरी गूढ भयंकर
अरिष्ट कोसळणार आहे.
कालच्या रात्री तार्‍यांचे सारखे
असे काही आवाज ऐकू येत होते की
कोणीतरी जिवंत माणूस
आगीच्या लाटांत भाजला जातो आहे.
आणि रात्रीच्या हिंदोळ्यावर
थोडीशी भाजलेल्या मांसाची दुर्गंधी पसरली आहे !
सारी रात्र घालवली लोकांनी
भयभीत, साशंक मनांनी !
सकाळ झाली आणि पाहिलं तर पश्चिमी टेकडीवर
एक आगीचा जळता ढग टांगलेला आहे,
करपून गेल्या आहेत जंगल-दर्‍या
कपारी देखील आहेत भेगाळल्या-तडकल्या
जागोजागी सभ्यतेला तडे गेले आहेत !
घाबरे-घुबरे लोक घरांकडे धाव घेत आहेत
चौकात गर्दी उसळली आहे !
बोलताहेत हा महासृष्टीचा शेवटचा दिवस आहे
आज आत्महत्या करील सारी धरती !
लोक खूपच भेदरलेले दिसताहेत,
पळताहेत.
गर्दी वाढतच आहे बेसुमार !

(अकस्मात गोंगाटाला कापत सैनिकी बँड वाजू लागतो आणि कोलाहलाला भेदून जाणारा सैनिकांच्या घोड्यांच्या टापांचा आवाज येऊ लागतो.)

अरे ही आली सुसज्ज सेना
जागोजागी बंदुकधारी सैनिक
उभे ठाकले !
लोक घाबरून शांत झाले !
पण हे काय !

त्या तिथे दूरवर तिकडे माजली आहे काही गडबड !

('शांत व्हा', 'बोलू द्या त्याला', 'अरे ! चाललं आहे काय हे ?' 'मी बोलत राहीन प्राण जाईपर्यंत'... इत्यादी आवाज ऐकू येतात. एकमेकांत मिसळतात आणि शेवटी त्यांचं गोंधळात रूपांतर होतं.)

त्या तिथे दूरवर तिकडे माजली आहे काही गडबड
काही शिपायी एका व्यक्तीला पकडत आहेत
तो त्यांच्या बंधनात
तडफडत-कळवळत काही सांगत आहे.
दोन शिपायांनी त्याच्या बाह्या पकडल्या आहेत
एक हाताने त्याचं तोंड बंद करीत आहे
तरी देखील तो सांगायचे ते सांगण्याचा अट्टाहास करीत आहे
तो पहा आता ऐकू येऊ लागला
या व्यक्तीचा स्वर-
ऐका बंधूंनो !
जसे आम्ही उंदीर तसे तुम्ही उंदीर
आणि शिपाई देखील उंदीरच !
जरी हाती त्यांच्या बंदूक आहे, तरी
हे बंदुकधारी उंदीरदेखील केवळ खेळातील बाहुल्या
रंगी-बेरंगी गणवेषांमधल्या
आगीचा वर्षाव करणाऱ्या मेघांना हे काय जिंकणार !

(सैनिक संचलनाचा आवाज, बिगुल ध्वनी, मेघगर्जना)

खुशाल मारोत आम्हाला, परंतु
महाविनाशाच्या वादळात
हे देखील पिकलेल्या पानांप्रमाणे गळून पडतील
आज सृष्टीचा शेवटचा दिवस आहे
आज एकवटून आकाश आमच्यावर कोसळेल
रात्रभर ताऱ्यांच्या ठायी स्मशान पेटलं आहे
तुम्हाला देतो ही धोक्याची सूचना
मी रात्री चंद्रम्यावर पाहिले आहेत लाल रक्ताचे डाग !
आज चांदण्याच्या मागोमाग रक्ताचा सडा पडेल
यमाची अजगरे जबडा उघडतील, श्वास घेतील
उंदीर आहोत ! आम्ही उंदीर ! मरून जाऊ !

(प्रचंड जनसमूह अत्यंत दुःखी स्वरात साथ देत आहे–उंदीर आहोत, आम्ही उंदीर, मरून जाऊ ! आम्ही उंदीर आहोत, मरून जाऊ ! सुरुवातीला निराशा, दुःख आणि वेदनांनी भरलेल्या स्वरात काही लोक गातात. नंतर इतरही या स्वरात स्वर मिळवतात. सुरुवातीला निराशा, खेद आणि मृत्यू यांपासून पराभूत होण्याच्या पश्चातापाचा स्वर, पुढे खेद दृढतेचं रूप धारण करतो. अशू उंदीर असणे आणि उंदीर म्हणून मरणे हेच त्यांचे भाग्य आणि जीवनाची वास्तविकता आहे. तरीही एक भीती त्या आवाजात व्यक्त होत आहे. अचानक त्या लोंढ्याच्या आवाजाला कापीत त्याच व्यक्तीचा स्वर कानावर आदळतो. लाचारी आणि पौरुष्यहीन रागाचा . . . आम्ही उंदीर आहोत, मरून जाऊ ! )

(गोळ्यांचा वर्षाव नंतर स्तब्धता, स्मशान शांतता.)

उद्घोषक :

मेला एकदाचा !
त्याला सैनिकांच्या गोळीनं भाजून काढलं आहे.
काळाभोर रस्ता रक्ताने न्हाऊन निघाला
त्याचं शव पडलेलं आहे अजून !
जमाव कसा अगदी स्तब्ध उभा आहे
कित्येक भयभीत मुले मात्र हुंदके देत आहेत.
जमाव कसा अगदी स्वब्ध उभा आहे !
पश्चिमेकडील टेकडीवर पसरलेल्या
आगीच्या ज्वाळेत मेघांमधून
काही काळचा काळचा लाटा उसळत आहेत.
दूर दऱ्यांत
आंधळी विषारी हवा
सों–सों करीत वहात आहे
जमाव कसा अगदी स्तब्ध उभा आहे

(सैनिक संचलन, बँडच्या तालावर शाही धुन वाजू लागते.)

(जमाव पुन्हा गाऊ लागतो. तो उंदीर होता, आणि मेला. आम्ही उंदीर आहोत, मरून जाऊ.)

सैनिक धरताहेत रांगा
जमाव पांगत आहे
ऐकतो आहोत आता स्वतः सत्ताधीश येणार आहे !

(जमावाच्या आवाजाला धार चढते. आम्ही उंदीर आहोत, मरून जाऊ, आम्ही

उंदीर आहोत, पण का ? उंदीर आहोत ? का उंदीर आहोत ?)

पहा स्वत: या नगरीचा सत्ताधीश धावत आला आहे
चव्हाटयाच्या मधोमध उभा राहून
काही सांगत आहे
सैनिक संगिनी रोखून त्याला घेरत आहेत.
जमाव अधिकच हाताबाहेर जात चालला आहे.
हा राजाचा बुलंद आवाज आहे

**सत्ताधीश** : शांत व्हा ! निश्चित व्हा !
माझ्या नगरवासियांनो
ही इतकी घबराट कशाला ?
तान्यांच्या ठिकाणी रात्रभर स्मशान पेटलं होतं म्हणून ?
की पश्चिम पहाडावर
हा जळता मेघ टांगला आहे म्हणून !
अरे मूर्खांनो ! विसरलात,
मी आपल्या कारकीर्दीत
सोन्यानं मढविल्या आहेत भिंती
भूपृष्ठावर पोलादी चादर पसरली आहे
नद्यांवर मैल-मैल लांब धरणं बांधली आहेत
शिवाय माझ्या या प्रजासत्ताकात
जिथे मतदानाखेरीज फूलदेखील फुलू शकत नाही
काय बिशाद आहे
मतदानाखेरीज येथे प्रलय डोकावेल ?
तरीदेखील मी या ढगाला
गोळ्यांच्या वर्षावानं
लागलीच नष्ट करण्याचे फर्मान काढतो आहे !
सेनापती ! . . .

**(गर्दीतून आरडाओरडा, गोळीबार लागोपाठ फैरी)**

**उद्घोषक** : सैनिक आकाशात गोळीबार करीत आहेत
परंतु महाकाळाच्या तहानलेल्या जिभेप्रमाणे
मेघ मात्र अधिकच पसरत चालला आहे

**(मेघगर्जना)**

कोणीतरी दूर टेकडीवरून हळूहळू उतरतो आहे

लांब दाढी, पायघोळ झगा, तीक्ष्ण नजर
म्हणतात की हा वैज्ञानिक आहे, जादूगार आहे, युगद्रष्टा आहे
त्याने सात पिढ्या पाहिल्या आहेत आपल्या भेदक नजरेने,
जमाव त्याला वाट करून देत आहे–
राजा सुद्धा आदर व्यक्त करण्यासाठी उभा राहिला

**(दोन सेकंद स्तब्धता)**

हळूहळू, जवळ येत
तो त्या शवापर्यंत पोहोचला आहे
जे मध्ये रस्त्यावर पडलं आहे.

**(दोन सेकंद स्तब्धता)**

वाकला आहे तो त्या शवावर !

**(क्रूर विकट हास्य)**

त्याला पाहून हासतो आहे तो
किती क्रूर हास्य आहे हे !
किती क्रूर हास्य !
राजाच्या चेहऱ्यावर पसरला आता काळिमा
घाबरून.. बघा तो काय बोलला...

**सत्ताधीश** : बंद कर हे हास्य
बंद कर हे...
बंद कर...
बंद ..

**वैज्ञानिक** : (हसत हसत) शेवटी आज प्रलयाचं पाहिलं अक्षर
तुम्ही लिहिलंच !
मी स्वतःच्या ह्या डोळ्यांनी
सात पिढ्या तयार होताना आणि नष्ट होताना पाहिल्या
आणि ऐकलं होतं
ज्या दिवशी पश्चिम पहाडावर ज्वाळांचा मेघ पसरेल,
आणि सडकेवर एक प्रेत कूस बदलेल,
त्या दिवशी या नगरीचा शेवटचा क्षण येऊन ठेपेल
आणि या शेवटच्या क्षणापर्यंत जिवंत रहाणाऱ्यांनी
आज तुमच्या बरोबरच नष्ट होऊन जाईल ही

एका सृष्टीची, एका संस्कृतीची घाणेरडी बेशरम कहाणी !
अरे सोन्याच्या महालात रहाणाऱ्यांनो
ही उंदरांची संस्कृती
आज नष्ट होणार आहे

**सत्ताधीश** : बंद करा हा राजद्रोह !

**वैज्ञानिक** : . . .हा द्रोह नाही !
तुम्ही स्वत: ह्या मृत्यूला ओढवून घेतलं आहे आपल्यावर
पहा क्षणात कुशी बदलेल हा नंगा बेवारशी मुडदा,
आणि पहाडांना स्पर्श करील.
हा मेघ, ह्या नद्या, ही कठीण खडक
ह्याची सत्ता मानतील,
हा मुडदा
प्रथम धवल चिन्ह आहे महाप्रलयाचं !

**सत्ताधीश** : सेनापती . . .

**वैज्ञानिक** : बोलू दे मला

**सत्ताधीश** : सेनापती ! बंदूका . . .

**वैज्ञानिक** : या बंदुकांनी तुम्ही कुठवर
आपल्या दैवाला टाळू शकाल ?
ह्या बंदुकांचा मीच तर शोध लावला होता ज्यांनी
आज माझाच आवाज बंद करताहात तुम्ही !

**सत्ताधीश** : सेनापती
ह्या वेड्यावर काही औषध हवं.

**(गोळीबार)**

**वैज्ञानिक** : आ . . .!

**(जमावामध्ये गोंगाट, वैज्ञानिकाचं घायाळ स्थितीतील कण्हणं. जमावाची कुजबुज)**

आम्ही उंदीर आहोत, मरून जाऊ
हा जादूगार उंदरांचा आहे,
हा राजा पण उंदराचा आहे
हा मुडदादेखील उंदरांचा आहे
आम्ही उंदीर आहोत, मरून जाऊ.

**वैज्ञानिक** : माझा गळा दाबा हवा तर,
पण कसे थांबवू शकाल

ह्या भविष्याच्या पडलेल्या पावलाला ?
ह्या मेघ तर वर्षेलच
मुडदे सूड घेतीलच.

(पुन्हा गोळीबार)

अर्धा जमाव : मुडदे सूड घेतीलच !

अर्धा जमाव : आम्ही उंदीर आहोत. मरून जाऊ !

(हळूहळू दोन्ही आवाज एकमेकांत मिसळू लागतात. मेघ गर्जना-विजेचा कडकडाट)

उद्घोषक : वैज्ञानिकाचे प्रेत उचलून
वेडीपिशी जनता पळते आहे.
गर्जत आहे तो ज्वाळांचा खुनशी मेघ
खरोखरच, खरोखरच कुशी बदलत आहे मुडदा
हे काय, तो तर उभा राहिला
त्याच्या पापण्या हलू लागल्या
त्याचे काळे रक्तहीन ओठ हालू लागले आहेत जरासे
अरे, तो तर बोलू लागला आहे !

मुडदा : थांबा ! पळू नका !
तुम्ही कुठवर पळणार ?
तुम्ही स्वत: मृत्यूला निमंत्रण दिलं आहे, स्वीकार करा.
तुम्ही त्या नगरीचे रहिवासी आहात
ज्याच्या पायाखाली छोटया-छोटया बालकांच्या कवटया आहे
तुम्ही त्या नगरीचे रहिवासी आहात
ज्या ठिकाणी भुकेली गिधाडे स्त्रियांच्या प्रेतांबरोबर शयन कर
तुम्ही त्या नगरीचे रहिवासी आहात
जिथे स्वप्नं, हाताच्या बेडयांनी तोलली जातात
तुम्ही त्या नगरीचे रहिवासी आहात
तुम्ही त्या नगरीचे
त्या नगरीचे
त्या नगरीचे
रहिवासी आहात
थांबा ! पळू नका !
कुठवर पळणार ?

हे मरण तुमच्या इमारतींच्या
विटे-विटेतून बाहेर फुटेल
हे मरण धरणीतून उफाळून येईल
हे मरण आकाशातून तुटून पडेल
हे मरण बोलावलं आहे तुम्ही
स्वीकार करा
थांबा ! पळू नका !
तुम्ही कुठवर पळणार ?

**सत्ताधीश :** (भयाकुल स्वरात) सेनापती . . .

**(सेनेची हालचाल सुरू होण्याचा आवाज ! गोळीबार,)**

**मुडदा :** ह्या बंदुका, ह्या सेना
काही परिणाम घडवू शकणार नाहीत मजवर
मी मृत्युलोकातून परतलो आहे,
मृत्युंजय आहे.
माझ्या माध्यमातून दुसराच कुणी बोलतो आहे
मी धरतीची, जनतेची
प्रभूची वाणी आहे.
ज्याच्या छातीवर तुम्ही युद्धं खेळलात
ही भवने बांधलीत ज्यांच्या अस्थिपंजरावर !
आतापर्यंत मी गप्प होतो,
बोलत होता तुम्ही
आता बोलणार मी, माझी पाळी आहे.
आतापर्यंत तुम्ही पुढे जात होता
मी बेडयांनी जखडलेला फरफटत होतो मागे,
आता माझी पावलं उचलली आहेत
धरणी (थरथर) कापेल
आता माझी पाळी आली आहे.
मी सूड घेईन
उध्वस्त करून टाकीन ही नगरी
हिच्या गल्लीबोळांतून सरसरणाऱ्या
आगीच्या नद्या उफाळतील.

**(जनतेच्या पळापळीचा ध्वनी)**

पळू नका !
कुठवर पळणार !
धरतीच्या प्रत्येक तुकड्याखाली
एक एक प्रेत याच संधीची वाट पहात पहुडलं आहे.
ते पावलं तुमची पकडून
शोषून घेतील तुम्हाला.
तुम्ही ज्यांना युगा–युगांपासून तुडवीत आलात
ते आता धरणीला दुभंगवून बाहेर येतील
हा ज्वालामुखी पहात
युगायुगापासून घृणा आतल्या आत दाबून
गुपचुप उभा आहे,
परंतु आता हा भडकेल
क्रूर दानवाच्या लोलुप जिव्हेगत
असंख्य ज्वाळा
या नगरीला गिळतील !
मुडदे आपला सूड घेतील !

**अर्धा जमाव** : मुडदे आपला सूड घेतील.

**अर्धा जमाव** : आम्ही उंदीर आहोत, मरून जाऊ.

**(जमावाच्या पळापळीच्या गोंधळात हे दोन्ही आवाज भुकेल्या घारींप्रमाणे घिरट्या घालताहेत आणि एकमेकात मिसळून जाताहेत)**

**उद्घोषक** : पळतो आहे जमाव
नगरात हाहा:कार माजला आहे
तो मुडदा आपली जखम आपल्याच हातांनी दाबत
पोलादी छायेगत धडपडत चालला आहे पश्चिमेकडे
तो जिथे–जिथे जात आहे–गोंधळ माजतो आहे–
रस्त्यावर नि:शब्दता पसरवीत
गर्जत आहे राहून–राहून ज्वाळांचा मेघ
तो हळूहळू पश्चिम पहाडावर चढत आहे
लोक अजूनही पळताहेत
परंतु कोणताही मार्ग राहिला नाही
एका गल्लीतून दुसऱ्या गल्लीत पळत सुटले आहेत जसे
चक्रव्यूहात पिसाळलेले कुत्रे सापडावे.

तो पोहचला आता पर्वताच्या अत्युच्च शिखरावर
एक वेळ उजव्या डोळयानं
सांगतो आहे पर्वताला–
नजर टाकीत शहराकडे

**मुडदा** : किती शतकांपासून तू
शहराच्या मस्तकाशी स्तब्ध उभा आहेस ?
जसा काही मरणाऱ्याच्या शीर्षस्थानी यमदूत
मृत्यू घटकेची वाट पहात मृत्युपाश घेऊन स्तब्ध उभा आहे.
ते मृत्युपर्व आता समीप आहे
मानव गल्ली–बोळात पिसाळलेल्या कुत्र्यागत रडतो आहे,
चंद्रमा रक्ताच्या सडयानं तोंड धूत आहे
तू देखील आपला सूड घे.
अगणित भट्टचा कधीपासून रसरसल्या आहेत छातीत
किती विषारी धुर युगायुगापासून कोंडून राहिला आहे !
बस्, एक पाषाणाचा थर त्याच्यावर जमला आहे
म्हणूनच आजवर महाविनाश थांबत आला आहे
आज चुंबून त्या पाषाणाला पाझर फोडतो आहे
रसरसा, हे क्षुधित ज्वालामुखींनो !
आपल्या गहन गुहांत बंदी
विषारी अग्निदानवांना करा तुम्ही विमुक्त !
रसरसत्या उल्कांनी
जे धरतीचा अणुरेणू करपून टाकतील–वितळघून टाकतील...
चुंबीत आहे मी आपल्या निष्प्राण ओठांनी काळा पत्थर
धगधगा हे क्षुधित ज्वालामुखींनो !
धगधगा...धगधगा ..धगधगा.. धगधगा...

**(हजारो कंठातून ' धगधगा धगधगा ! 'चा मंत्रघोष. दोन सेकंद अगदी स्तब्धता)**

**(एकाएकी गडगटाट आणि प्रचंड विस्फोट, जमीन दुभंगण्याचा, तुफानांचा पिसाट घोड्याप्रमाणे सुसाटण्याच्या, इमारती कोसळण्याचा आवाज. त्यांतच धावपळ, किंचाळणं, हाका मारणं, मर्मभेदक करुण क्रंदन; वाटतं हा कोलाहल नरकाच्या अत्यंत खालच्या कुंडातून बाहेर पडत असावा. हळूहळू हजारो मांजरांचा रडण्याचा आवाज. नंतर कोलाहल दूर अंतरावर विरून जात आहे. आणि शेवटी ऐकू येतो तो एक अव्यक्त असा हुंदका.)**

**उद्घोषक :** नष्ट झालं
शेवटी सर्व काही नष्ट झालं
लाखो वर्षांपासून,
कणाकणानं, तृणातृणानं जे निर्माण झालं होतं
ते शेवटी नष्ट झालं !
गर्जन–गर्जत वर्षत आहे
महाविनाशी ज्वलित जलधर
वितळलेल्या अनल सरिता
नगर–वाटिकांना गिळत आहेत
लहान–मोठे, बालवृद्ध
तरुण–ललना, करपून निघताहेत
भाजल्या मांसाच्या उग्र-कडवट दुर्गंधानं डोकं गरगरतं आहे
काळाकुट्ट धूर
होरपळणाऱ्या शहराच्या
शेवटच्या आर्त किंचाळ्यांना गुदमरून टाकत आहे.
प्रेतं कुजलेल्या चिखलात तरंगताहेत,
वितळलेल्या छाताडाचा चिखल !
हसतो आहे तो
पर्वत शिखरावर उभा राहून हसतो आहे
दोन्ही हातांनी शहरावर
हा वितळलेली आग फेकतो आहे
महानाशाच्या वज्राला तो
सारखा फेकत आहे
आग त्याला जाळू शकत नाही
हवा त्याला हलवू शकत नाही
खडक त्याच्यावर आपटून दुभंगताहेत
तो जिवंत विद्रोह
तरळ घृणेने वेडा झालेला
मृत्यंजय तो
आत्म संतोषाने तो हासत आहे
त्याच्या पापण्यावर पापण्या जमल्या राखेच्या
वितळलेल्या आगीच्या चिखलात गुडघ्यापर्यंत

तो रुतला आहे !
तरीही त्याच्या भाळी उल्हास फुलासारखा फुलला आहे.
या खिडीतून त्या खिडीकडे
राजवाड्याच्या चोकापर्यंत
गल्ल्या-गल्ल यांतून
लटपटत धावत सुटला आहे
कुजलेल्या किळसवाण्या प्रेतांवरून
तो सारखा फिरत आहे.

**(हळूहळू कोलाहल-रुदन बंद. क्षणभर स्तब्धता. फक्त त्याच्या जड पावलांचा आवाज.)**

आता कोणी जिवंत नाही राहिला
सारी नगरी लाक्षागृहासारखी वितळून गेली
आता सर्वत्र पसरलेल्या धरणीवर
कोणीही जिवंत प्राणी श्वास घेणार नाही.
या मुड्याने संपूर्ण सभ्यतेला चुटकीसरशी चिरडलं
फक्त एक हवेची वेडी झुळुक
भटकत आहे गल्लीतून
संस्कृतीच्या उखडलेल्या श्वासाप्रमाणे
एक अनल-शोण महानदी
डोक बडवत. प्रतांना जाळीत
पुढे पुढे जात चालले.

**(नदीची भयंकर घर-घर आणि त्यात मिसळून गेलेले कोल्ह्यांचे क्रंदन)**

आता धरतीवर मानव जन्म घेणार नाही
त्या लाजिरवाण्या इतिहासाची पुनरावृत्ती आता करणार नाही
या धरतीची भांडी कायमची
आगीने होरपळून निघाली
ही वांझोटी धरती
काही दिवसांची आता
अचेतन ग्रहाप्रमाणे, अगदी थंड पडून जाईल

**(कोल्ह्यांचे रुदन एकाएकी बंद होते)**

परंतु हे काय ?
येथे तर शेताकडील पाऊलवाटेजवळ थांबला की तो !

काहीतरी वाकून पहातो आहे,
अजून अग्निसरिता इथवर पोहोचू शकलेली नाही
काय पहातो आहे तो ?
एक पाती गव्हाची लांबट, दुबळी–बारीक
कोवळ्या उन्हाची साडी नेसून डोलत आहे,
आणि जवळच एक जंगली फूल फुललं आहे
मुड्याच्या त्या राखेनं माखलेल्या धुरकट पापण्या ओलावल्या
त्या गव्हाच्या तरुण कोंबाकडे
आशीर्वादाच्या दृष्टीने पहात आहे.
पहा ना, त्याने तर चेहऱ्यावरचा बदलला भाव,
हात वर करून वितळलेल्या आगीच्या ज्वलंत महानदीला
सांगतो आहे काही–

मुड्दा : थांब, हे ज्वालामुखी, बंद कर तुझं तोंड
धरतीच्या हृदयात जेथे लपली होती घृणा
तेथेच, हे नवनिर्मितीचं एक बीज लपलं होतं,
जे प्रलयकारी तुफानाला घाबरलं नव्हतं
जे खडकांचा थर फोडून वर आलं आहे
हे उद्याच्या नव्या सृष्टीचं प्रथम चिन्ह आहे
याला प्रणाम कर
हे आग ओकणाऱ्या सूर्या
रक्तस्नात हे चंद्रा !
आगीच्या महानदी !
याला प्रणाम कर !
या गव्हाच्या इवल्याशा दाण्यात एक नवीन संस्कृती लपली आहे
लाजवटशी
यातच वसल्या आहेत नवगंधर्वनगरी,
यातच एक नवीन तत्त्वज्ञान श्वास घेत आहे
नवकल्पना, गीत नवीन, मानव नवीन
या गव्हाच्या हिरव्या पातीच्या
शीतल छायेत विकसेल
एक संस्कृती नष्ट केली मी ,
या गव्हाच्या आणि फुलाच्या तरल सावलीत

एका नवीन संस्कृतीला आता जन्म देईन.

**(नदीचा रों–रों आवाज दुप्पट मोठा होतो. कोल्हे पुन्हा क्रंदन सुरू करतात.)**

**उद्‌घोषक** : परंतु हे काय ?
वितळलेली नदी पुढे जाते आहे
भुकेल्या सापासारख्या लाख जिभांनी लवलवत,
वितळलेली आग पुढे पुढे जाते आहे
ताठ उभा राहिलाय तो
ओरडतो आहे,

**मुडदा** : नाही ऐकत ?
मी सांगतो आहे,
थांब, हे बहिऱ्या ज्वालामुखी,
हे अंध तुफान आगीच्या !
आपली पावलं पुढं टाकू नकोस !
संपला आता विनाश,
नवनिर्माण होतं आहे.
नाही थांबणार ?
मी मृत्युंजय आहे
तुम्ही मला खाऊ शकणार नाही
हे तिरस्करणीय काळ्या दानवा,
तुझ्याशी देखील मी टक्कर देईन हसत हसत,
थांबा, थांबा !
घृणेच्या द्रवीभूत शक्तींनो !
ज्वालांच्या एकाकी वादळा !
ही गव्हाची पाती
जंगली फूल,
नवसृष्टीचं पहिलं आगळं चिन्ह
यांना जर आंच लागली तर
चंद्रताऱ्यांना पृथ्वीवर फेकून देईन.

**(नदीचा रों–रों आवाज आणखी जवळ येऊ लागतो.)**

**उद्‌घोषक** : परंतु आज काही थांबत नाही.
महानदी बुभुक्षित डाकिणीसारखी,
आपले केस फिस्कारून

शेकडो तुफानांच्या वेगानं पुढं जात जात,
शेवटी पोहचलीच त्या स्थानापर्यंत
तिनं गव्हाच्या पातीला बाहू पसरून विळखा घातला,
तो, छातीवर त्या लाटांना झेलत आहे.
उभा, गळ्यापर्यंत आगीनं वेढलेला,
लवलवत्या ज्वालांत पाय लटपटत आहेत,
तरीही. ताठ आहे लोखंडासारखं शरीर,
आणि शीर्षावर नवसृष्टीचं स्वप्न.

(हळूहळू नदीचा आवाज कमी होतो एक अति मधुर संगीत स्वर ऐकू येऊ लागतात आणि दूर कुठेतरी पूजेच्या वेळच्या घंटा वाजू लागतात.)

वितळलेला आगीचा पूर
ओसरत आहे आता,
इंद्रधनुष्ये दोनचार दिसू लागली आहेत त्यावर, क्षितिजावरून
वितळलेल्या आगीचा पूर ओसरतो आहे आता
स्थिर पापण्यातून कुणास ठाऊक,
कोणत्या भविष्याची
नवी सृष्टी पहात आहे
कोणत्या नव मानवाचं स्वप्न,
—जे या गव्हाच्या शीतल छायेत
फुलासारखं साकार होईल.

(नदीचा आवाज पूर्णपणे बंद, घुंगरू नाद ऐकू येतो आणि पुन्हा स्मशानशांतता.)

पूर ओसरला,
धरती पुन्हा उभारते आहे
एक स्वर्गीय संगीत
दऱ्यांतून घुंगरूसारखं नाचतं आहे.
ज्याच्या तालावर एक नवमानव आकार घेईल
जिच्या लयीवरच जीवनाची सारी मूल्यं पुन्हा बदलतील,
ओठावर चुंबन उमटेल, जिच्या लयीवर
पापण्यांत अश्रू दाटतील,
जिच्या लयीवर एक नवी संस्कृती जन्म घेईल नव्यानं,
जिच्या लयीवर
आता प्रशांत ज्वालामुखीच्या मागून

डोकावतो आहे,
नवसृष्टीचा पहिला सूर्य,
फुललेल्या गुलाबासारखी ज्याची
लालसर आभा
उध्वस्त सृष्टीला पुन्हा प्रकाशित करीत आहे
भग्नावशेष फुललेल्या गुलाबासारखे
पुन्हा सुंदर दिसताहेत,
हा अंतिम मानव सृष्टीचा
नवसृष्टीचा मनु बसून पुढे जातो आहे,
हा धरतीचा नवा थर आहे
मी भविष्याच्या आणि नंतर येणाऱ्या भविष्याच्या काळात,
बोलत आहे
हे मनु राजाच्या पुत्रांनो,
ऐका !
कान देऊन ऐका !!!
बोलतो आहे,
नवसृष्टीचा उद्घोषक मी

(तुतारीनाद, शंखध्वनी, मंगलवादन आणि एका नवजात बालकाचे प्रथम हास्याचे सहज, सुंदर आणि सरल संगीत.)

(पडदा पडतो)

## पात्रे

[1]

वृद्ध : पाकिस्तानची निर्मिती झाल्यामुळे पश्चिम पंजाबमधून भारतात यायला निघालेला एक वयोवृद्ध गृहस्थ.

निर्मला : वृद्धाची तरुण मुलगी.

मुकुंदी : वृद्धाचा तरुण मुलगा.

ड्रायव्हर : हवालदार वगैरे.

[2]

सिकंदर : ग्रीक विजेता.

अॅंड्रिओकस : सिकंदरचा सहकारी ग्रीक सैनिक.

[3]

स्कंदगुप्त : गुप्त साम्राज्याचा यशस्वी हूण विजेता.

गुप्त साम्राज्याचे नागरिक वगैरे.

[4]

रणजीतसिंह : पंजाबकेसरी आणि पराक्रमी वीर.

सरदारसिंह : रणजीतसिंहाचा सहकारी.

चिरागअली : हबीबुल्ला वगैरे.

(मोटारी आणि लॉरींचा भला मोठा ताफा येत आहे. जुन्या–नव्या अशा मोटारींच्या इंजिनांचे कमीजास्त आवाज सतत ऐकू येत आहेत. मध्येच कुठल्यातरी लहान मुलाच्या रडण्याचा आवाज ऐकू येतो आहे.

साधारण अर्ध्या मिनिटानंतर एक लॉरीचा ड्रायव्हर उंच आवाजात हाक मारतो, 'प्यारे सिंधा ! अरे प्यारे सिंधा !'

क्षणभर उत्तर येत नाही. त्यामुळे परत हाक मारण्याचा आवाज येतो–' प्यारे सिंधा ! अरे, प्यारे सिंधा ! झोपलास की काय ?'

'नाही रे यार, इथं कुणाला झोप येणार ?'

'आजची रात्र किती भयंकर वाटते आहे प्यारे सिंधा !'

इतक्यात चालत्या लॉरीतून तिसरा आवाज ऐकू येतो–' हिंदुस्थान इथून कितीसा दूर आहे हवालदार साहेब?')

**हवालदार** : रावीच्या पलीकडे हिंदुस्थान आहे आणि रावीपर्यंत पोहोचायला अजून एक तास लागणार आहे.

**एक म्हातारा आवाज** : रावीपर्यंत पोचायला आणखी एक तास लागणार आहे ! रावीच्या पलीकडे आमचा हिंदुस्थान आहे ! आमचा प्रिय हिंदुस्थान !

**हवालदार** : होय बाबा, परमेश्वराची इच्छा असेल तर आपण तासाभरात तिथं पोहचू.

**म्हातारा आवाज** : परमेश्वराची इच्छा असेल तर ? ठीक आहे भाई, जर परमेश्वराची इच्छा असेल तर आज रात्रीच्या या शांत वातावरणात फक्त एक तासानंतर आम्ही आमच्या थकल्याभागल्या आवाजात का होईना पण मुक्तकंठानं म्हणू शकू . . . ' जयहिंद '. . .

(लॉरीत बसलेल्या स्त्री-पुरुष–मुलांच्या हलक्या आवाजात जयहिंद)

**लॉरी ड्रायव्हर** : प्यारे सिंधा, आता कुठलं धोक्याचं ठिकाण राहिलेलं नाही ना ?

**प्यारेसिंह** : जोपर्यंत आपण आपल्या हद्दीत जात नाही, तोपर्यंत धोका नाही असं कसं म्हणता येईल ? निदान रावीच्या किनाऱ्यापासून फक्त तीन मैलावर आत असलेलं ते गाव लागेपर्यंत तरी . . .

**एक आवाज** : वेळ जाता जात नाही. संकटाची ५५ मिनिटं ५५ वर्षांसारखी वाटताहेत.

/हवालदार : वेळ जात नाही ? मग एखादं गाणं म्हणाना. तुम्हाला गाणं गायला कोण आडकाठी करतो ते मी पाहीन !

प्यारेसिंह : शाबास, हवालदारसाहेब ! बरं मग, आहे का कोणी आपल्यात गाणारा ?

एक आवाज : आपण सर्व मिळूनच एक गाणं म्हणूया ना ? पश्चिम पंजाबच्या हिरव्यागार आठवणीत सीमेच्या टोकावरचं हे कदाचित् आपलं शेवटचंच गाणं ठरेल. ठीक आहे !

(सर्वांचं सामूहिक गीत स्त्री-पुरुष एकसाथ गात आहेत. त्याचा अर्थ आहे-ज्या भूमीवर आल्यावर प्रत्यक्ष चंद्र-सूर्यालादेखील आपली चाल मंद करावीशी वाटते ती भूमी म्हणजे हा आमचा प्रिय पंजाब ! सोनेरी शेते, सपाट मैदान, हिरवेगार उंच शिसव वृक्ष आणि आमराया . . . पाच मोठ्या नद्या तर दिवसरात्र आमच्या या मातृभूमीचं चरण प्रक्षालन करीत असतात.)

गाणं संपते न संपते तोच गोळ्यांच्या वर्षावाचा कानठळ्या बसणारा आवाज ऐकू येतो आणि सतारीची तार वाजता वाजता अचानक तुटली जावी, तशी गाण्याची लय एकदम तुटते. 'अल्ला हो अकबर !' आणि 'हे अलि' अशा घोषणांमध्ये अगदी जवळून बंदुका चालवण्याचा आवाज ऐकू येतो. लॉऱ्यांचा जाण्याचा आवाज बंद होतो आणि प्रतिघोषणा ऐकू येतात- 'हरहर महादेव !' 'सतश्री अकाल !'

(घोषणांचा आवाज, बंदुकांच्या गोळ्यांचा आवाज आणि बायकापोरांच्या करुण किंकाळ्या-एकदम सर्व ऐकू येत आहे )

(विस्फोटक-भेदक पार्श्वसंगीत)

**एक अतिशय घाबरलेला आवाज** : पि. .ता .जी . .पि . ता. जी...

**एका क्षणानंतर परत** : पि.. ता.. जी...

**एक अतिशय थकलेला आणि म्हातारा आवाज** : हं !

**एक मुलगी** : भैया, पिताजी शुद्धीवर आले आहेत. पि..ता. जी.. ! पि .ता..जी...

**वृद्ध** : बेटी निर्मला बेटा मुकंदी !

**निर्मला** : काय पिताजी, आम्ही तुमच्या जवळच आहोत.

**वृद्ध** : आपण कुठं आहोत बेटा ?

**मुकंदी** : आपण रस्त्यापासून दूर एका शेतात लपलेलो आहोत, पिताजी.

**वृद्ध** : तुमचा भाऊ-देशराज कुठं आहे बेटा ?

**मुकंदी** : आपल्याला वाचवण्यासाटी त्याला आपलं बलिदान करावं लागलं, पिताजी.

**वृद्ध** : अरेरे ! काय हे ! परमेश्वरा, या म्हातारपणी कोणत्या अपराधाची ही शिक्षा मला भोगायला लावतो आहेस.

**मुकंदी** : धीर धरा पिताजी !

**वृद्ध** : तुमची आई खरंच पुण्यवान ! ती हे दिवस बघायला जिवंतच राहिली नाही.

**मुकंदी** : आता कसं वाटतंय पिताजी ?

**वृद्ध** : हिंदुस्थान अजून कितीसा दूर आहे, बेटा ?

**मुकंदी** : हिंदुस्थानच्या सीमेपासून आपण आता फारसे दूर नाही, पिताजी !

**वृद्ध** : **(भारावलेल्या आवाजात)** हिंदुस्थान ! प्यारा हिंदुस्थान ! स्वतंत्र हिंदुस्थान !

**निर्मला** : पिताजी, पिताजी !

**वृद्ध** : बेटी निर्मल ! बेटा मुकंदी !

**निर्मला** : काय पिताजी ?

**वृद्ध** : या रात्रीच्या शांत वातावरणात तुम्ही लोक हिंदुस्थानला निघा—

**मुकंदी** : हे शक्य नाही पिताजी ! आमच्या भावाचा अग्निसंस्कार आणि तुम्हाला बरोबर न्यायची व्यवस्था केल्याखेरीज इथून जायची कल्पनाच आम्ही करू शकत नाही पिताजी !

**वृद्ध** : बेटा, मी आता शुद्धीवर आहे. माझ्या मोठया मुलाचा अग्निसंस्कार मी

स्वतः माझ्या हातानं इथं करीन. तू आपल्या बहिणीला घेऊन हिंदुस्थानकडे जायला नीघ, मुकंदी !

**मुकंदी** : ते शक्य नाही, पिताजी ! तुम्हाला एवढी मोठी जखम झालेली आहे हे मला माहीत का नाही ? (**भारावलेल्या आवाजात**) मला तुम्ही इतका अधम आणि कृतघ्न समजता, पिताजी ?

**वृद्ध** : अरे, आता तूच तर मला धीर धरा म्हणून सांगत होतास ना ? खरं म्हणजे, धीर धरण्याखेरीज दुसरं काय आहे आपल्या हाती ? (**स्वतःशीच बोलल्या-प्रमाणे**) आपलं घर-दार सगळं लुटलं गेलं आहे. आपल्या प्रिय जन्मभूमीपासून—जिथे आम्ही जन्मलो, खेळलो, वागडलो, ज्या मातीच्या कणाकणाशी आमचं आत्मीय-तेचं नातं जडलं—अशा आमच्या जन्मभूमीपासून आम्हाला कायमचं दूर लोटलं आहे आणि आज या प्रिय जन्मभूमीच्या उंबरठयावर या अंधाऱ्या रात्री माझा प्रिय पुत्र अविचाऱ्यांकडून मारला गेला आहे ! तुमचं जीवन धोक्यात आहे ! माझ्या एकुलत्या एका मुलीची अब्रू धोक्यात आहे आणि ७० व्या वर्षी मी माझ्या छातीवर सुऱ्याचा वार झेलला आहे. हे परमेश्वरा ! खरोखर आम्ही या क्षणाला धैर्यानं वागलो नाही तर धैर्य या शब्दाचा अर्थच संपुष्टात येईल !

**मुकंदी** : ठीक आहे, पिताजी ! आम्ही अवश्य धैर्य धरू.

**वृद्ध** : तर मग मुकंदी आणि बेटी निर्मल, मी सांगतो तुम्ही मला आणि या देशराजच्या निष्प्राण देहाला इथंच सोडून, या रात्रीच्या शांत वेळी गुपचुप हिंदु-स्थानाला निघून जा !

**निर्मल** : याला धैर्य म्हणत नाहीत पिताजी ! हा आपला एक दुबळेपणा ठरेल. कृतघ्न दुबळेपणा !

**वृद्ध** : नाही मुली ! तुझी चूक होते आहे इथंच ! आयुष्यातली असली असह्य जखम किती लोक सहन करू शकतात ? स्वतःच्याच भावाचे प्रेत आणि वृद्ध घायाळ वडिलांना या अशा निबीड अरण्यात एकटं सोडून जाण्याची वेळ परमेश्वरानं आपल्या शत्रूंवर देखील आणू नये ! तीच वेळ आज आपल्यावर येऊन ठेपलेली आहे तेव्हा आपण आता संकटाला धैर्यानं तोंड दिलंच पाहिजे. हे सगळं भोगून तुम्ही जर जिवंत राहिलात तर तुमचं जीवन हेच मुळी धाडसाचं सर्वात मोठं उदाहरण ठरेल !

**निर्मला** : जीवनाचा इतका मोह कशाकरिता पिताजी ? आम्हीसुद्धा आमच्या भावाबरोबर आत्मबलिदान करू शकतो.

**वृद्ध** : हे मला का माहीत नाही, बेटी ? शेवटी देशराज आणि तुम्ही एकाच रक्ताचे ना ?

**निर्मला** : तर मग जीवनाचा इतका मोह कशाकरिता ?

**वृद्ध : (जरा हसून)** हे जीवन तुझं स्वतःचं नाही, निर्मला ! हे तुमच्या देशाचं आहे ! तुला जिवंत राहिलं पाहिजे मुली, कारण देशाला तुझी गरज आहे.

**मुकंदी :** आमचा देश ? पिताजी ! आमच्या देशापासून तर आम्हाला कायमचं पिटाळून लावलं आहे ! आता तुम्हीच तर सांगितलंच की, आपल्या जन्मभूमीपासून आम्ही बहिष्कृत केलो गेलो आहोत.

**वृद्ध :** तुझी ही व्यथा ही पूर्णपणे समजू शकतो, बेटा मुकंदी ! जीवनाची ७१ वर्षे मी ज्या आईच्या मांडीवर घालवली. आज जीवनाच्या संध्याकाळी मला तिथून हुसकावून लावलं गेलं आहे. आयुष्याची ७१ वर्षे जी जन्मभूमीला चांदण्यांत, दुपारी, सकाळी आणि संध्याकाळी नाना रूपात पाहिली ती तशी मी परत पाहू शकणार नाही. **(वृद्धाचा गळा भरून येतो. पण प्रयत्नपूर्वक आपल्या आवाजावर ताबा ठेवत आपलं म्हणणं चालू ठेवतो)** परंतु बेटा मुकंदी, हा आपला आणि आपल्या पूर्वजांचा देश त्या भूमीपुरताच मर्यादित नाही तर तो खूप खूप विशाल आहे. आणि देशाच्या विशालतेहूनही अशी आणखी एक फार मोठी गोष्ट आहे बेटी !

**निर्मला :** ती कोणती पिताजी ?

**वृद्ध :** आपल्या पुढल्या पिढीला देण्याजोगा असा एक फार मोठा वारसा आपल्याकडे आहे. आणि त्याकरिताच तुम्हाला जिवंत राहिलं पाहिजे, मुली !

**मुकंदी :** हा कसला वारसा पिताजी ?

**वृद्ध :** आम्हा लोकांचा वारसा म्हणजे वंशपरंपरागत जबाबदारीच ! आम्ही हिंदुस्थानच्या सीमाप्रांताचे पहारेकरी आहोत. आमचे पूर्वज हिंदुस्थानच्या सीमेचे रक्षण करीत आले आहेत. आज आपल्याला ह्या सोमेवर हिंदुस्तानचं रक्षण केलं पाहिजे, आमच्या मागे आमच्या वंशजांना, त्यांच्यानंतर त्याच्या वंशजांना हे पुण्यकार्य केलंच पाहिजे आणि याच पुण्यकार्याकरिता जिवंत राहिलं पाहिजे...

**निर्मला :** पण देशाचा हा जो सीमाभाग आमच्याकडून बळजबरीनं हिरावून घेतला आहे त्याचं रक्षण आता आम्ही कसं करायचं, पिताजी ?

**वृद्ध : (जोशपूर्ण आवाजात) :** तू माझ्या हृदयाची जखम उघडी केलीस मुली ! आपल्या देशाचा सीमाप्रांत आम्ही अशाप्रकारं निमूटपणं सोडला आहे हे खरं आहे परंतु हे समर्पण देशासाठीच केलं आहे. देशाच्या वाटणीत आमचं घरदार नाहीसं झालं हे खरं आहे पण आपला देश तर अजून जिवंत आहे. त्याच्या एका भागाचं आज दान द्यावं लागलं, एवढंच !

**मुकंदी : (स्वतःशी) :** देश, मातृभूमी हिंदुस्थान ! कधीपासून देशाच्या स्वातंत्र्याची स्वप्नं पाहतो आहे आणि आज जेव्हा देश स्वतंत्र झाला तेव्हा आमचं सगळं–सगळं हिरावून घेतलं गेलं–घरदार, भाऊबहिणी सर्व काही !

**वृद्ध : (अधिक उत्साहाने) :** हां बेटा ! नेहमीप्रमाणंच या वेळीदेखील देशाच्या रक्षणाकरिता, मातृभूमीच्या स्वातंत्र्यासाठी आम्ही सर्वात मोठं समर्पण केलं आहे. नेहमीप्रमाणं या वेळीदेखील आम्ही आमचं सर्व काही देशासाठी अर्पण केलं आहे आणि तशीच वेळ आली तर उरलं-सुरलंदेखील आमच्या मातृभूमीसाठी आपल्याला तिच्यावरून ओवाळून टाकावं लागेल, आपल्या बहादूर पूर्वजांप्रमाणे अगदी नेहमीसारखं !

**निर्मला :** पिताजी, नेहमीसारखं कसं ? असं संकट तर पूर्वी कधीच आलं नव्हतं.

**वृद्ध :** पराकोटीच्या नीचपणाचं हे जे काही आज चालू आहे तसं पूर्वी कधीच झालं नव्हत हे मलाही कळतं बेटी. तरीही देशाच्या सीमांचं संरक्षण करणाऱ्या आपल्या पूर्वजांवर यापूर्वी अशी संकटं आली होती. आज या ऐतिहासिक रात्री आपल्या पूर्वजांची ती यशोगाथा तुम्हाला ऐकवून मी धन्य होईन, बेटी **(स्वर कापू लागतो)** अजूनही बरीच रात्र शिल्लक आहे. आतातरी मुलांनो, माझ्यासाठी तुम्ही मला इथंच सोडून भारतात निघून जा. परंतु जाण्यापूर्वी माझ्या तोंडून आपल्या पूर्वजांची अमर अशी यशोगाथा ऐकून घ्या. हिंदुस्थानात जा आणि तेथील लोकांना सांगा की आमच्या वयोवृद्ध बापानं ७१ व्या वर्षी आपल्या प्रिय हिंदुस्थानासाठी सर्वात मोठं बलिदान केलं होतं. तर मग ऐका–

**(भेदक पार्श्वसंगीत)**

[3]

**वृद्ध : (उत्साहाने) :** भारतीय संस्कृतीचं हिंदुस्थानच्या वायव्येकडील विशाल केंद्र मोहनजोदाडो व हडप्पा...गंधार आणि कपिशा–पुरुषपूर आणि तक्षशिला !

**(उपनिषद् कालातील ऋषींचे मंत्रगान)**

असतो मा सद्गमय,
तमसोर्मा ज्योतिर्गमय,
मृत्योर्मा अमृतंगमय !

शांती आणि उन्नती यांचं एक दीर्घ युग संपलं. हळूहळू तक्षशिलेमध्ये बौद्धधर्मं आणि संस्कृतीचं सृजन होऊ लागलं. तक्षशिलेच्या छोटया छोटया शिखरांतून आवाज घुमू लागले–

बुद्धं शरणं गच्छामि !
धर्मं शरणं गच्छामि !
ओम् मणिपद्मे हुम् !

**वृद्ध :** २२७३ वर्षे होऊन गेली या गोष्टीला ! भारताच्या या सीमाभागावर सिकंदरानं आक्रमण केलं होतं. तक्षशिला आणि राजा पौरस यांना जिंकून तो बितस्तापर्यंत जाऊन पोचला होता. पण तिथं गेल्यावर त्याच्या लक्षात आलं की भारताच्या सीमाप्रदेशावरील हा विजय त्याला कोणत्याही मोठ्या पराभवापेक्षाही जास्त महागात पडलेला आहे.

**(काही क्षणांपर्यंत भेदक पार्श्वसंगीत)**

२२७२ वर्षांपूर्वी बितस्ता नदीच्या काठावरील एक पहाट. चारी बाजूला कोलाहल माजला आहे. सिकंदराचे हजारो शिपाई त्याच्यावरच उलटले आहेत आणि एकत्र जमून ओरडताहेत, 'सिकंदर मुर्दाबाद !', 'आम्हाला मायभूमीला परत जायचं आहे. माघारी परता, माघारी परता !'

इतक्यात एक विद्रोही नेता उंच आवाजात बोलू लागतो–'वीरांनो, शांत व्हा, माझं बोलणं ऐका. मी तुमचा नेता अँड्रिओकस बोलतो आहे !'

(शांतता पसरते)

**अँड्रिओकस** : वीरांनो ! माझ्या मित्रांनो ! मी काय म्हणतो ते नीट ऐका.

('अँड्रीओकस अमर असो', 'सिकंदरचा नाश होवो' अशा घोषणा.)

**अँड्रिओकस** : तुम्ही 'सिकंदराचा नाश होवो' अशा घोषणा करू नका, अशी माझी तुम्हाला कळकळीची विनंती आहे. काही झालं तरी तो आपल्या ग्रीस देशाचं गौरव स्थान आहे.

**एक सैनिक** : सिकंदर स्वार्थी आहे.

**दुसरा सैनिक** : सिकंदर एखाद्या पशूसारखा स्वार्थी आहे.

**तिसरा सैनिक** : तो आपल्या महत्त्वाकांक्षेसाठी आम्हा सर्वांचा बळी घेऊ पाहतो आहे.

**पहिला सैनिक** : विरोधकांना भाल्यांच्या टोकाने उडवीन अशी सिकंदराने धमकी दिली आहे.

**अँड्रिओकस** : बंधूंनो ! माझं बोलणं नीट ऐका. सिकंदर तुमच्या केसालासुद्धा धक्का लावू शकणार नाही ह्याची जबाबदारी माझ्यावर राहील. तो तुमचं म्हणणं नीट ऐकून घेईल. इतकंच नव्हे तर तुमच्या इच्छेचं पूर्णपणे पालन करील. त्याने मला तसं वचन दिलं आहे.

बंधूनो ! मला तुमच्याकडूनसुद्धा एक वचन हवं आहे. माझ्या सांगण्यावरून, माझ्या निमंत्रणानुसार तो यावेळी या सभेस येत आहे. तो ज्यावेळी इथं येईल त्यावेळी तुम्ही आपल्या या पाहुण्याचा, ग्रीसच्या वीर सेनापती सिकंदराच्या, मोठेपणाचा मान राखावा अशी माझी तुम्हाला आग्रहाची विनंती आहे. यातच ग्रीस देशाचा गौरव आहे. आपण ग्रीसचे वीर सैनिक आहोत हे विसरून चालणार नाही. सिकंदर आतापर्यंत तरी आपणा सर्वांचा वीर नेता होता. यापुढे त्याला आपला नेता ठेवायचा

की नाही ते आपणा सर्वांच्या हातात आहे. परंतु यावेळी तरी आपल्याला त्याच्याशी, एक वीर दुसऱ्या वीराशी जसा वागतो, तसंच, वागावं लागेल.

**एक सैनिक** : सेनापती सिकंदरला आमचं म्हणणं मान्य करावंच लागेल.

**अँड्रिओकस** : मी आपल्याला आताच तर सांगितलं आहे की ती जबाबदारी माझ्यावर आहे. तो पहा, सेनापती सिकंदर येत आहे. तुम्ही शांतपणे उभं राहून त्याचं स्वागत करा.

(एक क्षणभर शांतता पसरते.)

**सिकंदर** : मला वाटतं माझे सैनिक माझ्यावर रागावलेले असावेत. याचं कारण समजावं अशी माझी इच्छा आहे.

(क्षणभर सगळे चूप बसतात.)

**सिकंदर** : आताच तर मी 'सिकंदरचा नाश होवो' अशा घोषणा ऐकल्या. अँड्रिओकस, तू गप्प का? तूच मला याचं कारण सांगावं.

**अँड्रिओकस** : महाराज! याचं कारण सांगितलं तर आपणाला ते आवडेल असं वाटत नाही. मी जर या लोकांना शांत राहण्याची विनंती केली नसती तर...

**सिकंदर** : (**मध्येच थांबवून**) मी तुझ्यावर अगदी प्रसन्न आहे अँड्रिओकस! आम्हाला सांगा, या वीरांना काय हवं आहे?

**अँड्रिओकस** : आम्हाला आता मायदेशी परत जायचं आहे.

**सिकंदर** : माझ्या वीर सैनिकांनो! सहा वर्षांपूर्वीचा तो दिवस आठवून पहा. या दिवशी तुम्ही ग्रीसच्या पवित्र भूमीवर आपलं मस्तक उंचावून सिकंदरच्या कारकीर्दीत संपूर्ण पृथ्वीवर ग्रीसचं साम्राज्य स्थापन करू अशी प्रतिज्ञा केली होती—

**अँड्रिओकस** : अगदी चांगलं लक्षांत आहे हे महाराज!

**सिकंदर** : माझ्या वीर सैनिकानो! हा गौरवशाली देश तुम्ही पाहता आहात ना? जगातील सर्वात गौरवशाली देश भारत! यावर ग्रीसचं राज्य स्थापन करण्याची माझी इच्छा आहे. याच्या सुपीक पठारावर नागमोडी नद्यांवर, बर्फाच्या चमकदार आवरणानं झाकलेल्या या महान भारताच्या पहाडांवर ग्रीसचा झेंडा फडकावा अशी माझी इच्छा आहे. सांगा, या कामात तुम्ही मला मदत करणार की नाही?

**अँड्रिओकस** : नाही, कदापि नाही, महाराज!

**सिकंदर** : वीर अँड्रिओकस! तू बोलतो आहेस हे? तुझ्या तोंडात ही भित्र्याची भाषा?

**अँड्रिओकस** : आपण आकाशाला गवसणी घालू इच्छिता, महाराज!

**सिकंदर** : शेवटी तुला म्हणायचं तरी काय आहे?

**अॅड्रिओकस :** माझा अभिप्राय अगदी स्पष्ट आहे. आपण हा देश कधीच जिंकू शकणार नाही, महाराज. या देशाच्या विस्तीर्ण आणि सुपीक मैदानांचं, नागमोड्या नद्यांचं आणि आकाशापेक्षा उंच अशा पहाडांचं वर्णन आपण केलंत, पण महाराज, या सुंदर देशात राहणाऱ्या आर्य-जातीचं वर्णन करायला आपण विसरलात. गेल्या १८ महिन्यांत आम्ही या जातीला पूर्णपणे ओळखून चुकलो आहोत. एकटा ग्रीसच काय पण सगळं जग जरी एकत्र आलं तरी भारताला जिंकू शकणार नाही, महाराज !

**सिकंदर :** जग जे करू शकणार नाही ते ग्रीस करू शकतो, ते हा सिकंदर करू शकतो. आतापर्यंत आपण कमीतकमी दोन भारत सम्राटांना युद्धांत सपशेल हरवलं आहे.

**अॅड्रिओकस :** राजा पुरुचा पराभव हा आपण आपला विजय मानता आहात, महाराज ! तो छोटासा राजासुद्धा संपूर्ण ग्रीस सेनेला इतके दिवस थोपवून ठेवू शकला ना ? महाराज ! या देशातील लोकांना पंचनदीच्या (पंजाबच्या) या वीरांना आम्ही चांगले ओळखतो आहोत. ज्या देशाच्या सीमेकडील छोट्या–छोट्या राजांमध्येसुद्धा जेथे इतकी ताकद आहे...

**सिकंदर :** (मध्येच थांबवून) तू भित्रा आहेस, अॅड्रिओकस !

**अॅड्रिओकस :** तोंड सांभाळून बोला, सिकंदर !

**(एकाएकी खूप मोठा कोलाहल माजतो.)**

**वृद्ध :** आणि त्यानंतर खरोखरच सिकंदरची सेना जिवाच्या आकांतानं पळून गेली. ह्या पराजयाचा धक्का वीर सिकंदर कधीच सहन करू शकला नाही. लवकरच त्याचा मृत्यू ओढवला.

**(भेदक पार्श्वसंगीत)**

**वृद्ध** : संवत ५०७ मध्ये आशिया आणि युरोपचे दोन्ही महाद्वीप टोळधाडी-सारख्या येणाऱ्या लाखो-कोटयावधी हूणांच्या आक्रमणानं भयभीत झाले होते. लाहोरपासून काबूलपर्यंत हे हूण लोक सगळीकडे पसरले होते आणि गांधारच्या कुशाण राजाला मारून त्यांनी भारतावर एखाद्या नदीला पूर यावा तसं आक्रमण केलं होतं ! बाल्हीकपासून शतद्रूपर्यंतचा प्रदेश या हूणांच्या कब्जात होता. त्यावेळी संवत ५१२ मध्ये, मद्र आणि पंचनद येथील सैनिकांच्या मदतीनं सम्राट स्कंदगुप्तान त्या हूणांना झोडपून या देशातून पळवून लावलं

भारतवर्षाच्या इतिहासातील माघ संवत ५०२ मधील एक सोनेरी संध्याकाळ ! मगध साम्राज्याच्या सर्व प्रजेचा आवडता युवराज स्कंदगुप्त हूणांच्या प्रंचड सेनेवर विजय मिळवून पाटलीपुत्राला परतला आहे. संपूर्ण शहर नव्या नवरीप्रमाणं सजलं आहे. सगळीकडं गुढया तोरणं, पताका, व पुष्पमाळा ! दशदिशांना सुगंध दरवळतो आहे. ठायी ठायी मंगलवाद्ये वाजताहेत. **(काही क्षण मंगल पार्श्वगीत)** एकाएकी, ' रस्ता सोडा, वाट द्या ' असा आवाज आणि त्यानंतर गगनभेदी स्वरात स्कंदगुप्ताचा जयजयकार सुरू होतो.

भट्टारक पादीय युवराज स्कंदगुप्तकी जय !
हूण विजेता महाबलाधिकृत स्कंदगुप्तकी जय !

त्यावेळी नगरकन्यका एक गीत गाऊ लागतात. गीताचा अर्थ आहे–पाटलीपुत्राच्या नागरिकांनो ! कोण येते आहे ? ओळखला ? कोणाच्या स्वागतासाठी इतक्या कौतुकानं तुम्ही इथं उभे आहात ? कोणाचं दर्शन घेण्यास तुम्ही इतके उत्सुक आहात ? होय, आम्हाला माहीत आहे. आमचा हृदयसम्राट स्कंदगुप्त, भारताच्या गौरवशाली इतिहासातील एक महान विजय मिळवून आज परत येत आहे. त्यानं क्रूर आणि अजिंक्य समजल्या जाणाऱ्या हूणांना हरवलं आहे–ज्यांचं आक्रमण जगातील दुसरा कोणताही देश थोपवू शकला नव्हता अशा हूणांना त्यानं मागं रेटलं आहे. आज जर स्कंदगुप्त नसता तर आमच्या आर्यावर्ताची संस्कृती आणि वैभव त्या जंगली हूणांनी धुळीला मिळवलं असतं. पाटलीपुत्राच्या नागरिकांनो, आपल्या या महान वीराच्या स्वागतासाठी तुमच्या हृदयाच्या पायघडया घाला. आजचा दिवस हा पाटलीपुत्राच्या गौरवशाली इतिहासात सुवर्णाक्षरांनी लिहून ठेवण्यासारखा दिवस आहे.

**गाणं संपल्यावर** लगेच 'युवराज भट्टारक पादीय स्कंदगुप्त **की जय**' अशा गगन-**भेदी घोषणा** होतात आणि एकदम शांतता पसरते.

**त्यानंतर क्षणभरात** युवराज स्कंदगुप्त बोलायला लागतात– 'पाटलीपुत्राच्या **नागरिकांनो !** या ऐतिहासिक स्वागताबद्दल मी तुमचा मनापासून ऋणी आहे. **आताच** तुम्ही जे गाणं म्हटलं ते ऐकून माझ्या आयुष्यातील या अत्युच्च गौरवाच्या **क्षणीसुद्धा माझे** डोळे अश्रूंनी भरून आले. तुम्ही म्हटलं आहे-आज स्कंदगुप्त नसता तर **आमच्या** आर्यावर्ताची संस्कृती आणि वैभव त्या जंगली हूणांनी नष्ट–भ्रष्ट **केलं असतं.** परंतु माझ्या बंधूंनो, सत्य वेगळं आहे. भारतवर्षाच्या या अलौकिक विज-**याचं खरं श्रेय** ज्या वीरांना आहे ते आज परत पाटलीपुत्राला येऊ शकलेले नाहीत. ते **बाल्हीकच्या** किनाऱ्यावर चिरनिद्रा घेत आहेत. ते पाटलीपुत्राच्या गुप्त साम्राज्याचे सैनिक होते खरे पण त्यातील बऱ्याच जणांचा जन्म पाटलीपुत्रामध्ये झाला नव्हता. ते **आमच्या सीमाभागाचे** पहारेकरी होते. ते आमच्या साम्राज्याचा गौरवशाली मुकुट–कपिशा, मद्र आणि पंचनद येथील नागरिक होते. बंधूंनो, महाबलाधिपति वीर **अग्निगुप्ताच्या** नेतृत्वाखाली ज्यानी कपिशामधील एका महत्वाच्या खिंडीत दोन लाख हूणांना अगदी शेवटचा सैनिक जिवंत असेपर्यंत पाच दिवस थोपवून धरलं त्यातील ५००० सैनिकांची मृत शरीर मी स्वतः पाहिली आहेत. माझ्या बंधूनो, **सीमाभागाच्या** त्या वीरांच्या आठवणीसाठी आपण माझ्याबरोबर आपलं मस्तक **नमवा.**

**(हजारो तलवारींचा शिरस्त्राणाला स्पर्श झाल्याचा आवाज येतो.)**

**(व्यवच्छेदक, भेदक मंगल संगीत)**

**वृद्ध : युगामागून** युगे संपली. भारतवर्षावर नेहमीच धोक्याचे काळे ढग वायव्य **सरहद्दीवरून आले.** हूणानंतर कुशाण, त्यानंतर पठाण आणि मोंगल. शतकामागून **शतकं गेली आणि** त्यानंतर १९ व्या शतकाच्या प्रारंभी पंजाबचा वाघ जागा झाला.

**(फक्त २ क्षण भेदक संगीत)**

**महाराजा रणजीतसिंह !**

**(व्यवच्छेद)**

**वृद्ध :** एक अंधारी रात्र. अटक येथे सिंधू नदीच्या पश्चिम किनाऱ्यावर पठाण **सेनेचा तळ.** पश्तो **(पठाणांची भाषा)**मधील एक तराणा गात पठाण सैनिक डफाच्या **तालावर खुशीने** नाचत आहेत. काही क्षणानंतर एक आवाज येतो–

**'चिरागअली !'**

**'ओहो, हुजूर हाफीजुल्लासाहेब !'**

'कोणत्या गोष्टीसाठी सर्वजण एवढे खुश झालेले आहेत, चिरागअली ?'

'म्हणजे, हुजूर, आतापर्यंत आपण ती खुशखबर ऐकलीच नाही की काय ?'

'कोणती खुशखबर ?'

'जनाब शाहसाहेब, आपण रणजीतसिंहाला हरवलं आहे.'

'ते कसं काय ? रणजीतसिंह तर सिंधूच्या पूर्व किनाऱ्यावर आपल्या फौजांसह तळ ठोकून बसला आहे.'

'म्हणून काय झालं ? हुजूर ! आज नाही तर उद्या त्याला शेपूट घालून पळावंच लागणार.'

'असं म्हणायचं कारण ?'

'हुजूर, रणजीतसिंहाच्या शिपायांनी अटकेवर जो पूल होड्यांसाठी बांधला होता तो आज आमच्या फौजांनी तोडला. एवढंच नव्हे तर त्याच्या सर्व होड्या बुडवून टाकल्या.'

'हे ठीक आहे, चिरागअली ! परंतु रणजीतसिंह काय अन्य मार्गानं सिंधू पार करू शकणार नाही की काय ?'

'हे अशक्य आहे, हुजूर ! अटकेच्या दोन्ही पहाडांमधून वाहणाऱ्या या भयानक सिंधू नदीला माणसेच काय पण देवदूतसुद्धा पार करू शकणार नाहीत. इथं पाणी इतकं खोल आहे की, एकावर एक सात हत्ती ठेवले तरी ते बुडून जातील. नदीच्या प्रवाहाला असा वेग आहे की, तिच्याजवळ गेल्यावर ती वेडी आपल्यालाच तर वाहून नेणार नाही ना अशी भीती वाटते. ही प्रसिद्ध नदी हिंदुस्थानचा सर्वात मोठा पहारेकरी बनली आहे, शाहसाहेब !'

'पण रणजीतसिंहाला तू ओळखत नाहीस, चिरागअली ! तो माणसाच्या वेषातील एक दैत्य आहे. जे काम देवदूतांकडून होणार नाही ते काम तो रणजीतसिंह करून टाकतो.'

**चिरागअली :** (**थोडेसे हसून**) परंतु अटकेच्या या सिंधूला पार करणं या दैत्यालासुद्धा अशक्य आहे. त्यानं जिवंत राहून किंवा मरून देखील ही नदी पार करून दाखवली, तर मी माझ्या वडिलांसह त्याचा गुलाम बनेन. (**हसतो.**)

(**भेदक पार्श्वसंगीत**)

**वृद्ध :** अटकेतच सिंधू नदीच्या दुसऱ्या किनाऱ्यावर महाराजा रणजीतसिंह आपल्या बहादूर सैनिकांबरोबर !

(**दोन क्षण भेदक संगीत**)

**महाराज रणजीतसिंह :** तर मग संगतनं कोणता निर्णय घेतला सरदारसिंह ?

**सरदारसिंह :** सरकार, निर्णय तर महाराजांनीच घेतला पाहिजे. जमल्यास १५–

२० दिवसात नवीन नावा तरी तयार केल्या जाव्यात किंवा हे शक्य नसल्यास शंभर–दोनशे मैल आणखीन मागे जाऊन–जिथे सिंधूच्या पाण्याला फारसा वेग नसेल अशा ठिकाणी–नदी पार केली जावी एवढीच संगतची विनंती आहे.

**महाराज रणजीतसिंह** : संगतची दोन्ही मतं चुकीची आहेत, सरदारसिंह !

(सरदारसिंह गप्प बसतो.)

**महाराज रणजीतसिंह** : हे पहा सरदारसिंह, या क्षणाला खरं म्हणजे सिंधू नदीच्या तीरावर शत्रूचं सैन्य फारसं नाही. शत्रू आता निश्चित आहे कारण अटकेत एवढ्या वेगाने वाहणारी ही महानदी कोणी मानव पार करू शकेल हे शत्रूच्या दृष्टीनं केवळ अशक्य आहे. म्हणून तर तो यावेळी निश्चित आहे. अशा वेळी जर आम्ही नदी ओलांडू शकलो तर आमचा विजय निश्चित आहे. जर आम्ही १५–२० दिवस नावा तयार करण्यात खर्च केले तर शत्रू दुसऱ्या किनाऱ्यावर आपली शक्ती जास्त वाढवील. आता राहिलं कुठल्यातरी दुसऱ्या ठिकाणाहून सिंधू नदी ओलांडणं–ते तर अगदी निरर्थक आहे. दरियाखान किंवा त्याच्या आजुबाजूने सिंधू नदी ओलांडायची झाली तर शेकडो नावांची व्यवस्था करावी लागेल. तिथे सिंधू नदीचं पात्र ७ मैल पर्यंत पसरलं आहे–आणि तिथून आपल्या सेनेला पेशावरपर्यंत पोचणं केवळ अशक्य आहे !

**सरदारसिंह** : तर मग महाराजांची काय आज्ञा आहे ?

**महाराज रणजीतसिंह** : आपण आपल्या घोड्यांवर स्वार होऊन सिंधू नदी ओलांडली पाहिजे असं मला तरी वाटतं.

**सरदारसिंह** : (आश्चर्यानं) घोड्यांवर स्वार होऊन ?

**महाराज रणजीतसिंह** : होय, घोड्यांच्या पाठीवर आणि ते सुद्धा आत्ता रात्रीच्या या शांतवेळी !

**सरदारसिंह** : (घाबरून) आमचं एक सोडून द्या, महाराज ! आम्ही माणसं असूननसून सारखीच, पण आमच्या शीख पंथाला आपली आवश्यकता सर्वात जास्त आहे, सरकार !

**महाराज रणजीतसिंह** : शीख पंथाला आवश्यकता आहे ती वीर रणजीतसिंहाची ! भित्र्या रणजीतसिंहाची नाही, समजलं !

**सरदारसिंह** : जशी आपली आज्ञा !

**महाराज रणजीतसिंह** : धाडसाच्या असल्या कामात हुकमाचा प्रश्नच उरत नाही. असल्या अलौकिक गोष्टी कुणाच्या हुकमानं घडत नसतात तर त्या घडत असतात अंत:प्रेरणेच्या बळावर !

**सरदारसिंह** : सरकार, जिथे–जिथे आपला घाम गळेल तिथे–तिथे पंथचा एकेक शिपाई आपलं रक्त सांडेल. परंतु माझी हात जोडून विनंती आहे महाराज, आपण

आपलं हे बहुमोल जीवन अशा मोठ्या संकटात घालू नये. अगोदर आम्ही सिंधू नदीच्या ह्या वेगवान प्रवाहातून पलीकडे जाण्याचा प्रयत्न करू आणि जर आम्ही पलीकडं पोहोचलो, तरच मग आपण जसं मनात येईल तसं करा.

**महाराज रणजीतसिंह** : ते शक्य नाही, सरदारसिंह ! तुम्ही तर माझे बालपणा-पासूनचे सोबती आहात. रणजीतसिंहानं आजपर्यंत स्वत: केली नाही अशी एक तरी गोष्ट तुम्हाला करायला सांगितली आहे काय ?

**सरदारसिंह** : पायरी सोडून बोलण्याची क्षमा असावी, महाराज ! आपल्याला माहीतच असेल की, आतापर्यंत अटकेकडील सिंधू नदीचं वेगवान पात्र ओलांडणं हे सर्वस्वी अशक्य आणि असाध्य समजलं जातं. या भागाला "अटक" हे नाव पडलं ते केवळ इथं सिंधू नदीचं पात्र हा एक भलाथोरला अटकावच आहे आणि तो कोणत्याच प्रकारे ओलांडता येत नाही म्हणून.

**महाराज रणजीतसिंह** : हे पहा, सरदारसिंह ! मी सुद्धा अटक या नावामागची ही कथा ऐकली आहे. खरं पाहता ज्या मनात 'अटक' आहे तोच अटकावला गेला.

**सरदारसिंह** : तर मग आपली आज्ञा आम्हाला सद्गुरूच्या आज्ञेप्रमाणं आहे.

**महाराज रणजीतसिंह** : आणि हे पहा, आतापासून केवळ एक तासानंतर आपण सिंधू नदीत घोड्यांसह उड्या मारणार आहोत. आणि सर्वात प्रथम मी सिंधूच्या धारेत आपला घोडा उतरवणार आहे.

**(महाराज रणजीतसिंह की जय आणि सत् श्री अकालच्या घोषणा)**

**(दोन क्षण भेदक पार्श्वसंगीत)**

**वृद्ध** : आणि दुसऱ्या दिवशी पहाटेला आपल्या निवडक शिपायांसह महाराज रणजीतसिंहानी खरोखरच अशक्य ते शक्य करून दाखविलं. सिंधू नदी ओलांडली. खरोखरच ते सर्वात प्रथम नदीत उतरले आणि सर्वात प्रथम सिंधूच्या पश्चिम किनाऱ्यावर पोचले. विजयाचा मुकुट त्यांच्या डोक्यावर ठेवला गेला.

**(व्यवच्छेदक, भेदक संगीत)**

(संगीतमय वातावरणात एक अत्यंत गंभीर अमूर्त ध्वनी)

निबिड अंधेरी रात्र निम्म्याहून अधिक संपलेली आहे. रात्रीच्या या अंधारात, ताऱ्यांच्या फिकट प्रकाशात, दोन व्यक्ती रावीच्या बाजूने गुपचुप पुढे-पुढे जात आहेत. यात आहे एक तरुण आणि तरुणी. आपल्या मृत्युपंथाला लागलेल्या पित्याचे वेदमंत्रासारखे पवित्र शब्द त्यांना रस्ता दाखवत आहेत. या पवित्र आदेशाच्या बंधनात जखडलेले ते दोघे आपल्या आसन्नमरण देवतुल्य पित्याचा सजीव देह आणि पराक्रमी भावाचे प्रेत एका हिरव्यागार शेतात सोडून आले आहेत. ते शेत काही दिवसांपूर्वीच समृद्ध पंजाबचा एक भाग होता. परंतु आता तो पाकिस्तान बनला आहे.

ते सर्व काही हरवून बसले आहेत-वडील, मोठा भाऊ, मित्र, नातेवाईक, दुकान, इस्टेट-सर्व काही ! परंतु एक अदृश्य आशा त्यांना हिंदुस्थानकडे खेचून नेत आहे-त्यांच्या ऋषितुल्य पूज्य वडिलांचा आवाज त्यांच्या कानात घुमतो आहे.

वृद्धाचा अत्यंत पवित्र आणि अत्यंत गंभीर आवाज.

हिंदुस्थानात जाऊन सांगा की आमच्या वयोवृद्ध बापानं वयाच्या ७१ व्या वर्षी देशासाठी हसत-हसत आत्मबलिदान केलं. हिंदुस्थानात जाऊन सांगा ! हिंदुस्थानात जाऊन सांगा ! आम्ही सीमाप्रांताचे रक्षक आहोत ! हिंदुस्थानात जाऊन सांगा !

# लेखक परिचय

**उदयशंकर भट्ट :**

यांचा जन्म बुलंदशहर (उत्तर प्रदेश) मध्ये झाला असला तरी त्यांची बहुतेक साहित्यनिर्मिती लाहोर (पंजाब) मध्ये झालेली आहे. सुरुवातीला पूर्ण नाटके तेवढीच लिहिण्याकडे त्यांचा कल होता. नंतर मात्र त्यांनी पूर्ण नाटकं लिहिण्याचे काम चालू असतानाच एकांकिकादेखील लिहायला सुरुवात केली. पुढे तर एकांकिका लेखकांच्या मालिकेत त्यांना अग्रस्थान प्राप्त झाले. नाटयसाहित्याव्यतिरिक्त कविता आणि कादंबऱ्याही त्यांनी लिहिल्या आहेत. पात्रांच्या मनोवृत्तींचे अचूक रेखाटन करण्यात तर त्यांची विशेष हातोटी आहे पात्रानुकूल भाषा हे त्यांचे स्वतःचे असे वैशिष्टच आहे. भावनाटय ही त्यांची मोठी देणगी आहे. विशेषतः त्यांची नाटके आणि एकांकिका यांतील कथानक हे जरी ऐतिहासिक आणि पौराणिक असले तरी ते आधुनिक युगाच्या समस्यांकडे संकेत करत असतात.

फेब्रुवारी १९६५ मध्ये दिल्ली येथे त्यांचा देहांत झाला.

"दहा हजार", या प्रस्तुत एकांकिकेमधून कंजूस व्यापाऱ्याच्या मनातील पुत्रप्रेम आणि धनप्रेम या बाबतीतले द्वंद्व मोठ्या मनोरंजक पद्धतीने दाखविण्यात आलेले आहे.

"समर विजय", "दाहर", "अंबा", "कमला", "विश्वमित्र इत्यादी" त्यांची प्रसिद्ध नाटके, तसेच "आदिम युग", 'समस्यांचा अंत" व "पर्दे के पीछे" इत्यादी त्यांचे एकांकिका संग्रह आहेत.

**भुवनेश्वर :**

भुवनेश्वर हे हिंदी एकांकिकाचे खरे संस्थापक-संवर्धक मानले जातात. हिंदी एकांकिकांना आधुनिकतेचा स्वर देण्यात त्यांचा प्रमुख हात आहे. पाश्चात्य नाटय-कलेचीही त्यांना चांगलीच पकड आहे. त्या कलेच्या शक्तिसामर्थ्याचा त्यांनी आपल्या एकांकी नाटयकलेत विशेषतः सामाजिक यथार्थ तत्त्वाच्या बाबतीत चांगलाच उपयोग केलेला आढळतो.

"कारवाँ" (१९३५) हा त्यांच्या सहा एकांकिकांचा प्रातिनिधिक असा संग्रह आहे. नाट्यशिल्पाच्या दृष्टीने पाहिल्यास यावर बर्नार्ड शॉच्या नाट्यतत्त्वांचा जबरदस्त प्रभाव पडलेला आढळतो. "स्ट्राइक" ही त्यांची निसर्गवादी (नॅचरॅलिस्टिक) अशी एकांकिका आहे. वास्तववादी नाट्यप्रकारातील एक प्रमुख रूप आणि प्रकार असे तिला म्हणता येईल. यामध्ये पाश्चात्य संस्कृतीने भारलेल्या, आडंबरपूर्ण अशा उच्च-मध्य वर्गाच्या अवास्तविक आणि पोकळ अशा जीवनाचे नाट्यचित्र पहायला मिळते.

**डॉ. रामकुमार वर्मा :**

हिंदी एकांकिकांच्या इतिहासात सर्व प्रथम शक्तिशाली एकांकिकाकार आणि या क्षेत्रातील पथ प्रदर्शक! पहिली एकांकिका-"बादल की मृत्यू" (१९३०). त्यांनी सामाजिक आणि ऐतिहासिक पात्रे कथानके, आणि संवेदना यांच्या आधारावर आजपर्यंत अनेक महत्त्वपूर्ण अशा एकांकिका अत्यंत यशस्वीरीत्या लिहिल्या. त्यांनी लिहिलेले प्रातिनिधिक स्वरूपाचे असे एकांकिका संग्रह आहेत-"पृथ्वीराज की आँखे", "रेशमी टाई", "चारुमित्रा", "विभूती", "सप्तकिरण", "रूपरंग", "कौमुदी महोत्सव", "रिमझिम" आणि "मयूर पंख."

सामाजिक एकांकिकांमध्ये आपल्या समाजातील सर्व वर्गांचे, व्यक्तींचे आणि व्यक्तींच्या मनोविज्ञानाचे नाट्यदर्शन घडविणाऱ्या "रेशमी टाई" आणि "रिमझिम" या संग्रहांमधील एकांकिका, तसेच भारतीय संस्कृतीचे उदात्त असे उदाहरण आणि इतिहासाचे दर्शन घडविणाऱ्या "चारुमित्रा" आणि "कौमुदी महोत्सव" हे एकांकिका संग्रह विशेष उल्लेखनीय असे आहेत. डॉ.वर्मांची एकांकी नाट्यकला ही हिंदी एकांकी नाट्यकलेचे एक गौरवपूर्ण असे उदाहरण म्हणता येईल. कारण त्याचा भाव आणि शिल्प स्वर अत्यंत मौलिक आणि स्वतःचे वैशिष्टच राखणारा असा आहे. त्यांच्या एकांकी म्हणजे आधुनिक रंगभूमीला आपल्या सर्व मानदंडानिशी प्रकर्षाने प्रेक्षकांसमोर आणणाऱ्या अशा अत्यंत सफल रंगभूमीचे उदाहरण म्हणता येईल.

**सेठ गोविंददास :**

नाटकांच्या रचनेबरोबरच श्रेष्ठ दर्जाच्या नाटिकांचेही ज्यांनी सृजन केले अशा हिंदी नाटककारांमध्ये सेठ गोविंददासांचे स्थान फार मोठे आहे. १९३६ पासून आजपर्यंत त्यांच्या जवळजवळ शंभर एकांकिका प्रकाशित झालेल्या आहेत. त्यांचे प्रमुख एकांकी संग्रह आहेत-" सप्तरश्मि ", " पंचभूत ", अष्टदल ", " एकादशी ", " स्पर्धा ", वगैरे. सेठ गोविंददास यांनी ऐतिहासिक आणि सामाजिक विषयांवर एकांकिका लिहिल्या आहेत. त्यांच्यावर गांधीजींच्या विचारसरणीचा विशेष प्रभाव पडलेला आढळतो.

त्यांनी नाटकेही बरीच लिहिली आहेत. त्यांच्या ऐतिहासिक आणि पौराणिक नाटकांमधील ऐतिहासिक व पौराणिक प्रसंग व पात्रांमधून राष्ट्रीय वृत्ती, नैतिकता आणि मानवतेचा स्वर ध्वनित होतो. सामाजिक नाटकांत " नारी जीवन ", " विवाह समस्या ", " प्रेम ", " दांपत्य जीवन " या विषयांना त्यांनी नाट्यात्मक रूप दिले आहे.

हिंदीमध्ये एकपात्री नाटकांचे सूतोवाच त्यांनीच केले. त्यात खास उल्लेख करता येण्याजोगी नाटके म्हणजे " प्रलय और सृष्टी ", " शाप और वर " " सच्चा ज़ीवन " ही होत.

**उपेंद्रनाथ ' अश्क ' :**

जन्म जालंधर (पंजाब) येथे. शिक्षण बी. ए., एल् एल्. बी. पर्यंत. प्रथम त्यांनी उर्दूमध्ये लिहायला सुरुवात केली. नंतर हिंदीतून लेखन करू लागले आणि थोड्याच अवधीत हिंदी लेखकांच्या मालिकेत त्यांनी महत्त्वाचे स्थान पटकावले. श्री. अश्क हे एक बहुमुखी प्रतिभा असलेले कलाकार आहेत. त्यांनी कादंबऱ्या, गोष्टी, नाटके, एकांकिका आदी सर्व प्रकारचे लेखन केले आणि जे लिहिले ते दर्जेदार लिहिले.

" टॉवेल " (" तौलिए ") या एकांकिकेमध्ये आधुनिक शिष्टाचारातील कृत्रिमपणा दाखविला आहे. या शिष्टाचारांमुळे मधु मोकळेपणी हसू शकत नाही, बोलू शकत नाही इतकेच नव्हे तर तिच्या या व्यवहारामुळे तिच्या पतीचा एक प्रकारचा कोंडमारा झालेला दिसून येतो. पाश्चात्य संस्कृतीचे अंधानुकरण करणे आपल्याला योग्य ठरणार नाही हे या एकांकिकेमुळे स्पष्ट होते. ती संस्कृती आपल्या नैसर्गिक

प्रवृत्तींवर आघात करून जीवन दुःखी करीत आहे. श्री. उपेंद्रनाथ अश्कांच्या नाट्य-कृती—"तूफान से पहले", "आदि मार्ग", "कैद और उडान", "छठा बेटा", "चरवाहे", "देवताओं की छाया में", "स्वर्ग की झलक", "जय–पराजय" इत्यादी.

**विष्णु प्रभाकर :**

विष्णु प्रभाकर हिंदी एकांकिका साहित्यात मनोवैज्ञानिक विचारांचे प्रसिद्ध एकांकिकाकार आहेत. मानवी मनाचे अंतरंग जाणून घेऊन ते प्रकट करण्यामध्ये त्यांच्या हिंदी एकांकिका प्रसिद्ध आहेत. त्यांचे एकांकी संग्रह—"माँ का बेटा", "इन्सान और अन्य एकांकी".

"टूटते परिवेश" ही एक वास्तववादी एकांकिका आहे. यामध्ये एकांकिकाकाराने जीवनातून सरळ सरळ घेतलेल्या चरित्रांचा माध्यमातून आपल्या आजच्या सामाजिक वस्तुस्थितीचे मोठ्या कौशल्याने चित्रण केले आहे. पात्रांचे स्वरूप आणि एकांकिकेची नाट्यभूमीही सर्व प्रकारे वा वास्तववादी अशीच आहे.

**जगदीशचंद्र माथुर :**

जगदीशचंद्र माथुर हे हिंदी एकांकिकांच्या आधुनिक उन्नायकांपैकी एक आहेत. त्यांनी ऐतिहासिक आणि सामाजिक दोन्ही प्रकारच्या एकांकिका लिहून सारखीच प्रसिद्धी मिळविली आहे. एकांकिकेमध्ये व्यावहारिक आणि सहज अशी नाट्यगुणांची पकड असणे आणि त्यामुळे सतत प्रयोगशील रूप देत रहाणे हे त्यांच्या एकांकी कलेचे सर्वांत मोठे वैशिष्ट्य होय.

त्यांचे प्रसिद्ध एकांकिका संग्रह आहेत—"भोर का तारा" आणि "ओ मेरे सपने".

"भोर का तारा" ही एकांकिका भावना आणि आदर्श यांच्या आधारावर निर्माण केलेली आहे. यामध्ये एकांकिकाकाराने मनुष्याच्या उदात्त भावनेकडे अगदी सहजपणे संकेत केला आहे.

**डॉ. लक्ष्मीनारायण लाल :**

लक्ष्मीनारायण लाल हे नाटकांपेक्षाही अधिक रंगभूमीच्या संपूर्ण कल्पनेकडे आकर्षिले गेले आहेत. निश्चित आणि परंपरेने चालत आलेली अशी रंगभूमी त्यांच्या समोर नसेलही कदाचित, परंतु नाटकाच्या रंगभूमी संबंधीच्या या संपूर्ण दृष्टी आणि शक्यतांनी त्यांना नेहमीच हेलकावून टाकले आहे. एकीकडे त्यांनी आजच्या सामाजिक जीवनातील वास्तविक प्रश्नांना व्यापक आणि सूक्ष्म पातळीवर ग्रहण केले आहे तर दुसरीकडे आपल्या प्रत्येक एकांकिकेमध्ये रंगमंचाला जास्तीतजास्त साकार आणि दृश्यमान करण्याचा यशस्वी प्रयत्न केला आहे.

आधुनिक रंगभूमीचे संशोधन आणि त्याच्या अनेक रूपांचे प्रतिष्ठापन या संदर्भात त्यांचे नाव हिंदी एकांकी क्षेत्रात विशेष उल्लेखनीय आहे.

त्यांच्या एकांकी संग्रहाची नावे आहेत–"ताजमहल के आँसू", "पर्वत के पीछे" "नाटक बहुरंगी" आणि "नाटक बहुरूपी". "कॉफी हाऊस में इंतजार" ही एकांकिका म्हणजे संग्रहातील इतर एकांकिकांहून वेगळी आणि विशेष अशी एकांकिका असून नवीन नाटक आणि रंगमंचाच्या दृष्टीने एक उल्लेखनीय प्रयोग आहे.

"दर्पण", "कलंकी", "सूर्यमुख", "मिस्टर अभिमन्यू" आणि "करफ्यू" ही त्यांची प्रसिद्ध हिंदी नाटके असून आधुनिक हिंदी रंगभूमीला ती एक फार मोठी देणगी आहे.

**धर्मवीर भारती**

नव्या पिढीतील लेखकांमध्ये धर्मवीर भारतींचा उल्लेख प्रामुख्याने करावा लागेल. आजपर्यंत त्यांनी लिहिलेल्या अशा एकांकिका संख्येने आठ–दहाच असतील परंतु प्रत्येक एकांकिकेमध्ये त्यांचे असे स्वरूप–वैशिष्टय दिसून येते. "नदी प्यासी थी" हा धर्मवीर भारतींचा पहिला एकांकी संग्रह आहे.

"सृष्टी का आखिरी आदमी" ही एक छंदोबद्ध नाटिका आहे. नाटयकला, नाटयतत्त्व ह्या गोष्टी आपल्या समस्त रूपानिशी या ठिकाणी प्रत्यक्षात उतरलेल्या दिसून येतात. ध्वनी, स्वर आणि आवाज यांच्या माध्यमांतून मनुष्याची एक नियतिगाथा याठिकाणी निर्माण झाल्याचे आढळते. तेच येथे वाचून अनुभवता येते.

भारतींची प्रसिद्ध एकांकिका "अंधा युग" ही रंगभूमीला लाभलेली एक मोठी देणगीच म्हणता येईल.

### चंद्रगुप्त विद्यालंकार

जन्म ४ डिसेंबर १९०६. शिक्षण गुरुकुल विश्वविद्यालयात झाले. सुरुवातीपासून यांचा कल विद्याभ्यास आणि स्वतंत्र लेखन यांकडे होता. पुढे-पुढे ती आवड संपादन-कार्याकडे वाढू लागली. १९३१ पासून १९४७ पर्यंत लाहोर विश्वसाहित्य ग्रंथमालेतून जवळ जवळ शंभरपर्यंत विश्व तसेच भारतीय साहित्य ग्रंथ प्रकाशित केले. त्या लाहोर विश्वसाहित्य ग्रंथमालेचे संपादन-संचालन त्यांनी केले. संपादक या नात्याने त्यांची प्रसिद्धी आणखीनच वाढली. लाहोरच्या "दैनिक जन्मभूमी", दिल्लीच्या "आजकल", "विश्वदर्शन" तसेच मुंबईहून प्रसिद्ध होत असलेल्या "सारिका" पत्रिकेचे संपादन त्यांनी केले आहे.

नाटककार आणि एकांकिकाकार म्हणून देखील विद्यालंकारजी तितकेच प्रसिद्ध आहेत. त्यांच्या कथा संग्रहांपैकी "तीन दिन", "वापसी", "पहला आस्तिक" आणि "गहरे अंधेरे में" हे विशेष उल्लेखनीय आहेत. नाटकांमध्ये "अशोक", "रेवा", देव और मानव", "न्याय की रात" ही त्यांची गाजलेली अशी नाटके आहेत. "हिंदुस्तान आकर कहना" हा त्यांचा उल्लेखनीय असा एकांकी संग्रह होय.

Printed at Tarang Printers, Delhi